# अनुक्रमणिका

प्रस्तावना ........ ४

पारायण-पद्धती ........ ४

संकल्प ........ ५

अध्याय पहिला ........ ७

अध्याय दुसरा ........ १२

अध्याय तिसरा ........ २१

अध्याय चौथा ........ २४

अध्याय पाचवा ........ २७

अध्याय सहावा ........ ३०

अध्याय सातवा ........ ३७

अध्याय आठवा ........ ४४

अध्याय नववा ........ ४८

अध्याय दहावा ........ ५०

अध्याय अकरावा ........ ५२

अध्याय बारावा ........ ५६

अध्याय तेरावा ........ ६१

अध्याय चौदावा ........ ६७

अध्याय पंधरावा ........ ६९

अध्याय सोळावा ........ ७३

अध्याय सतरावा ........ ७९

अध्याय अठरावा ........ ८२

अध्याय एकोणीसावा ........ ८५

अध्याय विसावा ........ ८९

अध्याय एकविसावा ........ ९३

अध्याय बाविसावा ........ ९६

अध्याय तेविसावा ........ ९९

अध्याय चोविसावा ........ १०१

अध्याय पंचविसावा ........ १०३

अध्याय सव्विसावा ........................................................................................................ १०६
अध्याय सत्ताविसावा ...................................................................................................... ११४
अध्याय अठ्ठाविसावा ...................................................................................................... ११६
अध्याय एकोणतिसावा .................................................................................................... १२३
अध्याय तिसावा ............................................................................................................ १३२
अध्याय एकतिसावा ........................................................................................................ १३८
अध्याय बत्तिसावा .......................................................................................................... १४३
अध्याय तेहेतिसावा ........................................................................................................ १५०
अध्याय चौतिसावा ......................................................................................................... १५५
अध्याय पस्तीसावा ......................................................................................................... १५९
अध्याय छत्तिसावा .......................................................................................................... १७०
अध्याय सदतीसावा ........................................................................................................ १८८
अध्याय अडतीसावा ........................................................................................................ १९७
अध्याय एकोणचाळीसावा ................................................................................................ २०१
अध्याय चाळीसावा ........................................................................................................ २०७
अध्याय एकेचाळीसावा ................................................................................................... २१३
अध्याय बेचाळीसावा ...................................................................................................... २२२
अध्याय त्रेचाळीसावा ...................................................................................................... २३०
अध्याय चव्वेचाळीसावा .................................................................................................. २३४
अध्याय पंचेचाळीसावा ................................................................................................... २३९
अध्याय सेहेचाळीसावा ................................................................................................... २४१
अध्याय सत्तेचाळीसावा .................................................................................................. २४३
अध्याय अठ्ठेचाळीसावा .................................................................................................. २४६
अध्याय एकोणपन्नासावा ................................................................................................. २४९
अध्याय पन्नासावा ......................................................................................................... २५३
अध्याय एकावन्नावा ....................................................................................................... २६२
अध्याय बावन्नावा .......................................................................................................... २६५
अध्याय त्रेपन्नावा .......................................................................................................... २६८

## प्रस्तावना

गुरूचरित्र हे मराठीतील एक प्रभावशाली धार्मिक पुस्तक आहे. १५ व्या- १६ व्या शतकात श्री. सरस्वती गंगाधर स्वामींनी हे पुस्तक लिहीले. या पुस्तकात स्वामी नरसिंह सरस्वती यांचे चरीत्र, त्यांचे तत्वज्ञान, आणि त्यांच्याबद्दलच्या पौराणिक कथा आहेत. या पुस्तकात उर्दु आणि पर्शियन शब्द टाळून संस्कृत शब्द वापरलेले आहेत. गुरुचरित्र हिंदू लोकांत फार पवित्र ग्रंथ मानतात. सर्व दत्त भक्त या ग्रंथाचे मार्गशीर्ष महिन्यात येणाऱ्या पौर्णिमेपासून आठ दिवस आधी पारायण करतात, आणि पौर्णिमेच्या दिवशी, उद्यापन करतात. मार्गशीर्ष महिन्यातील पौर्णिमा दत्तजयंती होय.

ह्या ग्रंथाला पवित्र वेद समजतात, म्हणून या ग्रंथाचे पारायण कठोर नियमाने करावे. याचे नियम या ग्रंथातच दिलेले आहेत. हा ग्रंथ सात दिवसांच्या सप्ताहातच किंवा तीन दिवसातच पूर्ण करावा असा नियम आहे.

## पारायण-पद्धती

श्रीगुरुचरित्र हा ग्रंथ महाराष्ट्रात वेदांइतकाच मान्यता पावलेला आहे. इसवी सनाच्या १४व्या शतकात श्रीनृसिंह सरस्वती यांचे दिव्य व अद्‌भुत चरित्र विवरण करणारा हा ग्रंथ श्रीगुरुंच्या शिष्यपरंपरेतील श्रीसरस्वती गंगाधर यांनी १५व्या शतकात लिहिला. श्रीगुरूंच्या चरित्रासारखा अलौकिक विषय व परंपरेचा वारसा लाभलेला श्रीगुरुकृपासंपन्न, सिद्धानुभवी लेखक, असा योग जुळून आल्यामुळे या समग्र ग्रंथास सिद्ध मंत्राचे सामर्थ्य प्राप्त झाले आहे. हा ग्रंथ अत्यंत प्रासादिक आहे. संकल्प-पूर्तीसाठी श्रीगुरुचरित्र-वाचनाची विवक्षित पद्धती आहे. त्याप्रमाणेच वाचन, पारायण व्हावे. स्वतः गुरुचरित्रकार म्हणतात.

"अंतःकरण असता पवित्र । सदाकाळ वाचावे गुरुचरित्र ।"

अंतर्बाह्य शुचिर्भूतता राखून ह्या ग्रंथाचे वाचन करावे. वैविध्यपूर्ण अशा संकल्पपूर्ततेसाठी गुरुचरित्र सप्ताहवाचनाचे अनुष्ठान निश्चित फलदायी ठरते, असा अनेक वाचकांचा व साधकांचा अनुबव आहे. ह्या दृष्टीने अनुष्ठानाच्या कालात पाळावयाचे सामान्य संकेत वा नियम पुढीलप्रमाणे आहेत.

१. वाचन हे नेहमी एका लयीत, शांत व सुस्पष्ट असे असावे. उरकण्याच्या दृष्टीने उच्चारभ्रष्टता होऊ नये. चित्त अक्षरांतून व्यक्त होणाऱ्या अर्थाकडे असावे.

२. वाचनासाठी नेहमी पूर्वाभिमुख वा उत्तराभिमुखच बसावे.

३. वाचनासाठी ठराविक वेळ, ठराविक दिशा व ठराविक जागाच असावी. कोणत्याही कारणास्तव ह्यात बदल होऊ देऊ नये.

४. श्रीदत्तात्रेयांची मूर्ती वा प्रतिमा नसल्यास पाटावर तांदूळ ठेवून त्यावर सुपारी ठेवावी व तीत श्रीदत्तात्रेयांचे आवाहन करावे.

५. सप्ताहकालात ब्रह्मचर्याचे पालन व्हावे. वाचन शुचिर्भूतपणाने व सोवळ्यानेच करावे. सप्ताहात केवळ हविषान्न घ्यावे. हविषान्न म्हणजे दूधभात. (मीठ-तिखट, आंबट, दही, ताक वर्ज्य. साखर घ्यावी. गूळ घेऊ नये. गव्हाची पोळी (चपाती), तूप, साखर घेता येते.)

६. रात्री देवाच्या सन्निधच चटईवर अथवा पांढऱ्या धाबळीवर झोपावे. झोपताना डाव्या कुशीवर झोपावे म्हणजे संकल्पपूर्तीचा दृष्टीने संदेश ऐकू येतात, असा श्रद्धेने अनुष्ठान करणाऱ्यांचा अनुभव आहे.

७. वाचनाच्या काळात मध्येच आसनावरून उठू नये किंवा दुसऱ्याशी बोलू नये.

८. सप्ताहाचा प्रारंभ पुष्कळदा शनिवारी करून शुक्रवारी समाप्ती करतात. कारण शुक्रवार हा श्रीगुरूंच्या निजानंदगमनाचा दिवस होय.

९. सप्ताह पूर्ण झाल्यानंतर सातव्या दिवशी, शक्य तर आठव्या दिवशी, सुपारीतून श्रीदत्तात्रेयांचे विसर्जन करावे, आणि नैवेद्य, आरत्या करून, भोजनास सवाष्ण, ब्राह्मण सांगून सांगता करावी. महानैवेद्यात शक्यतो घेवड्याची भाजी असावी.

## संकल्प

प्रथम दोन वेळा आचमन करावे.

**ॐ श्रीमन्महागणाधिपतये नमः । इष्टदेवताभ्यो नमः । कुलदेवताभ्यो नमः । ग्रामदेवताभ्यो नमः । वास्तुदेवताभ्यो नमः । श्रीपादश्रीवल्लभाय नमः । श्रीसद्गुरुनृसिंहसरस्वत्यै नमः ।**

**सर्वेभ्यो देवेभ्यो, ब्राह्मणेभ्यो नमो नमः । मातापितृभ्यां नमः । श्रीगुरुभ्यो नमः । निर्विघ्नमस्तु ।**

**सुमुखश्चैकदंतश्च कपिलो गजकर्णकः । लंबोदरश्च विकटो विघ्ननाशो गणाधिपः ।**
**धूम्रकेतुर्गणाध्यक्शो भालचंद्रो गजाननः । द्वादशैत्तनि नामानि यः पठेच्छ्रुणुयादपि ।**
**विद्यारंभे विवाहे च प्रवेशे निर्गमे तथा । संग्रामे संकटे चैव विघ्नस्तस्य न जायते ॥**
**शुक्लांबरधरं देवं शशिवर्णं चतुर्भुजं । प्रसन्नवदनं ध्यायेत्सर्वविघ्नोपशान्तये ।**
**सर्वमङ्गलमाङ्गल्ये शिव सर्वार्थसाधिके । शरण्ये त्र्यम्बके गौरि नारायणि नमोस्तु ते ।**
**सर्वदा सर्वकार्येषु नास्ति तेषांमङ्गलम् । येषां हृदिस्थो भगवान् मङ्गलायतनं हरिः ॥**
**तदेव लग्नं सुदिनं तदेव ताराबलं चन्द्रबलं तदेव । विद्याबलं दैवबलं तदेव लक्ष्मीपते तेऽङ्घ्रियुगं स्मरामि ॥ लाभस्तेषां जयस्तेषां कुतस्तेषां पराजयः । येषामिन्दीवरश्यामो हृदयस्थोजनार्दनः ॥**
**विनायकं गुरुं भानुं ब्रह्माविष्णुमहेश्वरान् । सरस्वती प्रणम्यादौ सर्वकार्यार्थसिद्धये ॥**
**अभीप्सितार्थसिद्ध्यर्थं पूजितो यः सुरासुरैः सर्वविघ्नहरस्तस्मै गणाधिपतये नमः ॥**
**सर्वेष्वारब्धकार्येषु त्रयस्त्रिभुवनेश्वराः । देवा दिशन्तु नः सिद्धिं ब्रह्मेशानजनार्दनाः ॥**
**श्रीमद्भगवतो महापुरुषस्य विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य अद्य ब्रह्मनो द्वितीये परार्धे विष्णुपदे श्रीश्वेतवाराहकल्पे वैवस्वतमन्वन्तरे कलियुगे प्रथमचरणे भरतवर्षे भरतखण्डे जंबुद्विपे दण्डकारण्ये देशे गोदावर्याः दक्षिण तीरे शालिवाहनशके अमुकनाम संवत्सरे अमुकायने अमुकऋतो अमुकमासे अमुकपक्षे अमुकतिथौ अमुकवासरे अमुकदिवसनक्षत्रे विष्णुयोगे विष्णुकरणे अमुकस्थिते वर्तमाने चन्द्रे अमुकस्थिते श्रीसूर्ये अमुकस्थिते देवगुरौ शेषेषु ग्रहेषु यथायथं राशिस्थानास्थितेषु सत्सु शुभनामयोगे शुभकरणे**
**एवंगुणविशेषणविशिष्टाया शुभपुण्यतिथौ**

(येथे पूजा करणाराने स्वतः म्हणावे, अमुक या ठिकाणी योग्य शब्द वापरावेत.)

**मम आत्मनः श्रुतिस्मृतिपुराणोक्तफलप्रास्यर्थम् । अखण्डलक्ष्मीप्रास्यर्थम् सकलारिष्टशान्त्यर्थम् । श्रीपरमेश्वरश्रीपादश्रीवल्लभ श्रीसद्गुरुश्रीदत्तात्रेयदेवताप्रीत्यर्थम् । अद्य अमुकदिनमारभ्य सप्तदिनपर्यंन्तम् श्रीगुरुचरित्रपाठाख्यं कर्म करिष्ये । तत्रादौ निर्विघ्नतासिद्द्ध्यर्थम् । महागणपतिस्मरणचं करिष्ये ।**

**वक्रतुण्ड महाकाय सुर्यकोटिसमप्रभ निर्विघ्नं उरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा । श्रीमहागणपतये नमः ।**

**अथ ग्रन्थपूजा । पुस्तकरूपिण्यै सरस्वत्यै नमः गन्धपुष्पतुलसीदलहरिद्राकुंकुमाक्षतान् समर्पयामि ।**

**धूपदीपनैवेद्यं समर्पयामि ।**

नंतर उजव्या हाताने उदक सोडून पारायणास प्रारंभ करावा.

**ध्यान**

मालाकमण्डलुरधः करपद्मयुग्मे ।

मध्यस्थपाणियुगले डमरू-त्रिशूले ।

यस्यास्ति ऊर्ध्वकरयोः शुभशंखचक्रे ।

वन्दे तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् ॥१॥

औदुंबरः कल्पवृक्षः कामधेनुश्च संगमः ।

चिंतामणीः गुरोः पादौ दुर्लभो भुवनत्रये ।

कृत जनार्दनो देवस्त्रेत्रायां रघुनन्दनः ।

द्वापारे रामकृष्णौ च कलौ श्रीपाद-श्रीवल्लभः ॥२॥

त्रैमूर्ति राजा गुरु तोचि माझा ।

कृष्णातिरी वास करून वोजा ।

सुभक्त तेथे करिता आनंदा ।

ते सुर स्वर्गी पाहती विनोदा ॥३॥

**ध्यानमंत्र**

ब्रह्मानंद्म परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् । द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ॥

एकं नित्यं विमलमचलं सर्वधीः साक्षिभूतम् । भावातीतं त्रिगुनरहितं सद्गुरुं तं नमामि ॥

काषायवस्त्रं करदंदधारिणं । कमंडलुं पद्मकरेण शंखम् ॥

चक्रं गदाभूषितभूषणाढ्यं । श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

## अध्याय पहिला

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीकुलदेवतायै नमः । श्रीपादश्रीवल्लभाय नमः । श्रीनृसिंहसरस्वत्यै नमः ।

ॐ नमोजी विघ्नहरा । गजानना गिरिजाकुमरा । जय जय लंबोदरा । एकदंता शूर्पकर्णा ॥१॥

हालविशी कर्णयुगुले । तेथूनि जो का वारा उसळे । त्याचेनि वाते विघ्न पळे । विघ्नांतक म्हणती तुज ॥२॥

तुझे शोभे आनन । जैसे तप्त कांचन । किंवा उदित प्रभारमण । तैसे तेज फाकतसे ॥३॥

विघ्नकाननच्छेदनासी । हाती फरश धरिलासी । नागबंद कटीसी । उरग यज्ञोपवीत ॥४॥

चतुर्भुज दिससी निका । विशालाक्षा विनायका । प्रतिपाळिसी विश्वलोका । निर्विघ्ने करूनिया ॥५॥

तुझे चिंतन जे करिती । तया विघ्ने न बाधती । सकळाभीष्टे साधती । अविलंबेसी ॥६॥

सकळ मंगल कार्यासी । प्रथम वंदिजे तुम्हासी । चतुर्दश विद्यांसी । स्वामी तूचि लंबोदरा ॥७॥

वेद शास्त्रे पुराणे । तुझेचि असेल बोलणे । ब्रह्मादिकि या कारणे । स्तविला असे सुरवरी ॥८॥

त्रिपुर साधन करावयासी । ईश्वरे अर्चिले तुम्हासी । संहारावया दैत्यांसी । पहिले तुम्हांसी स्तविले ॥९॥

हरिहर ब्रह्मादिक गणपती । कार्यारंभी तुज वंदिती । सकळाभीष्टे साधती । तुझेनि प्रसादे ॥१०॥

कृपानिधी गणनाथा । सुरवरादिका विघ्नहर्ता । विनायका अभयदाता । मतिप्रकाश करी मज ॥११॥

समस्त गणांचा नायक । तूचि विघ्नांचा अंतक । तूते वंदिती जे लोक । कार्य साधे तयांचे ॥१२॥

सकळ कार्या आधारू । तूचि कृपेचा सागरू । करुणानिधि गौरीकुमरू । मतिप्रकाश करी मज ॥१३॥

माझे मनींची वासना । तुवा पुरवावी गजानना । साष्टांग करितो नमना । विद्या देई मज आता ॥१४॥

नेणता होतो मतिहीन । म्हणोनि धरिले तुझे चरण । चौदा विद्यांचे निधान । शरणागतवरप्रदा ॥१५॥

माझिया अंतःकरणीचे व्हावे । गुरुचरित्र कथन करावे । पूर्णदृष्टीने पहावे । ग्रंथसिद्धि पाववी दातारा ॥१६॥

आता वंदू ब्रह्मकुमारी । जिचे नाम वागीश्वरी । पुस्तक वीना जिचे करी । हंसवाहिनी असे देखा ॥१७॥

म्हणोनि नमतो तुझे चरणी । प्रसन्न व्हावे मज स्वामिणी । राहोनिया माझिये वाणी । ग्रंथी रिघू करी आता ॥१८॥

विद्या वेद शास्त्रांसी । अधिकार जाणा शारदेशी । तिये वंदिता विश्वासी । ज्ञान होय अवधारा ॥१९॥

ऐक माझी विनंती । द्यावी आता अवलीला मती । विस्तार करावया गुरुचरित्री । मतिप्रकाश करी मज ॥२०॥

जय जय जगन्माते । तूचि विश्वी वाग्देवते । वेदशास्त्रे तुझी लिखिते । नांदविशी येणेपरी ॥२१॥

माते तुझिया वाग्बाणी । उत्पत्ति वेदशास्त्रपुराणी । वदता साही दर्शनी । त्यांते अशक्य परियेसा ॥२२॥

गुरूचे नामी तुझी स्थित । म्हणती नृसिंहसरस्वती । याकारणे मजवरी प्रीति । नाम आपुले म्हणूनी ॥२३॥

खांबसूत्रींची बाहुली जैसी । खेळती तया सूत्रासरसी । स्वतंत्रबुधि नाही त्यांसी । वर्तती आणिकाचेनि मते ॥२४॥

तैसे तुझेनि अनुमते । माझे जिव्हे प्रेरीमाते । कृपानिधि वाग्देवते । म्हणोनि विनवी तुझा बाळ ॥२५॥

म्हणोनि नमिले तुझे चरण । व्हावे स्वामिणी प्रसन्न । द्यावे माते वरदान । ग्रंथी रिघू करवी आता ॥२६॥

आता वंदू त्रिमूर्तीसी । ब्रह्माविष्णुशिवांसी । विद्या मागे मी तयासी । अनुक्रमे करोनी ॥२७॥

चतुर्मुखे असती ज्यासी । कर्ता जो का सृष्टीसी । वेद झाले बोलते ज्यासी । त्याचे चरणी नमन माझे ॥२८॥

आता वंदू ह्रषीकेशी । जो नायक त्या विश्वासी । लक्ष्मीसहित अहर्निशी । क्षीरसागरी असे जाणा ॥२९॥

चतुर्बाहु नरहरी । शंख चक्र गदा करी । पद्महस्त मुरारी । पद्मनाभ परियेसा ॥३०॥

पीतांबर असे कसियेला । वैजयंती माळा गळा । शरणागता अभीष्ट सकळा । देता होय कृपाळू ॥३१॥

आता नमू शिवासी । धरिली गंगा मस्तकेसी । पंचवक्त्र दहा भुजेसी । अर्धांगी असे जगन्माता ॥३२॥

पंचवदने असती ज्यासी । संहारी जो या सृष्टीसी । म्हणोनि बोलती स्मशानवासी । त्याचे चरणी नमन माझे ॥३३॥

व्याघ्रांबर पांघरून । सर्वांगी असे सर्पवेष्टण । ऐसा शंभु उमारमण । त्याचे चरणी नमन माझे ॥३४॥

नमन समस्त सुरवरा । सिद्धसाध्यां अवधारा । गंधर्वयक्षकिन्नरा । ऋषीश्वरा नमन माझे ॥३५॥

वंदू आता कविकुळासी । पराशरादि व्यासांसी । वाल्मीकादि सकळिकांसी । नमन माझे परियेसा ॥३६॥

नेणे कवित्व असे कैसे । म्हणोनि तुम्हा विनवितसे । ज्ञान द्यावे जी भरवसे । आपुला दास म्हणोनि ॥३७॥

न कळे ग्रंथप्रकार । नेणे शास्त्रांचा विचार । भाषा नये महाराष्ट्र । म्हणोनि विनवी तुम्हासी ॥३८॥

समस्त तुम्ही कृपा करणे । माझिया वचना साह्य होणे । शब्दब्युत्पत्तीही नेणे । कविकुळ तुम्ही प्रतिपाळा ॥३९॥

ऐसे सकळिका विनवोनि । मग ध्याइले पूर्वज मनी । उभयपक्ष जनकजननी । माहात्म्य पुण्यपुरुषांचे ॥४०॥

आपस्तंबशाखेसी । गोत्र कौंडिण्य महाऋषि । साखरे नाम ख्यातिशी । सायंदेवापासाव ॥४१॥

त्यापासूनि नागनाथ । देवराव तयाचा सुत । सदा श्रीसद्‌गुरुचरण ध्यात ॥ गंगाधर जनक माझा ॥४२॥

नमन करिता जनकचरणी । मातापूर्वज ध्यातो मनी । जो का पूर्वज नामधारणी । आश्वलायन शाखेचा ॥४३॥

काश्यपाचे गोत्री । चौंडेश्वरी नामधारी । वागे जैसा जन्हु अवधारी । अथवा जनक गंगेचा ॥४४॥

त्याची कन्या माझी जननी । निश्चये जैशी भवानी । चंपा नामे पुण्यखाणी । स्वामिणी माझी परियेसा ॥४५॥

नमिता जनकजननीसी । नंतर नमू श्रीगुरुसी । घाली मति प्रकाशी । गुरुचरण स्मरावया ॥४६॥

गंगाधराचे कुशी । जन्म झाला परियेसी । सदा ध्याय श्रीगुरुसी । एका भावे निरंतर ॥४७॥

म्हणोनि सरस्वतीगंगाधर । करी संतांसी नमस्कार । श्रोतया विनवी वारंवार । क्षमा करणे बाळकासी ॥४८॥

वेदाभ्यासी संन्यासी । यती योगेश्वर तापसी । सदा ध्याती श्रीगुरुसी । तयांसी माझा नमस्कार ॥४९॥

विनवितसे समस्तांसी । अल्पमती आपणासी । माझे बोबडे बोलांसी । सकळ तुम्ही अंगिकारा ॥५०॥

तावन्मात्र माझी मति । नेणे काव्यव्युतपत्ति । जैसे श्रीगुरु निरोपिती । तेणे परी सांगत ॥५१॥

पूर्वापार आमुचे वंशी । गुरु प्रसन्न अहर्निशी । निरोप देती माते परियेसी । चरित्र आपुले विस्तारावया ॥५२॥

म्हणे ग्रंथ कथन करी । अमृतघट स्वीकारी । तुझे वंशी परंपरी । लाधती चारी पुरुषार्थ ॥५३॥

गुरुवाक्य मज कामधेनु । मनी नाही अनुमानु । सिद्धि पावविणार आपणु । श्रीनृसिंहसरस्वती ॥५४॥

त्रैमूर्तीचा अवतार । झाला नृसिंहसरस्वती नर । कवण जाणे याचा पार । चरित्र कवणा न वर्णवे ॥५५॥

चरित्र ऐसे श्रीगुरुचे । वर्णू न शके मी वाचे । आज्ञापन असे श्रीगुरुचे । म्हणोनि वाचे बोलतसे ॥५६॥

ज्यास पुत्रपौत्री असे चाड । त्यासी कथा हे असे गोड । लक्ष्मी वसे अखंड । तया भुवनी परियेसा ॥५७॥

ऐशी कथा जयाचे घरी । वाचिती नित्य प्रेमभरी । श्रियायुक्त निरंतरी । नांदती पुत्रकलत्रयुक्त ॥५८॥

रोग नाही तया भुवनी । सदा संतुष्ट गुरुकृपेकरोनि । निःसंदेह साता दिनी । ऐकता बंधन तुटे जाणा ॥५९॥

ऐसी पुण्यपावन कथा । सांगेन ऐक विस्तारता । सायासाविण होय साध्यता । सद्यःफल प्राप्त होय ॥६०॥

निधान लाधे अप्रयासी । तरी कष्ट का सायासी । विश्वास माझिया बोलासी । ऐका श्रोते एकचित्ते ॥६१॥

आम्हा साक्षी ऐसे घडले । म्हणोनि विनवितसे बळे । श्रीगुरुस्मरण असे भले । अनुभवा हो सकळिक ॥६२॥

तृप्ति झालियावरी ढेकर । देती जैसे जेवणार । गुरुमहिमेचा उद्गार । बोलतसे अनुभवोनि ॥६३॥

मी सामान्य म्हणोनि । उदास व्हाल माझे वचनी । मक्षिकेच्या मुखांतुनी । मधु केवी ग्राह्य होय ॥६४॥

जैसे शिंपल्यांत मुक्ताफळ । अथवा कर्पूर कर्दळ । विचारी पा अश्वत्थमूळ । कवणापासावउत्पत्ति ॥६५॥

ग्रंथ कराल उदास । वाकुड कृष्ण दिसे ऊस । अमृतवत निघे त्याचा रस । दृष्टि द्यावी तयावरी ॥६६॥

तैसे माझे बोलणे । ज्याची चाड गुरुस्मरणे । अंगिकार करणार शहाणे । अनुभविती एकचित्ते ॥६७॥

ब्रह्मरसाची गोडी । अनुभवितां फळें रोकडी । या बोलाची आवडी । ज्यासी संभवे अनुभव ॥६८॥

गुरुचरित्र कामधेनु । ऐकता होय महाज्ञानु । श्रोती करोनिया सावध मनु । एकचिते परियेसा ॥६९॥

श्रीगुरुनृसिंहसरस्वती । होते गाणगापुरी ख्याति । महिमा त्यांचा अत्यद्भुती । सांगेन ऐका एकचित्ते ॥७०॥

तया ग्रामी वसती गुरु । म्हणोनि महिमा असे थोरु । जाणती लोक चहू राष्ट्रु । समस्त जाती यात्रेसी ॥७१॥

तेथे राहोनि आराधिती । त्वरित होय फलप्राप्ति । पुत्र दारा धन संपत्ति । जे जे इच्छिले होय जना ॥७२॥

लाधोनिया संताने । नामे ठेविती नामकरणे । संतोषरूपे येऊन । पावती चारी पुरुषार्थ ॥७३॥

ऐसे असता वर्तमानी । भक्त एक 'नामकरणी' । कष्टतसे अति गहनी । सदा ध्याय श्रीगुरुसी ॥७४॥

ऐसा मनी व्याकुळित । चिंतेने वेष्टिला बहुत । गुरुदर्शना जाऊ म्हणत । निर्वाणमानसे निघाला ॥७५॥

अति निर्वाण अंतःकरणी । लय होवोनि गुरुचरणी । जातो शिष्यशिरोमणी । विसरोनिया क्षुधातृषा ॥७६॥

निर्धार करोनि मानसी । म्हणे पाहीन श्रीगुरुसी । अथवा सांडीन देहासी । जडस्वरूपे काय काज ॥७७॥

ज्याचे नामस्मरण करिता । दैन्यहानि होय त्वरिता । आपण तैसा नामांकिता । किंकर म्हणतसे ॥७८॥

दैव असे आपुले उणे । तरी का भजावे श्रीगुरुचरण । परिस लावता लोहा जाण । सुवर्ण केवी होतसे ॥७९॥

तैसे तुझे नाम परिसे । माझे ह्रदयी सदा वसे । माते कष्टी सायासे । ठेविता लाज कवणासी ॥८०॥

या बोलाचिया हेवा । मनी धरोनि पहावा । गुरुमूर्ती सदाशिवा । कृपाळू बा सर्वभूती ॥८१॥

अतिव्याकुळ अंतःकरणी । निंदास्तुति आपुली वाणी । कष्टला भक्त नामकरणी । करिता होय परियेसा ॥८२॥

राग स्वेच्छा ओवीबद्ध म्हणावे । आजि पाहुणे पंढरीचे रावे । वंदू विघ्नहरा भावे । नमू ते सुंदरा शारदेसी ॥८३॥

गुरूची त्रैमूर्ति । म्हणती वेदश्रुति । सांगती दृष्टान्ती । कलियुगात ॥८४॥

कलियुगात ख्याति । श्रीनृसिहसरस्वती । भक्तांसी सारथी । कृपासिंधू ॥८५॥

कृपासिंधु भक्ता । वेद वाखाणिता । त्रयमूर्ति गुरुनाथा । म्हणोनिया ॥८६॥

त्रयमूर्तीचे गुण । तू एक निधान । भक्तांसी रक्षण । दयानिधि ॥८७॥

दयानिधि यती । विनवितो मी श्रीपती । नेणे भावभक्ति । अंतःकरणी ॥८८॥

अंतःकरणी स्थिरु । नव्हे बा श्रीगुरु । तू कृपासागरु । पाव वेगी ॥८९॥

पाव वेगी आता । नरहरी अनंता । बाळालागी माता । केवी टाकी ॥९०॥

तू माता तू पिता । तूचि सखा भ्राता । तूचि कुळदेवता । परंपरी ॥९१॥

वंशपरंपरी । धरूनि निर्धारी । भजतो मी नरहरी । सरस्वतीसी ॥९२॥

सरस्वती नरहरी । दैन्य माझे हरी । म्हणूनि मी निरंतरी । सदा कष्टे व९३॥

सदा कष्ट चित्ता । का हो देशी आता । कृपासिंधु भक्ता । केवी होसी ॥९४॥

कृपासिंधु भक्ता । कृपाळू अनंता । त्रयमूर्ति जगन्नाथा । दयानिधी ॥९५॥

त्रयमूर्ति तू होसी । पाळिसी विश्वासी । समस्त देवांसी । तूचि दाता ॥९६॥

समस्ता देवांसी । तूचि दाता होसी । मागो मी कवणासी । तुजवांचोनी ॥९७॥

तुजवाचोनी आता । असे कवण दाता । विश्वासी पोषिता । सर्वज्ञ तू ॥९८॥

सर्वज्ञाची खूण । असे हे लक्षण । समस्तांचे जाणे । कवण ऐसा ॥९९॥

सर्वज्ञ म्हणोनि । वानिती पुराणी । माझे अंतःकरणी । न ये साक्षी ॥१००॥

कवण कैशापरी । असती भूमीवरी । जाणिजेचि तरी । सर्वज्ञ तो ॥१॥

बाळक तान्हये । नेणे बापमाये । कृपा केवी होय । मातापित्या ॥२॥

दिलियावांचोनि । न देववे म्हणोनि । असेल तुझे मनी । सांग मज ॥३॥

समस्त महीतळी । तुम्हा दिल्हे बळी । त्याते हो पाताळी । बैसविले ॥४॥

सुवर्णाची लंका । तुवा दिल्ही एका । तेणे पूर्वी लंका । कवणा दिल्ही ॥५॥

अढळ ध्रुवासी । दिल्हे हृषीकेशी । त्याने हो तुम्हासी । काय दिल्हे ॥६॥

निःक्षत्र करूनी । विप्राते मेदिनी । देता तुम्हा कोणी । काय दिल्हे ॥७॥

सृष्टीचा पोषक । तूचि देव एक । तूते मी मशक । काय देऊ ॥८॥

नाही तुम्हा जरी । श्रीमंत नरहरी । लक्ष्मी तुझे घरी । नांदतसे ॥९॥

याहोनी आम्हासी । तू काय मागसी । सांग हृषीकेशी । काय देऊ ॥११०॥

मातेचे वोसंगी । बैसोनिया बाळ वेगी । पसरी मुखसुरंगी । स्तनकांक्षेसी ॥११॥

बाळापासी माता । काय मागे ताता । ऐक श्रीगुरुनाथा । काय देऊ ॥१२॥

घेऊनिया देता । नाम नाही दाता । दयानिधि म्हणता । बोल दिसे ॥१३॥

देऊ न शकसी । म्हणे मी मानसी । चौदाही भुवनासी । तूचि दाता ॥१४॥

तुझे मनी पाही । वसे आणिक काही । सेवा केली नाही । म्हणोनिया ॥१५॥

सेवा घेवोनिया । देणे हे सामान्य । नाम नसे जाण । दातृत्वासी ॥१६॥

तळी बावी विहिरी । असती भूमीवरी । मेघ तो अंबरी । वर्षतसे ॥१७॥

मेघाची ही सेवा । न करिता स्वभावा । उदकपूर्ण सर्वा । केवी करी ॥१८॥

सेवा अपेक्षिता । बोल असे दाता । दयानिधि म्हणता । केवी साजे ॥१९॥

नेणे सेवा कैसी । स्थिर होय मानसी । माझे वंशोवंशी । तुझे दास ॥१२०॥

माझे पूर्वजवंशी । सेविले तुम्हांसी । संग्रह बहुवसी । तुझे चरणी ॥२१॥

बापाचे सेवेसी । पाळिती पुत्रासी । तेवी त्वा आम्हासी । प्रतिपाळावे ॥२२॥

माझे पूर्वधन । तुम्ही द्यावे ऋण । का बा नये करुणा । कृपासिंधु ॥२३॥

आमुचे आम्ही घेता । का बा नये चित्ता । मागेन मी सत्ता । घेईन आता ॥२४॥

आता मज जरी । न देसी नरहरी । जिंतोनि वेव्हारी । घेईन जाणा ॥२५॥

दिसतसे आता । कठिणता गुरुनाथा । दास मी अंकिता । सनातन ॥२६॥

आपुले समान । असेल कवण । तयासवे मन । कठिण कीजे ॥२७॥
कठीण कीजे हरी । तुवा दैत्यांवरी । प्रल्हाद कैवारी । सेवकांसी ॥२८॥
सेवका बाळकासी । करू नये ऐसी । कठिणता परियेसी । बरवे न दिसे ॥२९॥
माझिया अपराधी । धरोनिया बुद्धि । अंतःकरण क्रोधी । पहासी जरी ॥१३०॥
बाळक मातेसी । बोले निष्ठुरेसी । अज्ञाने मायेसी । मारी जरी ॥३१॥
माता त्या कुमारासी । कोप न धरी कैशी । आलिंगोनि हर्षी । संबोखी पा ॥३२॥
कवण्या अपराधेसी । न घालिसी आम्हासी । अहो हृषीकेशी । सांगा मज ॥३३॥
माता हो कोपासी । बोले बाळकासी । जावोनि पितयासी । सांगे बाळ ॥३४॥
माता कोपे जरी । एखादे अवसरी । पिता कृपा करी । संबोखूनि ॥३५॥
तू माता तू पिता । कोपसी गुरुनाथा । सांगो कवणा आता । क्षमा करी ॥३६॥
तूचि स्वामी ऐसा । जगी झाला ठसा । दास तुझा भलतैसा । प्रतिपाळावा ॥३७॥
अनाथरक्षक । म्हणती तुज लोक । मी तुझा बाळक । प्रतिपाळावे ॥३८॥
कृपाळु म्हणोनि । वानिती पुराणी । माझे बोल कानी । न घालिसीच ॥३९॥
नायकसी गुरुराणा । माझे करुनावचना । काय दुश्चितपणा । तुझा असे ॥४०॥
माझे करुणावचन । न ऐकती तुझे कान । ऐकोनि पाषाण । विखुरतसे ॥४१॥
करुणा करी ऐसे । वानिती तुज पिसे । अजुनी तरी कैसे । कृपा न ये ॥४२॥
ऐसे नामांकित । विनविता त्वरित । कृपाळु श्रीगुरुनाथ । आले वेगी ॥४३॥
वत्सालागी धेनु । जैशी ये धावोनु । तैसे श्रीगुरु आपणु । आले जवळी ॥४४॥
येतांचि गुरुमुनि । वंदी नामकरणी । मस्तक ठेवोनि । चरणयुग्मी ॥४५॥
केश तो मोकळी । झाडी चरणधुळी । आनंदाश्रुजळी । अंघ्रि क्षाळी ॥४६॥
हृदयमंदिरात । बैसवोनि व्यक्त । पूजा उपचारित । षोडशविधि ॥४७॥
आनंदभरित । झाला नामांकित । हृदयी श्रीगुरुनाथ । स्थिरावला ॥४८॥
भक्तांच्या हृदयांत । राहे श्रीगुरुनाथ । संतोष बहुत । सरस्वतीसी ॥४९॥
इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे मंगलाचरणं नाम प्रथमोऽध्यायः ॥१॥
ओवीसंख्या १४९
॥श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु॥

## अध्याय दुसरा

श्रीगणेशाय नमः ।

त्रैमूर्तिराजा गुरु तूचि माझा । कृष्णातिरी वास करोनि वोजा । सुभक्त तेथे करिती आनंदा । ते सुर स्वर्गी पहाती विनोदा ॥१॥

ऐसे श्रीगुरुचरण ध्यात । जातां विष्णुनामांकित । अति श्रमला चालत । राहिला एका वृक्षातळी ॥२॥

क्षण एक निद्रिस्त । मनी श्रीगुरु चिंतित । कृपानिधि अनंत । दिसे स्वप्नी परियेसा ॥३॥

रूप दिसे सुषुप्तीत । जटाधारी भस्मांकित । व्याघ्रचर्म परिधानित । पीतांबर कासे देखा ॥४॥

येऊनि योगीश्वर जवळी । भस्म लाविले कपाळी । आश्वासूनि तया वेळी । अभयकर देतसे ॥५॥

इतुके देखोनि सुषुप्तीत । चेतन झाला नामांकित । चारी दिशा अवलोकित । विस्मय करी तया वेळी ॥६॥

मूर्ति देखिली सुषुप्तीत । तेचि ध्यातसे मनात । पुढे निघाला मार्ग क्रमित । प्रत्यक्ष देखे तैसाचि ॥७॥

देखोनिया योगीशाते । करिता झाला दंडवते । कृपा भाकी करुणवक्त्रे । माता पिता तू म्हणतसे ॥८॥

जय जयाजी योगाधीशा । अज्ञानतमविनाशा । तू ज्योतिःप्रकाशा । कृपानिधि सिद्धमुनी ॥९॥

तुझे दर्शने निःशेष । गेले माझे दुरितदोष । तू तारक आम्हास । म्हणोनि आलासि स्वामिया ॥१०॥

कृपेने भक्तालागुनी । येणे झाले कोठोनि । तुमचे नाम कवण मुनि । कवणे स्थानी वास तुम्हा ॥११॥

सिद्ध म्हणे आपण योगी । हिंडो तीर्थ भूमीस्वर्गी । प्रसिद्ध आमुचा गुरु जनी । नृसिंहसरस्वती विख्यात ॥१२॥

त्यांचे स्थान गाणगापूर । अमरजासंगम भीमातीर । त्रयमूर्तीचा अवतार । श्रीनृसिंहसरस्वती ॥१३॥

भक्त तारावयालागी । अवतार त्रयमूर्ति जगी । सदा ध्याती अभ्यासयोगी । भवसागर तरावया ॥१४॥

ऐसा श्रीगुरु कृपासिंधु । भक्तजना सदा वरदु । अखिल सौख्य श्रियानंदु । देता होय शिष्यवर्गा ॥१५॥

त्याचे भक्ता कैचे दैन्य । अखंड लक्ष्मी परिपूर्ण । धनधान्यादि गोधन । अष्टैश्वर्ये नांदती ॥१६॥

ऐसे म्हणे सिद्ध मुनि । ऐकोनि विनवी नामकरणी । आम्ही असती सदा ध्यानी । तया श्रीगुरुयतीचे ॥१७॥

ऐशी कीर्ति ब्रीद ख्याति । सांगतसे सिद्ध यति । वंशोवंशी करितो भक्ति । कष्ट आम्हा केवी पाहे ॥१८॥

तू तारक आम्हांसी । म्हणोनि माते भेटलासी । संहार करोनि संशयासी । निरोपावे स्वामिया ॥१९॥

सिद्ध म्हणे तये वेळी । ऐक शिष्या स्तोममौळी । गुरुकृपा सूक्ष्मस्थूळी । भक्तवत्सल परियेसा ॥२०॥

गुरुकृपा होय ज्यासी । दैन्य दिसे कैचे त्यासी । समस्त देव त्याचे वंशी । कळिकाळासी जिंके नर ॥२१॥

ऐसी वस्तु पूजूनी । दैन्यवृत्ति सांगसी झणी । नसेल तुजे निश्चय मनी । म्हणोनि कष्ट भोगितोसी ॥२२॥

त्रयमूर्ति श्रीगुरु । म्हणोनि जाणिजे निर्धारू । देऊ शकेल अखिल वरू । एका भावे भजावे ॥२३॥

एखादे समयी श्रीहरि । अथवा कोपे त्रिपुरारि । रक्षील श्रीगुरु निर्धारी । आपुले भक्तजनांसी ॥२४॥

आपण कोपे एखाद्यासी । रक्षू न शके व्योमकेशी । अथवा विष्णु परियेसी । रक्षू न शके अवधारी ॥२५॥

ऐसे ऐकोनि नामकरणी । लागे सिद्धाचिया चरणी । विनवीतसे कर जोडुनी । भक्तिभावे करोनिया ॥२६॥

स्वामी ऐसा निरोप देती । संदेह होता माझे चित्ती । गुरु केवी झाले त्रिमूर्ति । ब्रह्मा विष्णु महेश्वर ॥२७॥

आणीक तुम्ही निरोपिलेती । विष्णु रुद्र जरी कोपती । राखो शके गुरु निश्चिती । गुरु कोपलिया न रक्षी कोणी ॥२८॥

हा बोल असे कवणाचा । कवण शास्त्रपुराणींचा । संदेह फेडी गा मनाचा । जेणे मन दृढ होय ॥२९॥

येणेपरी नामकरणी । सिद्धांसी पुसे वंदोनि । कृपानिधि संतोषोनि । सांगतसे परियेसा ॥३०॥

सिद्ध म्हणे शिष्यासी । तुवा पुसिले आम्हांसी वेदवाक्य साक्षीसी । सांगेन ऐका एकचित्ते ॥३१॥

वेद चारी उत्पन्न । झाले ब्रह्मयाचे मुखेकरून । त्यापासाव पुराण । अष्टादश विख्यात ॥३२॥

तया अष्टादशांत । ब्रह्मवाक्य असे ख्यात । पुराण ब्रह्मवैवर्त । प्रख्यात असे त्रिभुवनी ॥३३॥

नारायण विष्णुमूर्ति । व्यास झाला द्वापारांती । प्रकाश केला या क्षिती । ब्रह्मवाक्यविस्तारे ॥३४॥

तया व्यासापासुनी । ऐकिले समस्त ऋषिजनी । तेचि कथा विस्तारोनि । सांगेन ऐका एकचित्ती ॥३५॥

चतुर्मुख ब्रह्मयासी । कलियुग पुसे हर्षी । गुरुमहिमा विनवीतसे करद्वय जोडोनि । भावभक्ति करोनिया ॥३७॥

म्हणे सिद्धा योगीश्वरा । अज्ञानतिमिरभास्करा । तू तारक भवसागरा । भेटलासी कृपासिंधु ॥३८॥

ब्रह्मदेवे कलियुगासी । सांगितले केवी कार्यासी । आद्यंत विस्तारेसी । निरोपिजे स्वामिया ॥३९॥

ऐक शिष्या एकचित्ता । जधी प्रळय झाला होता । आदिमूति निश्चिता । होते वटपत्रशयनी ॥४०॥

अव्यक्तमूर्ति नारायण । होते वटपत्री शयन । बुद्धि संभवे चेतन । आणिक सृष्टि रचावया ॥४१॥

प्रपंच म्हणजे सृष्टिरचना । करणे म्हणोनि आले मना । जागृत होय या कारणा । आदिपुरुष तये वेळी ॥४२॥

जागृत होवोनि नारायण । बुद्धि संभवे चेतन । कमळ उपजवी नाभीहून । त्रैलोक्याचे रचनाघर ॥४३॥

तया कमळामधून । उदय झाला ब्रह्मा आपण । चारी दिशा पाहोन । चतुर्मुख झाला देखा ॥४४॥

म्हणे ब्रह्मा तये वेळी । समस्ताहुनी आपण बळी । मजहून आणिक बळी । कवण नाही म्हणतसे ॥४५॥

हासोनिया नारायणु । बोले वाचे शब्दवचनु । आपण असे महाविष्णु । भजा म्हणे तया वेळी ॥४६॥

देखोनिया श्रीविष्णुसी । नमस्कारी ब्रह्मा हर्षी । स्तुति केली बहुवसी । अनेक काळ परियेसा ॥४७॥

संतोषोनि नारायण । निरोप दिधला अतिगहन । सृष्टि रची गा म्हणून । आज्ञा दिधली तये वेळी ॥४८॥

ब्रह्मा म्हणे विष्णुसी । नेणे सृष्टि रचावयासी । देखिली नाही कैसी । केवी रचू म्हणतसे ॥४९॥

ऐकोनि ब्रह्मयाचे वचन । निरोपि त्यासी महाविष्णु आपण । वेद असती हे घे म्हणोन । देता झाला तये वेळी ॥५०॥

सृष्टि रचावयाचा विचार । असे वेदांत सविस्तार । तेणेचि परी रचुनी स्थिर । प्रकाश करी म्हणितले ॥५१॥

अनादि वेद असती जाण । असे सृष्टीचे लक्षण । जैसा आरसा असे खूण । सृष्टि रचावी तयापरी ॥५२॥

या वेदमार्गे सृष्टीसी । रची गा ब्रह्मया अहर्निशी । म्हणोनि सांगे हृषीकेशी । ब्रह्मा रची सृष्टिते ॥५३॥

सृजी प्रजा अनुक्रमे । विविध स्थावरजंगमे । स्वेदज अंडज नामे । जारज उद्भिजे उपजविले ॥५४॥

श्रीविष्णुचे निरोपाने । त्रिजग रचिले ब्रह्मयाने । ज्यापरी सृष्टिक्रमणे । व्यासे ऐसी कथियेली ॥५५॥

सिद्ध म्हणे शिष्यासी । नारायण वेदव्यास ऋषि । विस्तार केला पुराणांसी । अष्टादश विख्यात ॥५६॥

तया अष्टादशांत । पुराण ब्रह्मवैवर्त । ऋषेश्वरासी सांगे सूत । तेचि परी सांगतसे ॥५७॥

सनकादिकांते उपजवोनि । ब्रह्मनिष्ठ निर्गुणी । मरीचादि ब्रह्म सगुणी । उपजवी ब्रह्मा तये वेळी ॥५८॥

तेथोनि देवदैत्यांसी । उपजवी ब्रह्मा परियेसी । सांगतो कथा विस्तारेसी । ऐक आता शिष्योत्तमा ॥५९॥

कृत त्रेता द्वापार युग । उपजवी मग कलियुग । एकेकाते निरोपी मग । भूमीवरी प्रवर्तावया ॥६०॥

बोलावूनि कृतयुगासी निरोपी ब्रह्मा परियेसी । तुवा जावोनि भूमीसी । प्रकाश करी आपणाते ॥६१॥

ऐकोनि ब्रह्मयाचे वचन । कृतयुग आले संतोषोन । सांगेन त्याचे लक्षण । ऐका श्रोते एकचित्ते ॥६२॥

असत्य नेणे कधी वाचे । वैराग्यपूर्ण ज्ञानी साचे । यज्ञोपवीत आरंभण त्याचे । रुद्राक्षमाळा करी कंकणे ॥६३॥

येणे रूपे युग कृत । ब्रह्मयासी असे विनवित । माते तुम्ही निरोप देत । केवी जाऊ भूमीवरी ॥६४॥
भूमीवरी मनुष्य लोक । असत्य निंदा अपवादक । माते न साहवे ते ऐक । कवणे परी वर्तावे ॥६५॥
ऐकोनि सत्ययुगाचे वचन । निरोपीतो ब्रह्मा आपण । तुवा वर्तावे सत्त्वगुण । क्वचित्‌काळ येणेपरी ॥६६॥
न करी जड तूते जाण । आणिक युग पाठवीन । तुवा रहावे सावध होऊन । म्हणूनि पाठवी भूमीवरी ॥६७॥
वर्तता येणेपरी ऐका । झाली अवधि सत्याधिका । बोलावूनि त्रेतायुगा देखा । निरोपी ब्रह्मा परियेसा ॥६८॥
त्रेतायुगाचे लक्षण । ऐक शिष्या सांगेन । असे त्याची स्थूल तन । हाती असे यज्ञसामग्री ॥६९॥
त्रेतायुगाचे कारण । यज्ञ करिती सकळ जन । धर्मशास्त्रप्रवर्तन । कर्ममार्ग ब्राह्मणांसी ॥७०॥
हाती असे कुश समिधा ऐसे । धर्मप्रवर्तक सदा वसे । ऐसे युग गेले हर्षे । निरोप घेऊनि भूमिवरी ॥७१॥
बोलावूनि ब्रह्मा हर्षी । निरोप देत द्वापारासी । सांगेन तयाचे रूपासी । ऐका श्रोते एकचित्ते ॥७२॥
खड्गे खट्वांग धरोनि हाती । धनुष्य बाण एके हाती । लक्षण उग्र असे शांति । निष्ठुर दया दोनी असे ॥७३॥
पुण्य पाप समान देखा । स्वरूपे द्वापार असे निका । निरोप घेऊनि कौतुका । आला आपण भूमीवरी ॥७४॥
त्याचे दिवस पुरल्यावरी । कलियुगाते पाचारी । जावे त्वरित भूमीवरी । म्हणोनि सांगे ब्रह्मा देखा ॥७५॥
ऐसे कलियुग देखा । सांगेन लक्षणे ऐका । ब्रह्मयाचे सन्मुखा । केवी गेले परियेसा ॥७६॥
विचारहीन अंतःकरण । पिशाचासारखे वदन । तोंड खालते करुन । ठायी ठायी पडतसे ॥७७॥
वृद्ध आपण विरागहीन । कलह द्वेष संगे घेऊन । वाम हाती धरोनि शिश्न । येत ब्रह्मयासन्मुख ॥७८॥
जिव्हा धरोनि उजवे हाती । नाचे केली अतिप्रीती । दोषोत्तरे करी स्तुति । पुण्यपापसंमिश्र ॥७९॥
हासे रडे वाकुल्या दावी । वाकुडे तोंड मुखी शिवी । ब्रह्मयापुढे उभा राही । काय निरोप म्हणोनिया ॥८०॥
देखोनि तयाचे लक्षण । ब्रह्मा हासे अतिगहन । पुसतसे अतिविनयाने । लिंग जिव्हा का धरिली ॥८१॥
कलियुग म्हणे ब्रह्मयासी । जिंकीन समस्त लोकांसी । लिंग जिव्हा रक्षणारांसी । हारी असे आपणाते ॥८२॥
याकारणे लिंग जिव्हा । धरोनि नाचे ब्रह्मदेवा । जेथे मी जाईन स्वभावा । आपण न भिये कवणाते ॥८३॥
ऐकोनि कलीचे वचन । निरोप देत ब्रह्मा आपण । भूमीवरी जाऊन । प्रकाश करी आपुले गुणे ॥८४॥
कलि म्हणे ब्रह्मयासी । मज पाठविता भूमीसी । आपुले गुण तुम्हांसी । सांगेन ऐका स्वामिया ॥८५॥
उच्छेद करीन धर्मासी । आपण असे निरंकुशी । निरानंद परियेसी । निंदा कलह माझेनी ॥८६॥
परद्रव्यहारक परस्त्रीरत । हे दोघे माझे भ्रात । प्रपंच मत्सर दंभक । प्राणसखे माझे असती ॥८७॥
बकासारिखे संन्यासी । तेचि माझे प्राण परियेसी । छळण करोनि उदरासी । मिळविती पोषणार्थ ॥८८॥
तेचि माझे सखे जाण । आणीक असतील पुण्यजन । तेचि माझे वैरी जाण । म्हणोनि विनवी ब्रह्मयासी ॥८९॥
ब्रह्मा म्हणे कलियुगासी । सांगे तुज उपदेशी । कलियुगी आयुष्य नरासी । स्वल्प असे एक शत ॥९०॥
पूर्व युगांतरी देखा । आयुष्य बहु मनुष्यलोका । तप अनुष्ठान ऐका । करिती अनेक दिवसवरी ॥९१॥
मग होय तयांसी गती । आयुष्य असे अखंडिती । याकारणे क्षिती कष्टती । बहु दिवसपर्यंत ॥९२॥
तैसे नव्हेचि कलियुग जाण । स्वल्प आयुष्य मनुष्यपण । करिती तप अनुष्ठान । शीघ्र पावती परमार्था ॥९३॥
जे जन असती ब्रह्मज्ञानि । पुण्य करितील जाणोनि । त्यास तुवा साह्य होऊनि । वर्तत असे म्हणे ब्रह्मा ॥९४॥
ऐकोनि ब्रह्मयाचे वचन । कली म्हणतसे नमोन । स्वामींनी निरोपिले जे जन । तेचि माझे वैरी असती ॥९५॥

ऐसे वैरी जेथे असती । केवी जाऊ तया क्षिती । ऐकता होय मज भीति । केवी पाहू तयासी ॥९६॥

पंचशत भूमंडळात । भरतखंडी पुण्य बहुत । मज मारितील देखत । कैसा जाऊ म्हणतसे ॥९७॥

ऐकोनि कलीचे वचन । ब्रह्मा निरोपी हासोन । काळात्म्याते मिळोन । तुवा जावे भूमीसी ॥९८॥

काळात्म्याचे ऐसे गुण । धर्मवासना करिल छेदन । पुण्यात्म्याचे अंतःकरण । उपजेल बुद्धि पापाविषयी ॥९९॥

कली म्हणे ब्रह्मयासी । वैरी माझे परियेसी । वसतात भूमंडळासी । सांगेन स्वामी ऐकावे ॥१००॥

उपद्रविती माते बहुत । कृपा न ये मज देखत । जे जन शिवहरी ध्यात । धर्मरत मनुष्य देखा ॥१॥

आणिक असती माझे वैरी । वास करिती गंगातीरी । आणिक वाराणशीपुरी । जाऊनि धर्म करिती देखा ॥२॥

तीर्थे हिंडती जे चरणे । आणिक ऐकती पुराणे । जे जन करिती सदा दाने । तेचि माझे वैरी जाण ॥३॥

ज्यांचे मनी वसे शांति । तेचि माझे वैरी ख्याति । अदांभिकपणे पुण्य करिती । त्यांसी देखता भीतसे ॥४॥

नासाग्री दृष्टि ठेवुनी । जप करिती अनुष्ठानी । त्यासि देखताचि नयनी । प्राण माझा जातसे ॥५॥

स्त्रियांपुत्रांवरी प्रीति । मायबापा अव्हेरिती । त्यावरी माझी बहु प्रीति । परम इष्ट माझे जाणा ॥६॥

वेदशास्त्रांते निंदिती । हरिहरांते भेद पाहती । अथवा शिव विष्णु दूषिती । ते परम आप्त माझे जाणा ॥७॥

जितेंद्रिय जे असती नर । सदा भजती हरिहर । रागद्वेषविवर्जित धीर । देखोनि मज भय ॥८॥

ब्रह्मा म्हणे कलियुगासी । तुझा प्रकाश बहुवसी । तुवा जाताचि भूमीसी । तुझे इच्छे रहाटतील ॥९॥

एखादा विरळागत । होईल नर पुण्यवंत । त्याते तुवा साह्य होत । वर्तावे म्हणे ब्रह्मा ॥११०॥

ऐकोनि ब्रह्मयाचे वचन । कलियुग करीतसे नमन । करसंपुट जोडोन । विनवितसे परियेसा ॥११॥

माझ्या दुष्ट स्वभावासी । केवी साह्य व्हावे धर्मासी । सांगा स्वामी उपायासी । कवणेपरी रहाटावे ॥१२॥

कलीचे वचन ऐकोनि । ब्रह्मा हसे अतिगहनि । सांगतसे विस्तारोनि । उपाय कलीसी रहाटावया ॥१३॥

काळ वेळ असती दोनी । तुज साह्य होउनी । येत असती निर्गुणी । तेचि दाविती तुज मार्ग ॥१४॥

निर्मळ असती जे जन । तेचि तुझे वैरी जाण । मळमूत्रे जयासी वेष्टन । ते तुझे इष्ट परियेसी ॥१५॥

याचि कारणे पापपुण्यासी । विरोध असे परियेसी । जे अधिक पुण्यराशी । तेचि जिंकिती तुज ॥१६॥

या कारणे विरळागत । होतील नर पुण्यवंत । तेचि जिंकिती निश्चित । बहुतेक तुज वश्य होती ॥१७॥

एखादा विवेकी जाण । राहे तुझे उपद्रव साहोन । जे न साहती तुझे दारुण । तेचि होती वश्य तुज ॥१८॥

या कारणे कलियुगाभीतरी । जन्म होतील येणेपरी । जे जन तुझेचि परी । न होय त्या ईश्वरप्राप्ति ॥१९॥

ऐकोनि ब्रह्मदेवाचे वचन । कलियुग करितसे प्रश्न । कैसे साधूचे अंतःकरण । कवण असे निरोपावे ॥१२०॥

ब्रह्मा म्हणे तये वेळी । एकचित्ते ऐक कली । सांगेन ऐका श्रोते सकळी । सिद्ध म्हणे शिष्यासी ॥२१॥

धैर्य धरोनि अंतःकरण । शुद्ध बुद्ध वर्तती जन । दोष न लागती कधी जाण । लोभवर्जित नरांसी ॥२२॥

जे नर भजनी हरिहरांसी । अथवा असती काशीनिवासी । गुरु सेविती निरंतरेसी । त्यासी तुझा न लगे दोष ॥२३॥

मातापिता सेवकासी । अथवा सेवी ब्राह्मणासी । गायत्री कपिला धेनूसी । भजणारांसी न लगे दोष ॥२४॥

वैष्णव अथवा शैवासी । जे सेविती नित्य तुळसीसी । आज्ञा माझी आहे ऐसी । तयासी बाधू नको ॥२५॥

गुरुसेवक असती नर । पुराण श्रवण करणार । सर्वसाधनधर्मपर । त्याते तुवा न बाधावे ॥२६॥

सुकृती शास्त्रपरायणासी । गुरूते सेवित वंशोवंशी । विवेके धर्म करणारासी । त्याते तुवा न बाधावे ॥२७॥

कलि म्हणे ब्रह्मयासी । गुरुमहिमा आहे कैशी । कवण गुरुस्वरूपे कैसी । विस्तारावे मजप्रति ॥२८॥

ऐकोनि कलीचे वचन । ब्रह्मा सांगतसे आपण । गकार म्हणजे सिद्ध जाण । रेफः पापस्य दाहकः ॥२९॥

उकार विष्णुरव्यक्त । त्रितयात्मा श्रीगुरु सत्य । परब्रह्म गुरु निश्चित । म्हणोनि सांगे कलीसी ॥१३०॥

**श्लोक ॥ गणेशो वाऽग्निना युक्तो विष्णुना च समन्वितः वर्णद्वयात्मको मंत्रश्चतुर्मुक्तिप्रदायकः ॥३१॥**

टीका ॥ गणेशाते म्हणती गुरु । तैसाचि असे वैश्वानरू । ऐसाचि जाण शाङ्‌र्गधरू । गुरुशब्द वर्ते इतुके ठायी ॥३२॥

**श्लोक ॥ गुरुः पिता गुरुर्माता । गुरुरेव परः शिवः । शिवे रुष्टे गुरुस्त्राता गुरौ रुष्टे न कश्चन ॥३३॥**

टीका ॥ गुरु आपला मातापिता । गुरु शंकरु निश्चिता । ईश्वरु होय जरि कोपता । गुरु रक्षील परियेसा ॥३३॥

गुरु कोपेल एखाद्यासी । ईश्वर न राखे परियेसी । ईश्वरू कोपेल ज्या नरासी । श्रीगुरु रक्षी निश्चये ॥३५॥

**श्लोक ॥ गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुः गुरुर्देवो महेश्वरः । गुरुरेकः परं ब्रह्म तस्मातगुरुमुपाश्रयेत ॥३६॥**

टीका ॥ गुरु ब्रह्मा सत्य जाण । तोचि रुद्र नारायण । गुरुचि ब्रह्म कारण । म्हणोनि गुरु आश्रावा ॥३७॥

**श्लोक ॥ हरौ प्रसन्नेऽपि च वैष्णवा जनाः संप्रार्थयन्ते गुरुअक्तिमव्ययाम् । गुरौ प्रसन्ने जगदीश्वरः सदा जनार्दनस्तुष्यति सर्वसिद्धिदः ॥३८॥**

टीका ॥ ईश्वर जरी प्रसन्न होता । त्यासी गुरु होय ओळखविता । गुरु आपण प्रसन्न होता । ईश्वर होय आधीन आपुल्या ॥३९॥

**श्लोक ॥ गुरुः सदा दर्शयिता प्रवृत्ति तीर्थं व्रतं योगतपादिधर्मान् । आचारवर्णादिविवेकयज्ञान् ज्ञानं परं भक्तिविवेकयुक्तम् ॥१४०॥**

टीका ॥ गुरु भजे शास्त्रमार्ग वर्तोनि । तीर्थव्रतयोगतपादि मुनी । आचारवर्णादि ज्ञानी । ज्ञान परम भक्तिविवेकयुक्त ॥४१॥

या कारणे श्रीगुरुसी । भजावे शास्त्रमार्गेसी । तीर्थव्रतयागतपासी । ज्योतिःस्वरूप असे जाणा ॥४२॥

आचारधर्मावर्णाश्रमांसी । विवेकधर्ममार्गासी भक्तिवैराग्ययुक्तांसी । गुरुचि मार्ग दाविणार ॥४३॥

इतुके ऐकोनि कलि आपण । विनवीतसे कर जोडून । गुरु सर्व देवासमान । केवी झाला सांगा मज ॥४४॥

ब्रह्मा म्हणे कलीसी । सांगेन तुज विस्तारेसी । एकचित्ते परियेसी । गुरुवीण पार नाही ॥४५॥

**श्लोक ॥ गुरु विना न श्रवेण भवेत् कस्यापि कस्यचित् । विना कर्णेन शास्त्रस्य श्रवणं तत्कुतो भवेत् ॥४६॥**

टीका । गुरुवीण समस्तांसी । श्रवण कैचे परियेसी । श्रवण होता मनुष्यांसी । समस्त शास्त्रे ऐकती ॥

शास्त्र ऐकता परियेसी । तरतील संसारासी । या कारणे गुरुचि प्रकाशी । ज्योतःस्वरूप जाणावा ॥४८॥

गुरु सेविता सर्व सिद्धि । होती परियेसा त्रिशुद्धि । कथा वर्तली अनादि । अपूर्व तुज सांगेन ॥४९॥

पूर्वी गोदावरीचे तीरी । अंगिरस ऋषींचा आश्रम थोरी । वृक्ष असती नानापरी । पुण्यनामे मृग वसती ॥५०॥

ब्रह्मऋषि आदिकरोनि । तप करिती तया स्थानी । तयांत वेदधर्म म्हणोनि । पैलपुत्र होता द्विज ॥५१॥

तया शिष्य बहु असती । वेदशास्त्र अभ्यासिती । त्यात दीपक म्हणोनि ख्याति । शिष्य होता परियेसा ॥५२॥

होता शिष्य गुरुपरायण । केला अभ्यास शास्त्रपुराण । झाला असे अतिनिपुण । सेवा करिता श्रीगुरुची ॥५३॥

वेदधर्म एके दिनी । समस्त शिष्यांसी बोलावूनी । पुसतसे संतोषोनि । ऐका श्रोते एकचित्ते ॥५४॥

बोलावुनि शिष्यांसी । बोले गुरु परियेसी । प्रीति असेल आम्हांसी । तरी माझे वाक्य परियेसा ॥५५॥

शिष्य म्हणती गुरूसी । जे जे स्वामी निरोपिसी । तू तारक आम्हांसी । अंगिकारू हा भरवसा ॥५६॥

गुरूचे वाक्य जो न करी । तोचि पडे रौरव घोरी । अविद्या मायासागरी । बुडोन जाय तो नर ॥५७॥

मग तया कैची गति । नरकी पडे तो सतती । गुरु तारक हे ख्याति । वेदपुराणे बोलती ॥५८॥

ऐकोनि शिष्यांची वाणी । तोषला वेदधर्म मुनी । संदीपकाते बोलावुनी । सांगतसे परियेसा ॥५९॥

ऐका शिष्य सकळीक । आमचे पूर्वार्जित असे एक । जन्मांतरी सहस्राधिक । केली होती महापातके ॥१६०॥

आमचे अनुष्ठान करिता । बहुत गेले प्रक्षाळिता । काही शेष असे आता । भोगिल्यावाचून न सुटे जाणा ॥६१॥

तप सामर्थ्ये उपेक्षा करितो । पापमोक्षा आड रिघतो । याचि कारणे निष्कृति करितो । तया पाप घोरासी ॥६२॥

न भोगिता आपुले देही । आपले पापा निष्कृति नाही । हा निश्चय जाणोनि पाही । भोगावे आम्ही परियेसा ॥६३॥

या पापाचे निष्कृतीसी । जावे आम्ही वाराणशीसी । जाईल पाप शीघ्रेसी । प्रख्यात असे अखिल शास्त्री ॥६४॥

या कारणे आम्हांसी । न्यावे पुरी वाराणशीसी । पाप भोगीन स्वदेहासी । माते तुम्ही सांभाळावे ॥६५॥

या समस्त शिष्यांत । कवण असे सामर्थ्यवंत । अंगिकारावे त्वरित । म्हणोनि पुसे शिष्यांसी ॥६६॥

तया शिष्यांमध्ये एक । नाम असे संदीपक । बोलतसे अतिविवेक । तया गुरूप्रति देखा ॥६७॥

दीपक म्हणे गुरुस । पाप करितां देहनाश । न करावा संग्रहो दुःखास । शीघ्र करा प्रतिकारू ॥६८॥

वेदधर्म म्हणे तयासी । दृढ देह असता मनुष्यासी । क्षालन करावे पापासी । पुढती वाढे विषापरी ॥६९॥

अथवा तीर्थे प्रायश्चित्ते । आपुले देही भोगोनि त्वरिते । पापावेगळे न होता निरुते । मुक्ति नव्हे आपणांसी ॥१७०॥

देव अथवा ऋषेश्वरांसी । मनुष्यादि ज्ञानवंतासी । क्षालन न होय पापासी । आपुले आपण न भोगिता ॥७१॥

दीपक म्हणे गुरूसी । स्वामी निरोपावे आपणासी । सेवा करीन स्वशक्तीसी । न करिता अनुमान सांगिजे ॥७२॥

ऐकोनि दीपकाचे वचन । वेदधर्म म्हणे आपण । कुष्ठे होईल अंग हीन । अंधक पांगूळ परियेसा ॥७३॥

संवत्सर एकविशंत । माते सांभाळावे बहुत । जरी असेल दृढ व्रत । अंगिकारावी तुम्ही सेवा ॥७४॥

दीपक म्हणे गुरूसी । कुष्ठी होईन आपण हर्षी । अंध होईन एकवीस वर्षी । पापनिष्कृति करीन ॥७५॥

तुमचे पापाचे निष्कृति । मी करीन निश्चिती । स्वामी निरोपावे त्वरिती । म्हणोनि चरणांसी लागला ॥७६॥

ऐकोनि शिष्याची वाणी । संतोषला वेदधर्म मुनी । सांगतसे विस्तारोनि । तया पाप-लक्षणे ॥७७॥

आपुले पाप आपणासी । ग्राह्य नव्हे पुत्रशिष्यांसी । न भोगितां स्वदेहासी । न वेचे पाप परियेसा ॥७८॥

याकारणे आपण देखा । भोगीन आपुले पापदुःखा । सांभाळी मज तू संदीपका । एकवीस वर्षेपर्यंत ॥७९॥

जे पीडिती रोगे देखा । प्रतिपाळणारासी कष्ट अधिका । मजहूनि संदीपका । तूते कष्ट अधिक जाण ॥१८०॥

या कारणे आपुले देही । भोगीन पाप निश्चयी । तुवा प्रतिपाळावे पाही । काशीपूरा नेऊनिया ॥८१॥

तया काशीपुरी जाण । पापावेगळा होईन । आपण शाश्वतपद पावेन । तुजकरिता शिष्योत्तमा ॥८२॥

दीपक म्हणे गुरूसी । अवश्य नेईन पुरी काशी । सेवा करीन एकवीस वर्षी । विश्वनाथासम तुमची ॥८३॥

ब्रह्मा म्हणे कलियुगासी । कैसा होता शिष्य त्यासी । कुष्ठ होतांची गुरूसी । नेले काशीपुरा ॥८४॥

मणिकर्णिका उत्तरदेशी । कंबळेश्वर सन्निधेसी । राहिले तेथे परियेसी । गुरू शिष्य दोघेजण ॥८५॥

स्नान करूनि मणिकर्णिकेसी । पूजा करिती विश्वनाथासी । प्रारब्धभोग त्या गुरूसी । भोगीत होता तया स्थानी ॥८६॥

कुष्ठरोग झाला बहुत । अक्षहीन अतिदुःखित । संदीपक सेवा करित । अतिभक्ती करूनिया ॥८७॥

व्यापिला देह कुष्ठे बहुत । पू कृमि पडे रक्त । दुःखे व्यापला अत्यंत । अपस्मारी झाला जाण ॥८८॥

भिक्षा मागोनि संदीपक । गुरूसी आणोनि देत नित्यक । करी पूजा भावे एक । विश्वनाथस्वरूप म्हणतसे ॥८९॥

रोगे करूनि पीडितां नरू । साधुजन होती क्रूरू । तोचि देखा द्विजवरू । होय क्रूर एखादे वेळी ॥१९०॥

भिक्षा आणितां एखादे दिवशी । न जेवे श्रीगुरु कोपेसी । स्वल्प आणिले म्हणोनि क्लेशी । सांडोनि देत भूमीवरी ॥९१॥
येरे दिवशि जाऊनि शिष्य । आणि अन्ने बहुवस । मिष्टान्ने न आणी म्हणोनि क्लेश । करिता झाल परियेसा ॥९२॥
परोपरीचे पक्वान्न । का नाणिशी म्हणे जाण । कोपे मारू येत आपण । शाका परोपरी मागतसे ॥९३॥
जितुके आणि मागोनिया । सर्वस्वे करीतसे वाया । कोपे देत शिविया । परोपरी परियेसा ॥९४॥
एखादे समयि शिष्यासी । म्हणे ताता ज्ञानराशी । मजनिमित्त कष्टलासी । शिष्यराया शिखामणी ॥९५॥
सवेचि म्हणत वचने क्रूर । माते गांजिले अपार । तू आमुचे विष्ठामूत्र । क्षणाक्षणा धूत नाही ॥९६॥
खाताती मज मक्षिका । कां न निवारिसी संदीपका । सेवा करितां म्हणे ऐका । भिक्षा नाणिशी म्हणतसे ॥९७॥
या कारणे पापगुण । ऐसेची असती जाण । वोखट वाक्य निर्गुण । पाप म्हणोनि जाणावे ॥९८॥
पाप असे जेथे बहुत । दैन्य मत्सर वसे तेथ । शुभाशुभ नेणे क्वचित । पापरूपे जाणावे ॥९९॥
एखादे दैन्यकासी । दुःखे प्राप्त होती कैसी । अपस्मार होय जयासी । पाअरूप तोचि जाणा ॥२००॥
समस्त रोग असती देखा । कुष्ठ सोळा भाग नव्हे निका । वेदधर्म द्विज ऐका कष्टतसे येणेपरी ॥१॥
ऐसे गुरूचे गुणदोष । मनांत न आणी तोचि शिष्य । सेवा करी एकमानस । तोचि ईश्वर मानोनि ॥२॥
जैसे जैसे मागे अन्न । आणूनि देतसे परिपूर्ण । जैसा विश्वेश्वर नारायण । तैसा गुरु म्हणतसे ॥३॥
काशीक्षेत्र थोर असतां । न करी सदा तीर्थयात्रा । न जाय देवदर्शना सर्वथा । गुरुसेवेवांचूनि ॥॥
**श्लोक ॥ न तीर्थयात्रा न च देवयात्रा न देहयात्रा न च गेहयात्रा । अहर्निश ब्रह्म हरिः सुबुद्धो गुरुः प्रसेव्यो न हि सेव्यमन्यत् ॥५॥**
टीका ॥ आपुले देहसंरक्षण । कधी न करी शिष्य जाण । लय लावूनि श्रीगुरुचरण । कवणासवे न बोलेची ॥६॥
अहोरात्र येणेपरी । ब्रह्मा शिव म्हणे हरी । गुरुचि होय निर्धारी । म्हणोनि सेवा करीतसे ॥७॥
गुरु बोले निष्ठुरेसी । आपण मनी संतोषी । जे जे त्याचे मानसी । पाहिजे तैसे वर्ततसे ॥८॥
वर्तता येनेपरी देख । प्रसन्न होवोनि पिनाक । उभा येऊनि सन्मुख । वर माग म्हणतसे ॥९॥
अहो गुरुभक्त दीपका । महाज्ञानी कुलदीपका । तुष्टलो तुझे भक्तीसी ऐका । प्रसन्न झालो माग आता ॥२१०॥
दीपक म्हणे ईश्वरासी । हे मृत्युंजय व्योमकेशी । न पुसतां आम्ही गुरुसी । वर न घे सर्वथा ॥११॥
म्हणोनि गेला गुरुपासी । विनवीतसे तयासी । विश्वनाथ आम्हांसी । प्रसन्न होवोनि आलासे ॥१२॥
निरोप झालिया स्वामीचा । मागेन उपशर्म व्याधीचा । वर होता सदाशिवाचा । बरवे होईल म्हणतसे ॥१३॥
ऐकोनिया शिष्याचे वचन । बोले गुरु कोपायमान । माझे व्याधिनिमित्त जाण । नको प्रार्थू ईश्वरासी ॥१४॥
भोगिल्यावाचोनि पातकासी । निवृत्ति नव्हे गा परियेसी । जन्मांतरी बाधिती निश्चयेसी । धर्मशास्त्री असे जाण ॥१५॥
मुक्ति अपेक्षा ज्याचे मनी । तेणे करावी पापधुणी । शेष राहतां निर्गुणी । विघ्न करितील मोक्षासी ॥१६॥
ऐशियापरी शिष्यासी । गुरु सांगे परियेसी । निरोप मागोनि श्रीगुरुसी । गेला ईश्वरासन्मुख ॥१७॥
जाऊनि सांगे ईश्वरासी । नलगे वर आपणासी । नये गुरुचे मानसी । केवी घेऊ म्हणतसे ॥१८॥
विस्मय करोनि व्योमकेशी । गेला निर्वाणमंडपासी । बोलावून समस्त देवांसी । सांगे वृत्तान्त विष्णूपुढे ॥१९॥
श्रीविष्णु म्हणे शंकरास । कैसा गुरु कैसा शिष्य । कोठे त्यांचा रहिवास । सांगावे मज निर्धारे ॥२२०॥
सांगे ईश्वर विष्णुसी । आश्चर्य देखिले परियेसी । दीपक शिष्य निश्चयेसी । गुरुभक्त असे जाणा ॥२१॥
गोदावरीतीरवासी । वेदधर्म म्हणिजे तापसी । त्याची सेवा अहर्निशी । करितो भावे एकचित्ते ॥२२॥

नाही त्रिलोकी देखिला कोणी । गुरुभक्ति करणार निर्गुणी । त्याते देखोनि माझे मनी । अतिप्रीति वर्ततसे ॥२३॥

वर देईन म्हणोनि आपण । गेलो होतो तयाजवळी जाण । गुरूचा निरोप नाही म्हणोन । न घे वर परियेसा ॥२४॥

अनेक दिव्यसहस्त्रवर्षी । तप करिती महाऋषि । वर मागती अहर्निशी । नाना कष्ट करोनिया ॥२५॥

तैसा तापसी योगी यांसी । नव्हे मज वर द्यावयासी । बलात्कारे देता तयासी । वर न घे तो दीपक ॥२६॥

तनमन अर्पूनि श्रीगुरूसी । सेवा करितो संतोषी । त्रयमूर्ति म्हणोनि गुरूसी । निश्चये भजतसे ॥२७॥

समस्त देव मातापिता । गुरुचि असे तत्त्वतां । निश्चय केला असे चित्ता । गुरु परमात्मा म्हणोनि ॥२८॥

किती म्हणोनि वर्णू त्यासी । अविद्या-अंधकारासी । छेदिता दीपक परियेसी । कुलदीपक नाम सत्य ॥२९॥

धर्म ज्ञान सर्व एक । गुरुचि म्हणे कुलदीपक । चरणसेवा मनःपूर्वक । करितो गुरूची भक्तीने ॥२३०॥

इतुके ऐकोनि शाङ्‍र्गधरू । पहावया गेला शिष्यगुरु । त्यांचा भक्तिप्रकारू । पाहे तये वेळी ॥३१॥

सांगितले विश्वनाथे । त्याहून दिसे आणिक तेथे । संतोषोनि दीपकाते । म्हणे विष्णु परियेसा ॥३२॥

दीपक म्हणे विष्णूसी । काय भक्ति देखोनि आम्हांसी । वर देतोसी परियेसी । कवण कार्या सांग मज ॥३४॥

लक्ष कोटी सहस्त्र वरुषी । तप करिती अरण्यावासी । त्यांसी करितोसी उदासी । वर न देसी नारायण ॥३५॥

मी तरी तुज भजत नाही । तुझे नाम स्मरत नाही । बलात्कारे येवोनि पाही । केवी देशी वर मज ॥३६॥

ऐकोनि दीपकाचे वचन । संतोषला नारायण । सांगतसे विस्तारोन । तया दीपकाप्रती देखा ॥३७॥

गुरुभक्ति करिसी निर्वाणेसी । म्हणोनि आम्ही जाहलो संतोषी । जे भक्ति केली त्वां गुरूसी । तेचि आम्हांसी पावली ॥३८॥

जो नर असेल गुरुभक्त जाण । तोचि माझा जीवप्राण । त्यासी वश्य झालो आपण । जे मागेल ते देतो तया ॥३९॥

सेवा करी माता पिता । ती पावे मज तत्त्वतां । पतिसेवा स्त्रिया करिता । तेही मज पावतसे ॥२४०॥

एखाद्या भल्या ब्राह्मणासी । यती योगेश्वर तापसी । करिती नमन भक्तीसी । तेचि मज पावे जाणा ॥४१॥

ऐसे ऐकोनि दीपक । नमिता झाला आणिक । विनवीतसे देख । म्हणे सिद्ध नामधारका ॥४२॥

ऐक विष्णु हृषीकेशी । निश्चय असो माझे मानसी । वेदशास्त्र मीमांसादिकांसी । गुरु आम्हांसी देणार ॥४३॥

गुरूपासोनि सर्व ज्ञान । त्रयमूर्ति होती आम्हां आधीन । आमुचा गुरुचि देव जाण । अन्यथा नाही जाण पा ॥४४॥

सर्व देव सर्व तीर्थ । गुरूचि आम्हा असे सत्य । गुरूवांचूनि आम्हां परमार्थ । काय दूर असे सांगा ॥४५॥

समस्त योगी सिद्धजन । गुरूवांचूनि न होती सज्ञान । ज्ञान होता ईश्वर आपण । केवी दूर असे सांगा ॥४६॥

जो वर द्याल तुम्ही मज । श्रीगुरु देतो काय चोज । याकारणे श्रीगुरुराज । भजतसे परियेसा ॥४७॥

संतोषोनि नारायण । म्हणे धन्य धन्य माझा प्राण । तू शिष्य-शिरोरत्न । बाळक तूचि आमुचा ॥४८॥

काही तरी माग आता । वर देईन तत्त्वतां । विश्वनाथ आला होता । दुसरेन वर द्यावयासी मी आलो ॥४९॥

आमचेनि मन संतोषी । वर माग जो तुझे मानसी । तुज वश्य झालो निर्धारेसी । जे पाहिजे ते देईन आता ॥२५०॥

दीपक म्हणे विष्णुसी । जरी वर आम्हां देसी । गुरुभक्ति होय अधिक मानसी । ऐसे मज ज्ञान द्यावे ॥५१॥

गुरूचे रूप आपण ओळखे । ऐसे ज्ञान देई सुखे । यापरते न मागे निके । म्हणोनि चरणी लागला ॥५२॥

दिधला वर शाङ्‍र्गपाणी । संतोषोनि बोले वाणी । अरे दीपका शिरोमणी । तू माझा प्राणसखा होशी ॥५३॥

तुवा ओळखिले गुरूसी । देखिले दृष्टी परब्रह्मासी । आणीक जरी आम्हां पुससी । सांगेन एक एकचित्ते ॥५४॥

लौकिक सुबुद्धि होय जैशी । धर्माधर्मसुमने तैशी । उत्कृष्टाहूनि उत्कृष्टेसी । स्तुति करि गा अहर्निशी ॥५५॥

जे जे समयी श्रीगुरूसी । तू भक्तीने स्तुति करिसी । तेणे । होऊ आम्ही संतोषी । तेचि आमुची स्तुति जाण ॥५६॥

वेद वाचिती सांगेसी । वेदान्त भाष्य अहर्निषी । वाचिती जन उत्कृष्टेसी । आम्हा पावे निर्धारी ॥५७॥

बोलती वेद सिद्धान्त । गुरुचि ब्रह्म असे म्हणत । याचि कारणे गुरु भजता सत्य । सर्व देवता तुज वश्य ॥५८॥

गुरु म्हणजे अक्षर दोन । अमृताचा समुद्र जाण । तयामध्ये बुडता क्षण । केवी होय परियेसा ॥५९॥

जयाचे ह्रदयी गुरुस्मरण । तोचि त्रिलोकी पूज्य जाण । अमृतपान सदा सगुण । तोचि शिष्य अमर होय ॥२६०॥

**श्लोक ॥ यदा मम शिवस्यापि ब्रह्मणो ब्राह्मणस्य हि । अनुग्रहो भवेन्नृणां सेव्यते सद्गुरुस्तदा ॥६१॥**

टीका ॥ आपण अथवा ईश्वरु । ब्रह्मा जरी देता वरु । तद्वत् फलदाता गुरु । गुरु त्रैमूर्ति याचि कारणे ॥६२॥

ऐसा वर दीपकासी । दिधला विष्णूने परियेसी । ब्रह्मा सांगे कलीसी । एकचित्ते परियेसा ॥६३॥

वर लाधोनि दीपक । गेला गुरूचे सन्मुख । पुसतसे गुरु ऐक । तया शिष्या दीपकासी ॥६४॥

ऐक शिष्या कुळदीपका । काय दिधले वैकुंठनायका । विस्तारोनि सांगे निका । माझे मन स्थिर होय ॥६५॥

दीपक म्हणे गुरुसी । वर दिधला ह्रषीकेशी । म्या मागितले तयासी । गुरुभक्ति व्हावी म्हणोनिया ॥६६॥

गुरुची सेवा तत्परेसी । अंतःकरण दृढेसी । वर दिधला संतोषी । दृढभक्ति माझी तुमचे चरणी ॥६७॥

संतोषोनि श्रीगुरु । प्रसन्न झाला साक्षात्कारू । जीवित्वे होय तू स्थिरू । काशीपुरी वास करी ॥६८॥

तुझे वाक्य सर्वसिद्धि । तुझे घरी नवनिधि । विश्वनाथ तुझे स्वाधी । म्हणे गुरु संतोषोनि ॥६९॥

तुझे स्मरण जे करिती । त्यांचे कष्ट निवारण होती । श्रियायुक्त नांदती । तुझे स्मरणमात्रेसी ॥२७०॥

येणेपरी शिष्यासी । प्रसन्न झाला परियेसी । दिव्यदेह झाला तत्क्षणेसी । झाला गुरु वेदधर्म ॥७१॥

शिष्याचा भाव पहावयास । कुष्ठी झाला महाक्लेश । तो तापसी अतिविशेष । त्यासी कैचे पाप राहे ॥७२॥

लोकानुग्रह करावयासी । गेला होता पुरी काशी । काशीक्षेत्रमहिमा ऐसी । पाप जाय सहस्त्र जन्मीचे ॥७३॥

तया काशीनगरात । धर्म अथवा अधर्म-रत । वास करिती क्वचित । त्यांसि पुनर्जन्म नाही जाणा ॥७४॥

सूत म्हणे ऋषीश्वरासी । येणे प्रकारे कलीसी । सांगे ब्रह्मा परियेसी । शिष्यदीपक आख्यान ॥७५॥

सिद्ध म्हणे नामकरणी । दृढ मन असावे याचि गुणी । तरीच तरेल भवार्णी । गुरुभक्ति असे येणेविधी ॥७६॥

**श्लोक ॥ यत्र यत्र दृढा भक्तिर्यदा कस्य महात्मनः । तत्र तत्र महादेवः प्रकाशमुपगच्छति ॥७७॥**

टीका । जरी भक्ति असे दृढेसी । त्रिकरणसह मानसी । तोचि लाधे ईश्वरासी । ईश्वर होय तया वश्य ॥७८॥

इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे शिष्यदीपकाख्यानं नाम द्वितीयोऽध्यायः ॥२॥

श्रीदत्तात्रेयार्पितमस्तु ।

ओवीसंख्या ॥२७९॥

॥श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु॥

एक म्हणती नव्हे बाळ । होईल त्रिमूर्तीचा अवतार केवळ । अनुमान नव्हे हा निश्चळ । वेद केवीं म्हणतसे ॥६३॥

सात वर्षांचें बाळक देखा । वेद म्हणतो अखिल शाखा । मनुष्यमात्र नव्हे ऐका । ऐसें म्हणती साधुजन ॥६४॥

ऐसें म्हणोनि साधुजन । करिताति साष्टांगीं नमन । नानापरी स्तोत्रवचन । करिते झाले अवधारा ॥६५॥

नमन करोनि सकळिक । आले आपुले गृहांतिक । पुढें जाती जननीजनक । पुत्रासवें बोळवीत ॥६६॥

निजस्वरुप जननियेसी । दाविता झाला परियेसीं । श्रीपादश्रीवल्लभ-द्त्तात्रेयासी । देखते झाले जनकजननी ॥६७॥

त्रयमूर्तीचा अवतार । झाला नरहरी नर । निजरुपें दिसे कर्पूरगौर । पाहतां नमिलें चरणासी ॥६८॥

जय जया जगद्‌गुरु । त्रयमूर्तीचा अवतारु । आमुचें पुण्य होतें थोरू । म्हणोनि देखिले तुमचे चरण ॥६९॥

तू तारक विश्वासी । आम्हां उद्धरिलें विशेषीं । पुनर्दर्शन आम्हांसी । द्यावें म्हणोनि विनविती ॥७०॥

ऐसें म्हणोनि मातापिता । चरणांवरी ठेविती माथा । अलिंगिती श्रीगुरुनाथा । स्नेहभावेंकरुनियां ॥७१॥

संतोषोनि श्रीगुरुमूर्ति । आश्वास केला अतिप्रीतीं । पुनर्दर्शन हो निश्चितीं । देईन म्हणती तये वेळीं ॥७२॥

ऐसें तयां संभाषोनि । निरोप घेतला तत्क्षणीं । परतोनि आली जनकजननी । येती संतोषोनि मंदिरांत ॥७३॥

वरदमूर्ति श्रीगुरुराणा । निघाला जावया बदरीवना । पातला आनंदकानना । वाराणसी क्षेत्रासी ॥७४॥

अविमुक्त वाराणसी पुरी । क्षेत्र थोर सचराचरीं । विश्वेश्वर अवधारीं । अनुपम्य असे त्रिभुवनीं ॥७५॥

राहूनियां तया स्थानीं । अनुष्ठिती गुरुशिरोमणी । विश्वेश्वराचे दर्शनीं । पूजा करिती आत्मारामासी ॥७६॥

येणेंपरी तया स्थानीं । क्वचित्काळ श्रीगुरुमुनि । अष्टांगयोगेंकरुनि । तप करिती परियेसा ॥७७॥

तया काशीनगरांत । तापसी असती आणिक बहुत । संन्यासी यती अवधूत । तप करिती दारुण ॥७८॥

तयांत श्रीगुरू ब्रह्मचारी । योगाभ्यासधुरंधरीं । करिताति ; तपस्वी येरी । अभिनव करिती मनांत ॥७९॥

म्हणती पहा हो ब्रह्मचारी । तप करितो नानापरी; कैसें वैराग्य याचे उदरीं । निर्लिप्त असे परियेसा ॥८०॥

शरीरस्वार्थ नाहीं यासी । योग्य होय हा संन्यासीं । स्नान करितो त्रिकाळेसीं । मणिकर्णिका तीर्थांत ॥८१॥

ऐसें स्तोत्र नित्य करिती । समस्त संन्यासी येती । वृध्द होता एक यति । 'कृष्णसरस्वती' नामें ॥८२॥

तो केवळ ब्रह्मज्ञानी । तपस्वी असे महामुनि । सदा देखोनियां नयनीं । स्नेहभावें भावीतसे ॥८३॥

म्हणे समस्त यतीश्वरांसी । न म्हणा नर ब्रह्मचारीसी । अवतारपुरुष अतितापसी । विश्ववंद्य दिसतसे ॥८४॥

वयसा धाकुटा म्हणोनि । नमन न कराल तुम्ही मुनी । प्रख्यात मूर्ति हा त्रिभुवनीं । आम्हां वंद्य असे देखा ॥८५॥

वार्धक्यपणें आम्ही यासी । वंदितां दुःख सकळांसी । विशेष आम्ही संन्यासी । मूर्ख लोक निंदिती ॥८६॥

याकारणें आम्ही यासी । विनवूं, परोपकारासी । संन्यास देता, समस्तांसी । भक्ति होईल स्थिर मनीं ॥८७॥

लोकानुग्रहानिमित्त । हा होय गुरु समर्थ । याचे दर्शनमात्रें पुनीत । आम्ही परियेसा ॥८८॥

याकारणें बाळकासी । विनवूं आम्ही विनयेसीं । आश्रम घ्यावा संन्यासी । पूजा करुं एकभावें ॥८९॥

म्हणोनि आले तया जवळीं । विनविताति मुनी सकळी । ऐक तापसी स्तोममौळी । विनंति असे परियेसा ॥९०॥

लोकानुग्रहाकारणें । तुम्हीं आतां संन्यास घेणें । आम्हां समस्तां उद्धरणें । पूजा घेणें आम्हां करवीं ॥९१॥

या कलियुगीं संन्यास म्हणोन । निंदा करिती सकळै जन । स्थापना करणार कवण । न दिसती भूमीवरी ॥९२॥

श्लोक ॥ यज्ञदानं गवालंभं संन्यासं पलपैतृकम् । देवराच्च सुतोत्पत्तिं कलौ पंच विवर्जयेत् ॥९३॥

टीका ॥ यज्ञ दान गवालंभन । संन्यास घेतां अतिदूषण । पलपैतृक भ्रातांगना । करुं नये म्हणताति ॥९४॥

करितां कलियुगांत । निषिद्ध बोलती जन समस्त । संन्यासमार्ग सिद्धांत । वेदसंमत विख्यात ॥९५॥

पूर्वी ऐसें वर्तमानीं । निषेध केला सकळही जनीं । श्रीशंकराचार्य अवतारोनि । स्थापना केली परियेसा ॥९६॥

तयावरी इतुके दिवस । चालत आला मार्ग संन्यास । कलि प्रबळ होतां नाश । पुनरपि निंदा करिताती ॥९७॥

आश्रमाचा उद्धार । सकळ जनां उपकार । करावा कृपासागर । म्हणती सकळ मुनिजन ॥९८॥

ऐकोनि त्यांची विनंति । श्रीगुरुमुनि आश्रय घेती । वृद्ध कृष्णसरस्वती । तयापासूनि परियेसा ॥९९॥

ऐसें म्हणतां सिद्धमुनि । विनवीतसे नामकरणी । संदेह होतो माझे मनीं । कृपानिधि मुनिराया ॥१००॥

म्हणती श्रीगुरू तोचि जगद्‌गुरू । त्यातें झाला आणिक गुरु । त्रयमूर्तीचा अवतारु । कवणेपरी दिसतसे ॥१॥

सिद्ध म्हणे शिष्यासी । सांगेन याची स्थिति कैसी । पूर्वी श्रीरघुनाथासी । झाला वसिष्ठ केवीं गुरु ॥२॥

आठवा अवतार श्रीकृष्णदेवासी । सांदीपनी जाहला गुरु कैसी । अवतार होतांचि मानुषीं तयापरी रहाटावें ॥३॥

याकारणें श्रीगुरुमूर्ती । गुरु केला तो कृष्णसरस्वती । बहुकाळींचा होता यति । म्हणोनि त्यातें मानिलें ॥४॥

शिष्य म्हणे सिद्धासी । स्वामी कथा निरोपिलीसी । वृद्ध कृष्णसरस्वतीसी । गुरु केलें म्हणोनियां ॥५॥

समस्त यतीश्वरांहून । तयासि दिधला बहुमान । कृष्णसरस्वती तो पूर्वी कोण । कोण गुरुचें मूळपीठ ॥६॥

विस्तारुनि आम्हांसी । निरोपावें कृपेसीं । त्याणें माझे मानसीं । संतोष होईल स्वामिया ॥७॥

ऐसें शिष्य विनवितां । तंव सांगे विस्तारता । मूळपीठ आद्यंता । गुरुसंतति परियेसा ॥८॥

आदिपीठ 'शंकर' गुरु । तदनंतर 'विष्णु' गुरु । त्यानंतर 'चतुर्वक्त्र' गुरु । हें मूळपीठ अवधारीं ॥९॥

तदनंतर 'वसिष्ठ' गुरु । तेथोनि 'शक्ति', 'पराशरु' । त्याचा शिष्य 'व्यास' थोरु । जो कां अवतार विष्णूचा ॥११०॥

तयापासूनि 'शुक' गुरु जाण । 'गौडपादाचार्य' सगुण । आचार्य 'गोविंद' तयाहून । पुढें आचार्य तो 'शंकर' जाहला ॥११॥

तदनंतर 'विश्वरुपाचार्य' । पुढें 'ज्ञानबोधीगिरिय' । त्याचा शिष्य 'सिंहगिरिय' । 'ईश्वरतीर्थ' पुढें झाले ॥१२॥

तदनंतर 'नृसिंहतीर्थ' । पुढें शिष्य 'विद्यातीर्थ' । 'शिवतीर्थ', 'भारतीतीर्थ' । गुरुसंतति अवधारीं ॥१३॥

मग तयापासोनि । 'विद्यारण्य' श्रीपादमुनि । 'विद्यातीर्थ' म्हणोनि । पुढें झाला परियेसा ॥१४॥

त्याचा शिष्य 'मळियानंद' । 'देवतीर्थसरस्वती' वृंद । तेथोनि 'सरस्वतीयादवेंद्र' । गुरुपीठ येणेंपरी ॥१५॥

यादवेंद्र मुनीचा शिष्य । तोचि 'कृष्णसरस्वती' विशेष । बहुकाळींचा संन्यासी । म्हणोनि विशेष मानिती ॥१६॥

येणेंपरी श्रीगुरुनाथ । आश्रम घेती चतुर्थ । संन्यासमार्गस्थापनार्थ । श्रीनृसिंहसरस्वती ॥१७॥

समस्त वेदांचा अर्थ । सांगता झाला श्रीगुरुनाथ । म्हणोनि वंदिती समस्त । तया काशी नगरांत ॥१८॥

ख्याति केली अतिगहनी । तया वाराणसीभुवनीं । यति समस्त येऊनि । सेवा करिती श्रीगुरुची ॥१९॥

मग निघाले तेथोनि । बहुत शिष्य-समवेत मुनि । उत्तरतीर्थ बदरीवनीं । अनंत तीर्थे पहावया ॥१२०॥

सव्य घालूनि मेरुसी । तीर्थे नवखंड क्षितीसी । सांगतां विस्तार बहुवसी । ऐक शिष्या नामकरणी ॥२१॥

समस्त तीर्थे अवलोकीत । सवें शिष्य-यतींसहित । भूमिप्रदक्षिणा करीत । आले गंगासागरासी ॥२२॥

सिद्ध म्हणे नामांकिता । समस्त चरित्र सांगतां । विस्तार होईल बहु कथा । म्हणोनि तावन्मात्र सांगतों परियेसीं ॥२३॥

समस्त महिमा सांगावयासी । शक्ति कैंची आम्हांसी । अनंत महिमा त्रैमूर्तीसी । गुरुचरित्र परियेसीं ॥२४॥

गंगासागरापासाव । तटाकयात्रा करीत देव । प्रयागस्थानीं गुरुराव । येते झाले परियेसा ॥२५॥

तया स्थानीं असतां गुरू । आला एक द्विजवरु । 'माधव' नामें असे विप्रु । श्रीगुरुसी भेटला ॥२६॥

ब्रह्मज्ञान तयासी । उपदेश केला प्रीतीसीं । चतुर्थाश्रम तयासी । देते झाले परियेसा ॥२७॥

नाम 'माधवसरस्वती' । तया शिष्यातें ठेविती । तयावरी अतिप्रीती । शिष्यांमध्यें परियेसा ॥२८॥

सिद्ध म्हणे नामकरणी । शिष्य झाले येणेगुणीं । अखिल यतीनामकरणी । सांगेन ऐका एकचित्तें ॥२९॥

गंगाधराचा नंदनु । सांगे गुरुचरित्र कामधेनु । ऐकतां होय महाज्ञानु । लाधे चारी पुरुषार्थ ॥१३०॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्ध-नामधारकसंवादे श्रीगुरुचातुर्थाश्रमग्रहणं-गुरुपरंपरा-कथनं नाम द्वादशोऽध्यायः ॥१२॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेव दत्त ॥

## अध्याय तेरावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

नामधारक शिष्यराणा । लागे सिद्धाचिया चरणां । करसंपुट जोडूनि जाणा । विनवीतसे परियेसा ॥१॥

जय जया सिद्ध मुनी । तूं तारक या भवार्णी । सांगितलें ज्ञान प्रकाशोनि । स्थिर जाहलें मन माझें ॥२॥

गुरुचरित्रकथामृत । सेवितां तृष्णा अधिक होत । शमन करणार समर्थ । तूंचि एक कृपानिधि ॥३॥

गुरुचरित्र कामधेनु । सांगितलें तुम्हीं विस्तारोनु । तृप्त नव्हे माझें मनु । आणखी अपेक्षा होतसे ॥४॥

क्षुधेंकरुनि पीडिलें ढोर । जैसें पावे तृणबिढार । त्यातें होय मनोहर । नवचे तेथोनि परतोनि ॥५॥

एखादा न देखे तक्र स्वप्नीं त्यासी मिळे क्षीरबरणी । नोहे मन त्याचे धणी । केवीं सोडी तो ठाव ॥६॥

तैसा आपण स्वल्पज्ञानी नेणत होतों गुरु-निर्वाणी । अविद्यामाया वेष्टोनि । कष्टत होतों स्वामिया ॥७॥

अज्ञानतिमिररजनीसी । ज्योतिस्वरुप तूंचि होसी । प्रकाश केलें गा आम्हांसी । निजस्वरुप श्रीगुरुचें ॥८॥

तुवां केले उपकारासी । उत्तीर्ण काय होऊं सरसी । कल्पवृक्ष दिल्हेयासी । प्रत्युपकार काय द्यावा ॥९॥

एखादा देतां चिंतामणी । त्यासी उपकार काय धरणीं । नाहीं दिधलें न ऐकों कानीं । कृपामूर्ति सिद्धराया ॥१०॥

ऐशा तुझिया उपकारासी । उत्तीर्ण नोहे जन्मोजन्मेसीं । म्हणोनि लागतसे चरणांसी । एकोभावेंकरोनियां ॥११॥

स्वामींनीं निरोपिला धर्म-अर्थ । अधिक झाला मज स्वार्थ । उपजला मनीं परमार्थ । गुरुसी भजावें निरंतर ॥१२॥

प्रयागीं असतां गुरुमूर्ति । माधवसरस्वतीस दीक्षा देती । पुढें काय वर्तली स्थिति । आम्हांप्रती विस्तारावें ॥१३॥

ऐकोनि शिष्याचें वचन । सिद्धमुनि संतोषोन । मस्तकीं हस्त ठेवून । आश्वासिती तया वेळीं ॥१४॥

धन्य धन्य शिष्या सगुण । तुज लाधले श्रीगुरुचरण । संसार तारक भवार्ण । तूंचि एक परियेसा ॥१५॥

तुवां ओळखिली श्रीगुरुची सोय । म्हणोनि पुससी भक्तिभावें । संतोष होतो आनंदमय । तुझ्या प्रश्नेंकरुनियां ॥१६॥

सांगेन ऐक एकचित्तें । चरित्र गुरुचें विख्यातें । उपदेश देऊनि माधवातें । होते क्वचित्काळ तेथेंचि ॥१७॥

असतां तेथें वर्तमानीं । प्रख्यात झाली महिमा सगुणी । शिष्य झाले अपार मुनि । मुख्य माधवसरस्वती ॥१८॥

तया शिष्यांचीं नामें सांगतां । विस्तार होईल बहु कथा । प्रख्यात असती नामें सात । सांगेन ऐक एकचित्तें ॥१९॥

बाळसरस्वती कृष्णसरस्वती । उपेंद्र-माधवसरस्वती । पांचवा असे आणीक यति । सदानंदसरस्वती देखा ॥२०॥

ज्ञानज्योतिसरस्वती एक । सातवा सिद्ध आपण ऐक । अपार होते शिष्य आणिक । एकाहूनि एक श्रेष्ठ पैं ॥२१॥

त्या शिष्यांसमवेत । श्रीगुरु निघाले दक्षिणपंथ । समस्त क्षेत्रें पावन करित । आले पुन्हा कारंजनगरासी ॥२२॥

भेटी झाली जनकजननी । येवोनि लागताति चरणीं । चतुर्वर्ग भ्राते भगिनी । समस्त भेटती स्वामिया ॥२३॥

देखानियां श्रीगुरुमूर्तीसी नगरलोक अत्यंत हर्षी । आले समस्त भेटीसी । पूजा करिती परोपरी ॥२४॥

घरोघरीं श्रीगुरुसी । पाचारिती भिक्षेसी । जाहले रुपें बहुवसी । घरोघरीं पूजा घेती ॥२५॥

समस्त लोक विस्मय करिती । अवतार हा श्रीविष्णु निश्चितीं । वेषधारी दिसतो यति । परमपुरुष होय जाणा ॥२६॥

यातें नर जे म्हणती । ते नर जाती नरकाप्रती । कार्याकारण अवतार होती । ब्रह्माविष्णुमहेश्वर ॥२७॥

जननीजनक येणें रीतीं । पूजा करिती भावभक्तीं । श्रीगुरू झाले श्रीपादयति । जातिस्मृति जननीसी ॥२८॥

देखोनि जननी तये वेळीं । माथा ठेवी चरणकमळीं । सत्यसंकल्प चंद्रमौळी । प्रदोषपूजा आली फळा ॥२९॥

पतीस सांगे तया वेळीं । पूर्वजन्माचें चरित्र सकळीं । विश्ववंद्य पुत्र प्रबळी । व्हावा म्हणोनि आराधिलें म्यां ॥३०॥

याचि श्रीपाद-ईश्वराचें । पूजन केलें मनोवाचें । प्रसिद्ध झालें जन्म आमुचें । साफल्य केलें परियेसा ॥ ३१॥

म्हणोनि नमिती दोघेजणीं । विनविताति कर जोडूनि । उद्धरावें या भवार्णी । जगन्नाथा यतिराया ॥ ३२॥

श्रीगुरू म्हणती तयांसी । एकादे काळीं परियेसीं । पुत्र होय संन्यासी । उद्धरील कुळें बेचाळीस ॥ ३३॥

त्यासी शाश्वत ब्रह्मलोक । अचळ पद असे देख । त्याचे कुळीं उपजतां आणिक । त्यासीही ब्रह्मपद परियेसा ॥ ३४॥

यमाचे दुःखें भयाभीत । नोहे त्याचे पितृसंततींत । पूर्वज जरी नरकीं असत । त्यांसी शाश्वत ब्रह्मपद ॥ ३५॥

याकारणें आम्हीं देखा । घेतला आश्रम विशेखा । तुम्हां नाहीं यमाची शंका । ब्रह्मपद असे सत्य ॥ ३६॥

ऐसें सांगोनि तयांसी । आश्वासीतसे बहुवसी । तुमचे पुत्र शतायुषी । अष्टैश्वर्ये नांदती ॥ ३७॥

त्यांचे पुत्रपौत्र तुम्ही । पहाल सुखें तुमचे नयनीं । पावाल क्षेम काशीभुवनीं । अंतकाळीं परियेसा ॥ ३८॥

मुक्तिस्थान काशीपुर । प्रख्यात असे वेदशास्त्र । न करा मनीं चिंता मात्र । म्हणोनि सांगती तये वेळीं ॥ ३९॥

त्यांची कन्या असे एक । नाम तिचें 'रत्नाई' विशेष । श्रीगुरुसी नमूनि ऐक । विनवीतसे परियेसा ॥४०॥

विनवीतसे परोपरी । स्वामी मातें तारीं तारीं । बुडोनि जात्यें भवसागरीं । संसारमाया वेष्टोनियां ॥४१॥

संसार-तापत्रयासी । आपण भीतसें परियेसीं । निर्लिप्त करीं गा आम्हांसी । आपण तपासी जाईन ॥४२॥

ऐकोनि तियेचें वचन । श्रीगुरु निरोपिताति आपण । स्त्रियांसी पतिसेवाचरण । तेंचि तप परियेसा ॥४३॥

येणें या भावार्णवासी । कडे पडती परियेसीं । जैसा भाव असे ज्यासी । तैसें होईल परियेसा ॥४४॥

उतरावया पैल पार । स्त्रियांसी असे तो भ्रतार । मनें करोनि निर्धार । भजा पुरुष शिवसमानी ॥४५॥

त्यासी होय उद्धार गति । वेदपुराणें वाखाणिती । अंतःकरणीं न करीं खंती । तूतें गति होईल जाण ॥४६॥

ऐकोनि श्रीगुरुचें वचन । विनवीतसे कर जोडून । श्रीगुरुमूर्ति ब्रह्मज्ञान । विनवीतसें अवधारीं ॥४७॥

तूं जाणसी भविष्यभूत । कैसें मातें उपदेशीत । माझें प्रालब्ध कवणगत । विस्तारावें मजप्रति ॥४८॥

श्रीगुरु म्हणती तियेसी । तुझी वासना असे तपासी । संचित पाप असे तुजसी । भोगणें असे परियेसा ॥४९॥

पूर्वजन्मीं तूं परियेसीं । चरणीं लाथिलें धेनूसी । शेजारी स्त्रीपुरुषांसी । विरोधें लाविला कलह जाणा ॥५०॥

तया दोषास्तव देखा । तूतें बाधा असे अनेका । गायत्रीसी लाथिलें ऐका । तूं सर्वांगीं कुष्ठी होसील ॥५१॥

विरोध केला स्त्रीपुरुषांसीं । तुझा पुरुष होईल तापसी । तुतें त्यजील भरंवसीं । अर्जित तुझें ऐसें असे ॥५२॥

ऐकोनि दुःख करी बहुत । श्रीगुरुचरणीं असे लोळत । मज उद्धारावें गुरुनाथा त्वरित । म्हणोनि चरणीं लागली ॥५३॥

श्रीगुरू म्हणती ऐक बाळे । क्वचित्काळ असाल भले । अपरवयसा होतांचि काळें । पति तुझा यति होये ॥५४॥

तदनंतर तुझा देह । कुष्ठी होईल अवेव । भोगूनि स्वदेहीं वय । मग होईल तुज गति ॥५५॥

नासतां तुझा देह जाण । भेटी होईल आमुचे चरण । तुझें पाप होईल दहन । सांगेन क्षेत्र ऐक पां ॥५६॥

भीमातीर दक्षिण देशीं । असे तीर्थ पापविनाशी । तेथें जाय तूं भरंवसीं । अवस्था तुज घडलियावरी ॥५७॥

या भूमंडळीं विख्यात । तीर्थ असे अति समर्थ । गंधर्वपुर असे ख्यात । अमरजासंगम प्रसिद्ध जाण ॥५८॥

ऐसें सांगोनि तियेसी । श्रीगुरू निघाले दक्षिण देशीं । त्र्यंबक-क्षेत्रासी । आले, गौतमी-उद्धव जेथें ॥५९॥

शिष्यांसहित गुरुमूर्ति । आले नाशिकक्षेत्राप्रती । तीर्थमहिमा असे ख्याति । पुरणांतरीं परियेसा ॥६०॥

तीर्थमहिमा सांगतां । विस्तार होईल बहु कथा । संक्षेपमार्गे तुज आतां । सांगतसें परियेसीं ॥६१॥

त्या गौतमीची महिमा । सांगतां अपार असे आम्हां । बहिरार्णव-उदक उगमा । ब्रह्मांडाव्यतिरिक्त ॥६२॥

जटामुकुटीं तीर्थेश्वर । धरिली होती प्रीतिकर । मिळोनि समस्त ऋषीश्वर । उपाय केला परियेसा ॥६३॥

ब्रह्मऋषि गौतम देखा । तपस्वी असे विशेषा । व्रीहि पेरिले वृत्तीं ऐका । अनुष्ठानस्थानाजवळी ॥६४॥

पूर्वी मुनी सकळी । नित्य पेरुनि पिकविती साळी । ऐसे त्यांचे मंत्र बळी । महापुण्यपुरुष असती ॥६५॥

समस्त ऋषि मिळोनि । विचार करिती आपुले मनीं । ऋषिगौतम महामुनी । सर्वेश्वराचा मुख्य दास ॥६६॥

त्यासी घालितां सांकडें । गंगा आणील आपुलें चाडें । समस्तां आम्हां पुण्य घडे । गंगास्नानें भूमंडळीं ॥६७॥

श्लोक ॥ या गतिर्योगयुक्तानां मुनीनामूर्ध्वरेतसाम् । सा गतिः सर्वजंतूनां गौतमीतीरवासिनाम् ॥६८॥

टीका ॥ ऊर्ध्वरेत मुनीश्वरांसी । कोटिवर्षे तपस्वियांसी । जे गति होय परियेसीं । ते स्नानमात्रें गौतमीच्या ॥६९॥

याकारणें गौतमीसी । आणावें यत्नें भूमंडळासी । सांकडें घालितां गौतमासी । आणितां गंगा आम्हां लाभ ॥७०॥

म्हणोनि रचिली माव एक । दुर्वेची गाय सवत्सक । करोनि पाठविली ऐक । गौतमाचे व्रीहिभक्षणासी ॥७१॥

ऋषि होता अनुष्ठानीं । देखिलें धेनूसी नयनीं । निवारावया तत्क्षणीं । दर्भ पवित्र सोडिलें ॥७२॥

तेचि कुश जाहलें शस्त्र । धेनूसी लागलें जैसें वज्रास्त्र । पंचत्व पावली त्वरित । घडली हत्या गौतमासी ॥७३॥

मिळोनि समस्त ऋषिजन । प्रायश्चित्त देती जाण । गंगा भूमंडळीं आण । याविणें तुम्हां नाहीं शुद्धि ॥७४॥

याकारणें गौतमऋषीं । तप केलें सहस्त्र वर्षी । प्रसन्न झाला व्योमकेशी । वर माग म्हणितलें ॥७५॥

गौतम म्हणे सर्वेश्वरा । तुवां देशील मज वरा । उद्धरावया सचराचरा । द्यावी गंगा भूमंडळासी ॥७६॥

गौतमाचे विनंतीसी । निरोप दिधला गंगेसी । घेवोनि आला भूमंडळासी । पापक्षालनार्थ मनुष्यांचे ॥७७॥

ऐसी गंगाभागीरथी । कवणा वर्णावया सामर्थ्य । याचि कारणें श्रीगुरुनाथ । आले ऐक नामधारका ॥७८॥

ऐशी गौतमीतटाकयात्रा । श्रीगुरू आपण आचरीत । पुढें मागुती लोकानुग्रहार्थ । आपण हिंडे परियेसा ॥७९॥

तटाकयात्रा करितां देख । आले श्रीगुरु मंजरिका । तेथें होता मुनि एक । विख्यात 'माधवारण्य' ॥८०॥

सदा मानसपूजा त्यासी । नरसिंहमूर्ति परियेसीं । देखता झाला श्रीगुरुसी । मानसमूर्ति जैसी देखे ॥८१॥

विस्मित होऊनि मानसीं । नमिता झाला श्रीगुरुमूर्तीसी । स्तोत्र करी बहुवसी । अतिभक्तीकरुनियां ॥८२॥

श्लोक ॥ यद्दिव्यपादद्वयमेवसाक्षाद् , अधिष्ठितं देवनदीसमीपे । य उत्तरे तीरनिवासिरामो, लक्ष्मीपतिस्त्वं निवसन्स नित्यम् ॥८३॥

ओंव्या ॥ येणेंपरी श्रीगुरुसी । विनवी माधवारण्य हर्षी । श्रीगुरू म्हणती संतोषीं । तया माधवारण्यासी ॥८४॥

श्लोक ॥ अत्यंतमार्गस्थितिमार्गरुपं, अत्यंतयोगादधिकारतत्त्वम् । मार्गं च मार्गं च विचिन्वतो मे, मार्गोदयं माधव दर्शये ते ॥८५॥

ओंव्या ॥ ऐसें श्रीगुरू तयासी आश्वासोनि म्हणती हर्षी । निजस्वरुप तयासी । दाविते झाले परियेसा ॥८६॥

श्रीगुरुचें स्वरुप देखोनि । संतोषी झाला तो मुनि । विनवीतसे कर जोडूनि । नानापरी स्तुति करी ॥८७॥

जय जया जगद्गुरू । त्रयमूर्तीचा अवतारू । लोकां दिससी नरु । परमपुरुषा जगज्ज्योति ॥८८॥

तूं तारक विश्वासी । म्हणोनि भूमीं अवतरलासी । कृतार्थ केलें आम्हांसी । दर्शन दिधलें चरण आपुले ॥८९॥

ऐसेपरी श्रीगुरुसी । स्तुति करी तो तापसी । संतोष होऊन अति हर्षी । आश्वासिती तया वेळीं ॥९०॥

म्हणती श्रीगुरू तयासी । सिद्धि झाली तुझ्या मंत्रासी । तुज सद्गति भरंवसीं । ब्रह्मलोक प्राप्त होय ॥९१॥

नित्यपूजा तूं मानसीं । करिसी नृसिंहमूर्तीसी । प्रत्यक्ष होईल परियेसीं । न करीं संशय मनांत ॥९२॥

ऐसें सांगोनि तयासी । श्रीगुरू निघाले परियेसीं । आले वासरब्रह्मेश्वरासी । गंगातीर महाक्षेत्र ॥९३॥
तया गंगातटाकांत । श्रीगुरू समस्त शिष्यांसहित । स्नान करितां गंगेंत । आला तेथें विप्र एक ॥९४॥
कुक्षिव्यथा असे बहुत । तटाकीं असे लोळत । उदरव्यथा अत्यंत । त्यजूं पाहे प्राण देखा ॥९५॥
पोटव्यथा बहु त्यासी । नित्य करी तो उपवासासी । भोजन केलिया दुःख ऐसी । प्राणांतिक होतसे ॥९६॥
याकारणें द्विजवर । सदा करी फलाहार । अन्नासी त्यासी असे वैर । जेवितां प्राण त्यजूं पाहे ॥९७॥
पक्षमासां भोजन करी । व्यथा उठे त्याचे उदरीं । ऐसा किती दिवसवरी । कष्टत होता तो द्विज ॥९८॥
पूर्व दिवसीं तया ग्रामीं । आला सण महानवमी । जेविला मिष्टान्न मनोधर्मी । मासें एक पारणें केलें ॥९९॥
भोजन केलें अन्न बहुत । त्याणें पोट असे दुखत । गंगातीरीं असे लोळत । प्राण त्वरित त्यजूं पाहे ॥१००॥
दुःख करी द्विज अपार । म्हणे गंगेंत त्यजीन शरीर । नको आतां संसार । पापरुपें वर्तत ॥१॥
अन्न प्राण अन्न जीवन । कवण असेल अन्नावीण । अन्न वैरी झालें जाण । मरण बरवें आतां मज ॥२॥
मनीं निर्धार करोनि । गंगाप्रवेश करीन म्हणोनि । पोटीं पाषाण बांधोनि । गंगेमध्यें निघाला ॥३॥
मनीं स्मरे कर्पूरगौर । उपजलों आपण भूमिभार । केले नाहीं परोपकार । अन्नदानादिक देखा ॥४॥
न करीं पुण्य इह जन्मांत । जन्मांतरीं पूर्वी शत । पुण्यफळ असे दिसत । मग हे कष्ट भोगीतसें ॥६॥
अपूर्ती पूजा ईश्वराची । केली असेल निंदा गुरुची । अवज्ञा केली मातापितयांची । मग हे कष्ट भोगीतसें ॥७॥
अथवा पूर्वजन्मीं आपण । केलें असेल द्विजधिक्कारण । अतिथि आलिया न घालीं अन्न । वैश्वदेवसमयासी ॥८॥
अथवा मारिलें वोवरांसी । अग्नि घातला रानासी । वेगळें सांडूनि जनकजननींसी । स्त्रियेसहित मी होतों ॥९॥
मातापिता त्यजोनियां । असों सुखें जेवूनियां । पूर्वार्जवापासोनियां । मग हे कष्ट भोगीतसें ॥११०॥
ऐसीं पापें आठवीत । विप्र जातो गंगेंत । तंव देखिलें श्रीगुरुनाथें । म्हणती बोलावा ब्राह्मणासी ॥११॥
आणा आणा त्या ब्राह्मणासी । प्राण त्यजितो कां सुखेसीं । आत्महत्या महादोषी । पुसों कवण कवणाचा ॥१२॥
श्रीगुरुवचन ऐकोनि । गेले शिष्य धांवोनि । द्विजवरातें काढोनि । आणिलें श्रीगुरुसन्मुख ॥१३॥
अनाथासी कल्पतरु । दुःखिष्टासी कृपासागरू । पुसतसे श्रीगुरू । तया दुःखिष्ट विप्रासी ॥१४॥
श्रीगुरू म्हणती तयासी । प्राण कां गा त्यजूं पाहसी । आत्महत्या महादोषी । काय वृत्तांत सांग आम्हां ॥१५॥
विप्र म्हणे गा यतिराया । काय कराल पुसोनियां । उपजोनि जन्म वायां । भूमिभार जाहलों असें ॥१६॥
मास-पक्षां भोजन करितों । उदरव्यथेनें कष्टतों । साहूं न शकें प्राण देतों । काय सांगूं स्वामिया ॥१७॥
आपणासी अन्न वैरी असतां । केवीं वांचावें गुरुनाथा । शरीर सर्व अन्नगता । केवीं वांचूं जगद्गुरु ॥१८॥
श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी । तुझी व्यथा गेली परियेसीं । औषध असे आम्हांपासीं । क्षण एकें सांगों तुज ॥१९॥
संशय न धरीं आतां मनीं । भिऊं नको अंतःकरणीं । व्याधि गेली पळोनि । भोजन करी धणीवरी ॥१२०॥
श्रीगुरुवचन ऐकोनि । स्थिर झाला अंतःकरणीं । माथा ठेवूनि श्रीगुरुचरणीं । नमन केलें तया वेळीं ॥२१॥
इतुकिया अवसरीं । तया ग्रामींचा अधिकारी । विप्र एक अवधारीं । आला गंगास्नानासी ॥२२॥
तंव देखिलें श्रीगुरुसी । येऊनि लागला चरणांसी । नमन केलें भक्तीसीं । मनोवाक्कायकर्मे ॥२३॥
आश्वासोनि तये वेळीं । पुसती श्रीगुरू स्तोममौळी । कवण नाम कवण स्थळीं । वास म्हणती तयासी ॥२४॥
ऐकोनि श्रीगुरुचें वचन । सांगतसे तो ब्राह्मण । गोत्र आपलें कौंडिण्य । आपस्तंब शाखेसीं ॥२५॥

नाम मज 'सायंदेव' असे । वास-स्थळ आपलें 'कडगंची'स । आलों असे उदरपूर्तीस । सेवा करितों यवनाची ॥२६॥

अधिकारपणें या ग्रामीं । वसों संवत्सर ऐका स्वामी । धन्य धन्य झालों आम्ही । तुमचे दर्शनमात्रेसीं ॥२७॥

तूं तारक विश्वासी । दर्शन दिधलें आम्हांसी । कृतार्थ झालों भरंवसीं । जन्मांतरींचे दोष गेले ॥२८॥

तुझा अनुग्रह होय ज्यासी । तरेल या भवार्णवासी । अप्रयत्नें आम्हांसी । दर्शन दिधलें स्वामिया ॥२९॥

श्लोक ॥ गंगा पापं शशी तापं दैन्यं कल्पतरुस्तथा । पापं तापं च दैन्यं च हरेच्छ्रीगुरुदर्शनम् ॥१३०॥

टीका ॥ गंगा देखितांचि पापें जाती । चंद्रदर्शनें ताप नासती । कल्पतरुची ऐसी गति । दैन्यवेगळा करी जाण ॥३१॥

तैसे नव्हती तुमचे दर्शनगुण । पाप-ताप दैन्यहरण । देखिले आजि तुमचे चरण । चतुर्वर्गफल पावलों ॥३२॥

ऐशी स्तुति करुनि । पुनरपि लागला श्रीगुरुचरणीं । जगद्गुरु अश्वासोनि । निरोप देती तया वेळीं ॥३३॥

श्रीगुरू म्हणती तयासी । आमुचें वाक्य परियेसीं । जठरव्यथा ब्राह्मणासी । प्राणत्याग करीतसे ॥३४॥

उपशमन याचे व्याधीसी । सांगों औषध तुम्हांसी । नेवोनि आपुले मंदिरासी । भोजन करवीं मिष्टान्न ॥३५॥

अन्न जेवितां याची व्यथा । व्याधि न राहे सर्वथा । घेऊनि जावें आतां त्वरिता । क्षुधाक्रांत विप्र असे ॥३६॥

ऐकोनि श्रीगुरुचें वचन । विनवीतसे कर जोडून । प्राणत्याग करितां भोजन । या ब्राह्मणासी होतसे ॥३७॥

जेविला काल मासें एका । त्याणें प्राण जातो ऐका । अन्न देतां आम्हांसी देखा । ब्रह्महत्या त्वरित घडेल ॥३८॥

श्रीगुरु म्हणती सायंदेवासी । आम्ही औषधी देतों यासी । अपूपान्न-माषेसीं । क्षीरमिश्रित परमान्न ॥३९॥

अन्न जेवितां त्वरितेसीं । व्याधि जाईल परियेसीं । संशय न धरीं तूं मानसीं । त्वरित न्यावें गृहासी ॥१४०॥

अंगीकारोनि तया वेळीं । माथा ठेवी चरणकमळीं । विनवीतसे करुणाबहाळी । यावें स्वामी भिक्षेसी ॥४१॥

अंगीकारोनि श्रीगुरुनाथ । निरोप देती हो कां त्वरित । सिद्ध म्हणे ऐक मात । नामधारक शिष्योत्तमा ॥४२॥

आम्ही होतों तये वेळीं । समवेत-शिष्य सकळीं । जठरव्यथेचा विप्र जवळी ; । श्रीगुरू गेले भिक्षेसी ॥४३॥

विचित्र झालें त्याचे घरीं । पूजा केली परोपरी । पतिव्रता त्याची नारी । 'जाखाई' म्हणिजे परियेसा ॥४४॥

पूजा करिती श्रीगुरुसी । षोडशोपचारें परियेसीं । तेणेंचि रीतीं आम्हांसी । शिष्यां सकळिकां वंदिलें ॥४५॥

श्रीगुरुपूजा-विधान । विचित्र केलें अतिगहन । मंडळ केलें रक्तवर्ण । एकेकासी पृथक्-पृथक् ॥४६॥

पद्म रचूनि अष्टदळी । नानापरीचे रंगमाळी । पंचवर्ण चित्रमाळी । रचिली तियें परियेसा ॥४७॥

चित्रासन श्रीगुरुसी । तेणेंचिपरी सकळिकांसी । मंडळार्चनविधीसीं । करिती पुष्पगंधाक्षता ॥४८॥

संकल्पोनि विधीसीं । नमन केलें अष्टांगेसीं । माथा ठेवूनि चरणीं, न्यासी । पाद सर्वही अष्टांगीं ॥४९॥

षोडशोपचार विधीसीं । पंचामृतादि परियेसीं । रुद्रसूक्तमंत्रेसीं । चरण स्नापिले तये वेळीं ॥१५०॥

श्रीगुरुचरणीं अतिहर्षी । पूजा करीत षोडशी । तया विप्रा ज्ञान कैसी । चरणतीर्थ धरिता झाला ॥५१॥

तया चरणतीर्थासी । पूजा करीत भक्तीसीं । गीतवाद्यें आनंदेसीं । करी आरति नीरांजन ॥५२॥

अनुक्रमें श्रीगुरुपूजा । करिता झाला विधिवोजा । पुनरपि षोडशोपचारें पूजा । करीतसे भक्तीनें ॥५३॥

अक्षय वाणें आरति । श्रीगुरुसी ओंवाळिती । मंत्रघोष अतिभक्तीं । पुष्पांजळी करिता झाला ॥५४॥

अनेकपरी गायन करी । नमन करी प्रीतिकरीं । पतिव्रता असे नारी । पूजा करिती उभयवर्ग ॥५५॥

ऐसेपरी श्रीगुरुसी । पूजा केली परियेसीं । तेणेंचि विधीं शिष्यांसी । आम्हां समस्तांसी वंदिलें ॥५६॥

संतोषोनि श्रीगुरुमूर्ति । वर देती अतिप्रीतीं । तुझी संतती होईल ख्याति । गुरुभक्ति वंशोवंशीं ॥५७॥

तूं जाणसी गुरुचा वास । अभिवृद्धि होय वंशोवंश । पुत्रपौत्रीं नांदाल हर्षी । गुरुभक्ति येणेंपरी ॥५८॥

ऐसें बोलोनि द्विजासी । आशीर्वचन देती अतिहर्षी । नमन करुनि श्रीगुरुसी । ठाय घातले तये वेळीं ॥५९॥

नानापरीचें पक्वान्न । अपूपादि माषान्न । अष्टविध परमान्न । शर्करासहित निवेदिलें ॥१६०॥

शाक पाक नानापरी वाढताति सविस्तारीं । भोजन करिती प्रीतिकरीं । श्रीगुरुमूर्ति परियेसा ॥६१॥

जठरव्यथेच्या ब्राह्मणें । भोजन केलें परिपूर्ण । व्याधि गेली तत्क्षण । श्रीगुरूचे कृपादृष्टीनें ॥६२॥

परीस लागतां लोहासी । सुवर्ण होय परियेसीं । दर्शन होतां श्रीगुरुसी । व्याधि कैंची सांग मज ॥६३॥

उदय जाहलिया दिनकरासी । संहार होतो अंधकारासी । श्रीगुरुकृपा होय ज्यासी । दैन्य कैंचें तया घरीं ॥६४॥

ऐसेपरी श्रीगुरुनाथें । भोजन केलें शिष्यासहित । आनंद झाला तेथें बहुत । विस्मय करिती सकळै जन ॥६५॥

अभिनव करिती सकळ जन । द्विजासी वैरी होतें अन्न । औषध झालें तेंचि अन्न । व्याधि गेली म्हणताति ॥६६॥

सिद्ध म्हणे नामधारकास । श्रीगुरुकृपा होय ज्यास । जन्मांतरींचे जाती दोष । व्याधि कैंची त्याचे देहीं ॥६७॥

गंगाधराचा नंदन । सरस्वती सांगें विस्तारोन । गुरुचरित्र कामधेनु । ऐका श्रोते एकचित्तें ॥६८॥

जे ऐकती भक्तीनें । व्याधि नसती त्यांचे भुवना । अखिल सौख्य पावती जाणा । सत्यं सत्यं पुनः सत्यं ॥६९॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्ध-नामधारकसंवादे करंजनगराभिगमनं तथा विप्रोदरव्यथानिरसनं नाम त्रयोदशोऽध्यायः ॥१३॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेव दत्त ॥

( ओंवीसंख्या १६९ ) ॥ ॐ ॥

## अध्याय चौदावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

नामधारक शिष्य देखा । विनवी सिद्धासी कवतुका । प्रश्न करी अतिविशेखा । एकचित्तें परियेसा ॥१॥

जय जया योगीश्वरा । सिद्धमूर्ति ज्ञानसागरा । पुढील चरित्र विस्तारा । ज्ञान होय आम्हांसी ॥२॥

उदरव्यथेच्या ब्राह्मणासी । प्रसन्न जाहले कृपेसीं । पुढें कथा वर्तली कैसी । विस्तारावें आम्हांप्रति ॥३॥

ऐकोनि शिष्याचें वचन । संतोष करी सिद्ध आपण । गुरुचरित्र कामधेनु जाण । सांगता जाहला विस्तारें ॥४॥

ऐक शिष्या शिखामणि । भिक्षा केली ज्याचे भुवनीं । तयावरी संतोषोनि । प्रसन्न जाहले परियेसा ॥५॥

गुरुभक्तीचा प्रकारु । पूर्ण जाणे तो द्विजवरु । पूजा केली विचित्रु । म्हणोनि आनंद परियेसा ॥६॥

तया सायंदेव द्विजासी । श्रीगुरु बोलती संतोषीं । भक्त हो रे वंशोवंशीं । माझी प्रीति तुजवरी ॥७॥

ऐकोनि श्रीगुरुचें वचन । सायंदेव विप्र करी नमन । माथा ठेवून चरणीं । न्यासिता झाला पुनःपुन्हा ॥८॥

जय जया जगद्गुरु । त्रयमूर्तीचा अवतारू । अविद्यामाया दिससी नरु । वेदां अगोचर तुझी महिमा ॥९॥

विश्वव्यापक तूंचि होसी । ब्रह्मा-विष्णु-व्योमकेशी । धरिला वेष तूं मानुषी । भक्तजन तारावया ॥१०॥

तुझी महिमा वर्णावयासी । शक्ति कैंची आम्हांसी । मागेन एक आतां तुम्हांसी । तें कृपा करणें गुरुमूर्ति ॥११॥

माझे वंशपारंपरीं । भक्ति द्यावी निर्धारीं । इह सौख्य पुत्रपौत्रीं । उपरी द्यावी सद्गति ॥१२॥

ऐसी विनंति करुनी । पुनरपि विनवी करुणावचनीं । सेवा करितो द्वारयवनीं । महाशूरक्रूर असे ॥१३॥

प्रतिसंवत्सरीं ब्राह्मणासी । घात करितो जीवेसीं । याचि कारणें आम्हांसी । बोलावीतसे मज आजि ॥१४॥

जातां तया जवळी आपण । निश्चयें घेईल माझा प्राण । भेटी जाहली तुमचे चरण । मरण कैंचें आपणासी ॥१५॥

संतोषोनि श्रीगुरुमूर्ति । अभयंकर आपुले हातीं । विप्रमस्तकीं ठेविती । चिंता न करीं म्हणोनियां ॥१६॥

भय सांडूनि तुवां जावें । क्रूर यवना भेटावें । संतोषोनि प्रियभावें । पुनरपि पाठवील आम्हांपाशीं ॥१७॥

जंववरी तूं परतोनि येसी । असों आम्ही भरंवसीं । तुवां आलिया संतोषीं । जाऊं आम्ही येथोनि ॥१८॥

निजभक्त आमुचा तूं होसी । पारंपर-वंशोवंशीं । अखिलाभीष्ट तूं पावसी । वाढेल संतति तुझी बहुत ॥१९॥

तुझे वंशपारंपरीं । सुखें नांदती पुत्रपौत्रीं । अखंड लक्ष्मी तयां घरीं । निरोगी होती शतायुषी ॥२०॥

ऐसा वर लाधोन । निघे सायंदेव ब्राह्मण । जेथें होता तो यवन । गेला त्वरित तयाजवळी ॥२१॥

कालांतक यम जैसा । यवन दुष्ट परियेसा । ब्राह्मणातें पाहतां कैसा । ज्वालारुप होता जाहला ॥२२॥

विमुख होऊनि गृहांत । गेला यवन कोपत । विप्र जाहला भयचकित । मनीं श्रीगुरुसी ध्यातसे ॥२३॥

कोप आलिया ओळंबयासी । केवीं स्पर्शे अग्नीसी । श्रीगुरुकृपा होय ज्यासी । काय करील क्रूर दुष्ट ॥२४॥

गरुडाचिया पिलियांसी । सर्प तो कवणेपरी ग्रासी । तैसें तया ब्राह्मणासी । असे कृपा श्रीगुरुची ॥२५॥

कां एखादे सिंहासी । ऐरावत केवीं ग्रासी । श्रीगुरुकृपा होय ज्यासी । कलिकाळाचें भय नाहीं ॥२६॥

ज्याचे हृदयीं श्रीगुरुस्मरण । त्यासी कैंचें भय दारुण । काळमृत्यु न बाधे जाण । अपमृत्यु काय करी ॥२७॥

ज्यासि नाहीं मृत्यूचें भय । त्यासी यवन असे तो काय । श्रीगुरुकृपा ज्यासी होय । यमाचें मुख्य भय नाहीं ॥२८॥

ऐसेपरी तो यवन । अंतःपुरांत जाऊन । सुषुप्ति केली भ्रमित होऊन । शरीरस्मरण त्यासी नाहीं ॥२९॥

हृदयज्वाळा होय त्यासी । जागृत होवोनि परियेसीं । प्राणांतक व्यथेसीं । कष्टतसे तये वेळीं ॥३०॥

स्मरण असें नसे कांहीं । म्हणे शस्त्रें मारितो घाई । छेदन करितो अवेव पाहीं । विप्र एक आपणासी ॥३१॥

स्मरण जाहलें तये वेळीं । धांवत गेला ब्राह्मणाजवळी । लोळतसे चरणकमळीं । म्हणे स्वामी तूंचि माझा ॥३२॥

येथें पाचारिलें कवणीं । जावें त्वरित परतोनि । वस्त्रें भूषणें देवोनि । निरोप देतो तये वेळीं ॥३३॥

संतोषोनि द्विजवर । आला ग्रामा वेगवक्त्र । गंगातीरीं असे वासर । श्रीगुरुचे चरणदर्शना ॥३४॥

देखोनियां श्रीगुरुसी । नमन करी तो भावेसीं । स्तोत्र करी बहुवसीं । सांगे वृत्तांत आद्यंत ॥३५॥

संतोषोनि श्रीगुरुमूर्ति । तया द्विजा आश्वासिती । दक्षिण देशा जाऊं म्हणती । स्थान-स्थान तीर्थयात्रे ॥३६॥

ऐकोनि श्रीगुरूचें वचन । विनवीतसे कर जोडून । न विसंबें आतां तुमचे चरण । आपण येईन समागमें ॥३७॥

तुमचे चरणाविणें देखा । राहों न शके क्षण एका । संसारसागरतारका । तूंचि देखा कृपासिंधु ॥३८॥

उद्धरावया सगरांसी । गंगा आणिली भूमीसी । तैसें स्वामीं आम्हांसी । दर्शन दिधलें आपुलें ॥३९॥

भक्तवत्सल तुझी ख्याति । आम्हां सोडणें काय निति । सवें येऊं निश्चितीं । म्हणोनि चरणीं लागला ॥४०॥

येणेंपरी श्रीगुरुसी । विनवी विप्र भावेसीं । संतोषोनि विनयेसीं । श्रीगुरु म्हणती तये वेळीं ॥४१॥

कारण असे आम्हां जाणें । तीर्थे असती दक्षिणे । पुनरपि तुम्हां दर्शन देणें । संवत्सरीं पंचदशीं ॥४२॥

आम्ही तुमचे गांवासमीपत । वास करुं हें निश्चित । कलत्र पुत्र इष्ट भ्रात । मिळोनि भेटा तुम्ही आम्हां ॥४३॥

न करा चिंता असाल सुखें । सकळ अरिष्टें गेलीं दुःखें । म्हणोनि हस्त ठेविती मस्तकें । भाक देती तये वेळीं ॥४४॥

ऐसेपरी संतोषोनि । श्रीगुरु निघाले तेथोनि । जेथें असे आरोग्यभवानी । वैजनाथ महाक्षेत्र ॥४५॥

समस्त शिष्यांसमवेत । श्रीगुरु आले तीर्थे पहात । प्रख्यात असे वैजनाथ । तेथें राहिले गुप्तरुपें ॥४६॥

नामधारक विनवी सिद्धासी । काय कारण गुप्त व्हावयासी । होते शिष्य बहुवसी । त्यांसी कोठें ठेविलें ॥४७॥

गंगाधराचा नंदनु । सांगे गुरुचरित्र कामधेनु । सिद्धमुनि विस्तारुन । सांगे नामकरणीस ॥४८॥

पुढील कथेचा विस्तारु । सांगतां विचित्र अपारु । मन करुनि एकाग्रु । ऐका श्रोते सकळिक हो ॥४९॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्ध-नामधारकसंवादे क्रूरयवनशासनं-सायंदेववरप्रदानं नाम चतुर्दशोऽध्यायः ॥१४॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेव दत्त ॥

( ओंवीसंख्या ४९ )

## अध्याय पंधरावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

ऐक शिष्या नामकरणी । धन्य धन्य तुझी वाणी । तुझी भक्ति गुरुचरणीं । लीन जाहली परियेसा ॥१॥

तूं मातें पुसतोसी । होत मन संतोषी । गौप्य व्हावया कारण कैसी । सांगेन ऐक एकचित्तें ॥२॥

महिमा प्रगट जाहली बहुत । तेणें भजती लोक अमित । काम्यार्थ व्हावे म्हणूनि समस्त । येती श्रीगुरुच्या दर्शना ॥३॥

साधु असाधु धूर्त सकळी । समस्त येती श्रीगुरुजवळी । वर्तमानीं खोटा कळी । सकळही शिष्य होऊं म्हणती ॥४॥

पाहें पां पूर्वी भार्गवराम अवतरोनि । निःक्षत्र केली मेदिनी । राज्य विप्रांसी देउनी । गेला आपण पश्चिमसमुद्रासी ॥५॥

पुनरपि जाती तयापासीं । तोही ठाव मागावयासी । याकारणें विप्रांसी । कांक्षा न सुटे परियेसा ॥६॥

उबगोनि भार्गवराम देखा । गेला सागरा मध्योदका । गौप्यरूपें असे ऐका । आणिक मागतील म्हणोनि ॥७॥

तैसे श्रीगुरुमूर्ति ऐक । राहिले गुप्त कारणिक । वर मागतील सकळिक । नाना याती येवोनियां ॥८॥

विश्वव्यापक जगदीश्वर । तो काय देऊं न शके वर । पाहूनि भक्ति पात्रानुसार । प्रसन्न होय परियेसा ॥९॥

याकारणें तया स्थानीं । श्रीगुरु होते गौप्यगुणीं । शिष्यां सकळांसि बोलावुनी । निरोप देती तीर्थयात्रे ॥१०॥

सकळ शिष्यां बोलावोनि । निरोप देती नृसिंहमुनि । समस्त तीर्थे आचरोनि । यावें भेटी श्रीशैल्या ॥११॥

ऐकोनि श्रीगुरुचे वचना । समस्त शिष्य धरिती चरणा । कृपामूर्ति श्रीगुरुराणा । कां उपेक्षिसी आम्हांसी ॥१२॥

तुमचे दर्शनमात्रेंसी । समस्त तीर्थे आम्हांसी । आम्हीं जावें कवण ठायासी । सोडोनि चरण श्रीगुरुचे ॥१३॥

समस्त तीर्थे श्रीगुरुचरणीं । ऐसें बोलती वेदवाणी । शास्त्रींही तेंचि विवरण । असे स्वामी प्रख्यात ॥१४॥

जवळी असतां निधान । केवीं हिंडावें रानोरान । कल्पवृक्ष सांडून । केवीं जावें देवराया ॥१५॥

श्रीगुरु म्हणती शिष्यांसी । तुम्ही आश्रमी संन्यासी । राहूं नये पांच दिवशीं । एके ठायीं वास करीत ॥१६॥

चतुर्थाश्रम घेऊनि । आचरावीं तीर्थे भुवनीं । तेणें मनीं स्थिर होऊनि । मग रहावें एकस्थानीं ॥१७॥

विशेष वाक्य आमुचें एक । अंगीकारणें धर्म अधिक । तीर्थे हिंडूनि सकळिक । मग यावें आम्हांपाशीं ॥१८॥

'बहुधान्य' नाम संवत्सरासी । येऊं आम्ही श्रीशैल्यासी । तेथें आमुचे भेटीसी । यावें तुम्हीं सकळिक हो ॥१९॥

ऐसेंपरी शिष्यांसी । श्रीगुरु सांगती उपदेश । समस्त लागती चरणांस । ऐक शिष्या नामधारका ॥२०॥

शिष्य म्हणती श्रीगुरुस तुमचें वाक्य आम्हां परीस । जाऊं आम्ही भरंवसें । करुं तीर्थे भूमीवरी ॥२१॥

गुरुचें वाक्य जो न करी । तोचि पडे रौरव-घोरीं । त्याचें घर यमपुरीं । अखंड नरक भोगी जाणा ॥२२॥

जावें आम्हीं कवण तीर्था । निरोप द्यावा गुरुनाथा । तुझें वाक्य दृढ चित्ता । धरुनि जाऊं स्वामिया ॥२३॥

जे जे स्थानीं निरोप देसी । जाऊं तेथें भरंवसीं । तुझे वाक्येंचि आम्हांसी । सिद्धि होय स्वामिया ॥२४॥

ऐकोनि शिष्यांचें वचन । श्रीगुरुमूर्ति प्रसन्नवदन । निरोप देती साधारण । तीर्थयात्रे शिष्यांसी ॥२५॥

या ब्रह्मांडगोलकांत । तीर्थराज काशी विख्यात । तेथें तुम्हीं जावें त्वरित । सेवा गंगाभागीरथी ॥२६॥

भागीरथीतटाकयात्रा । साठी योजनें पवित्रा । साठी कृच्छ्र-फळ तत्र । प्रयाग गंगाद्वारीं द्विगुण ॥२७॥

यमुनानदीतटाकेसी । यात्रा वीस गांव परियेसीं । कृच्छ्र तितुकेचि जाणा ऐसी । एकोमनें अवधारा ॥२८॥

सरस्वती म्हणजे गंगा । भूमीवरी असे चांगा । चतुर्विंशति गांवें अंगा । स्नान करावें तटाकीं ॥२९॥

तितुकेंचि कृच्छ्रफल त्यासी । यज्ञाचें फल परियेसीं । ब्रह्मलोकीं शाश्वतेसीं । राहे नर पितृसहित ॥३०॥

वरुणानदी कुशावर्ती । शतद्रू विपाशका ख्याती । वितस्ता नदी शरावती । नदी असती मनोहर ॥३१॥

मरुद्वृधा नदी थोर । असिक्री मधुमती येर । पयस्वी घृतवतीतीर । तटाकयात्रा तुम्ही करा ॥३२॥

देवनदी म्हणिजे एक । असे ख्याति भूमंडळीक । पंधरा गांवें तटाक । यात्रा तुम्हीं करावी ॥३३॥

जितुके गांव तितके कृच्छ्र । स्नानमात्रें पवित्र । ब्रह्महत्यादि पातकें नाश तत्र । मनोभावें आचरावें ॥३४॥

चंद्रभागा रेवतीसी । शरयू नदी गोमतीसी । वेदिका नदी कौशिकेसी । नित्यजला मंदाकिनी ॥३५॥

सहस्त्रवक्त्रा नदी थोर । पूर्णा पुण्यनदी येर । बाहुदा नदी अरुणा थोर । षोडश गांवें तटाकयात्रा ॥३६॥

जेथें नदीसंगम असती । तेथें स्नानपुण्य अमिती । त्रिवेणीस्नानफळें असतीं । नदीचे संगमीं स्नान करा ॥३७॥

पुष्करतीर्थ वैरोचनि । सन्निहिता नदी म्हणूनि । नदीतीर्थ असे सगुणी । गयातीर्थी स्नान करा ॥३८॥

सेतुबंध रामेश्वरीं । श्रीरंग पद्मनाभ-सरीं । पुरुषोत्तम मनोहरी । नैमिषारण्य तीर्थ असे ॥३९॥

बदरीतीर्थ नारायण । नदी असती अति पुण्य । कुरुक्षेत्रीं करा स्नान । अनंत श्रीशैल्ययात्रेसी ॥४०॥

महालयतीर्थ देखा । पितृप्रीति तर्पणें ऐका । द्विचत्वारि कुळें निका । स्वर्गासी जाती भरंवसीं ॥४१॥

केदारतीर्थ पुष्करतीर्थ । कोटिरुद्र नर्मदातीर्थ । मातृकेश्वर कुब्जतीर्थ । कोकामुखी विशेष असे ॥४२॥

प्रसादतीर्थ विजयतीर्थ । पुरी चंद्रनदीतीर्थ । गोकर्ण शंखकर्ण ख्यात । स्नान बरवें मनोहर ॥४३॥

अयोध्या मथुरा कांचीसी । द्वारावती गयेसी । शालग्रामतीर्थासी । शबलग्राम मुक्तिक्षेत्र ॥४४॥

गोदावरीतटाकेसी । योजनें सहा परियेसीं । तेथील महिमा आहे ऐसी । वांजपेय तितुकें पुण्य ॥४५॥

सव्यअपसव्य वेळ तीनी । तटाकयात्रा मनोनेमीं । स्नान करितां होय ज्ञानी । महापातकी शुद्ध होय ॥४६॥

आणिक दोनी तीर्थे असतीं । प्रयागसमान असे ख्याति । भीमेश्वर तीर्थ म्हणती । वंजरासंगम प्रख्यात ॥४७॥

कुशतर्पण तीर्थ बरवें । तटाकयात्रा द्वादश गांवें । गोदावरी-समुद्रसंगमें । षट्त्रिंशत कृच्छ्रफळ ॥४८॥

पूर्णा नदीतटाकेंसी । चारी गांवें आचरा हर्षी । कृष्णावेणीतीरासी । पंधरा गांवें तटाकयात्रा ॥४९॥

तुंगभद्रातीर बरवें । तटाकयात्रा वीस गांवें । पंपासरोवर स्वभावें । अनंतमहिमा परियेसा ॥५०॥

हरिहरक्षेत्र असे ख्याति । समस्त दोष परिहरती । तैसीच असे भीमरथी । दहा गांवें तटाकयात्रा ॥५१॥

पांडुरंग मातुलिंग । क्षेत्र बरवें पुरी गाणग । तीर्थे असती तेथें चांग । अष्टतीर्थे मनोहर ॥५२॥

अमरजासंगमांत । कोटि तीर्थे असतीं ख्यात । वृक्ष असे अश्वत्थ । कल्पवृक्ष तोचि जाणा ॥५३॥

तया अश्वत्थसन्मुखेंसी । नृसिंहतीर्थ परियेसीं । तया उत्तरभागेसी । वाराणसी तीर्थ असे ॥५४॥

तया पूर्वभागेसी । तीर्थ पापविनाशी । तदनंतर कोटितीर्थ विशेष । पुढें रुद्रपादतीर्थ असे ॥५५॥

चक्रतीर्थ असे एक । केशव देवनायक । ते प्रत्यक्ष द्वारावती देख । मन्मथतीर्थ पुढें असे ॥५६॥

कल्लेश्वर देवस्थान । असे तेथें गंधर्वभुवन । ठाव असे अनुपम्य । सिद्धभूमि गाणगापुर ॥५७॥

तेथें जे अनुष्ठान करिती । तया इष्टार्थ होय त्वरितीं । कल्पवृक्ष आश्रयती । कान नोहे मनकामना ॥५८॥

काकिणीसंगम बरवा । भीमातीर क्षेत्र नांवा । अनंत पुण्य स्वभावा । प्रयागासमान असे देखा ॥५९॥

तुंगभद्रा वरदा नदी । संगमस्थानीं तपोनिधी । मलापहारीसंगमीं आधीं । पापें जातीं शतजन्मांचीं ॥६०॥

निवृत्तिसंगम असे ख्याति । ब्रह्महत्या नाश होती । जावें तुम्हीं त्वरिती । श्रीगुरु म्हणती शिष्यांसी ॥६१॥

सिंहराशीं बृहस्पति । येतां तीर्थे संतोषती । समस्त तीर्थी भागीरथी । येऊनियां ऐक्य होय ॥६२॥

कन्यागतीं कृष्णेप्रती । त्वरित येते भागीरथी । तुंगभद्रा तुळागतीं । सुरनदीप्रवेश परियेसा ॥६३॥

कर्काटकासी सूर्य येतां । मलप्रहरा कृष्णासंयुता । सर्व जन स्नान करितां । ब्रह्महत्या पापें जातीं ॥६४॥

भीमाकृष्णासंगमेसीं । स्नान करितां परियेसीं । साठ जन्म विप्रवंशीं । उपजे नर परियेसा ॥६५॥

तुंगभद्रासंगमीं देखा । त्याहूनि त्रिगुण अधिका । निवृत्तिसंगमीं ऐका । चतुर्गुण त्याहूनि ॥६६॥

पाताळगंगेचिये स्नानीं । मल्लिकार्जुनदर्शनीं । षड्गुण फल तयाहूनि । पुनरावृत्ति त्यासी नाहीं ॥६७॥

लिंगालयीं पुण्य द्विगुण । समुद्रकृष्णासंगमीं अगण्य । कावेरीसंगमीं पंधरा गुण । स्नान करा मनोभावें ॥६८॥

ताम्रपर्णी याचिपरी । पुण्य असंख्य स्नानमात्रीं । कृतमालानदीतीरीं । सर्व पाप परिहरे ॥६९॥

पयस्विनी नदी आणिक । भवनाशिनी अतिविशेष । सर्व पापें हरती ऐक । समुद्रस्कंधदर्शनें ॥७०॥

शेषाद्रिक्षेत्र श्रीरंगनाथ । पद्मनाभ श्रीमदनंत । पूजा करोनि जावें त्वरित । त्रिनामल्लक्षेत्रासी ॥७१॥

समस्त तीर्थांसमान । असे आणिक कुंभकोण । कन्याकुमारी-दर्शन । मत्स्यतीर्थीं स्नान करा ॥७२॥

पक्षितीर्थ असे बरवें । रामेश्वर धनुष्कोटी नावें । कावेरी तीर्थ बरवें । रंगनाथा संनिध ॥७३॥

पुरुषोत्तम चंद्रकुंडेसीं । महालक्ष्मी कोल्हापुरासी । कोटितीर्थ परियेसीं । दक्षिण काशी करवीरस्थान ॥७४॥

महाबळेश्वर तीर्थ बरवें । कृष्णाउगम तेथें पहावें । जेथें असे नगर 'बहें' । पुण्यक्षेत्र रामेश्वर ॥७५॥

तयासंनिध असे ठाव । कोल्हग्रामीं नृसिंहदेव । परमात्मा सदाशिव । तोचि असे प्रत्यक्ष ॥७६॥

भिल्लवडी कृष्णातीरीं । शक्ति असे भुवनेश्वरी । तेथें तप करिती जरी । तेचि ईश्वरीं ऐक्यता ॥७७॥

वरुणासंगमीं बरवें । तेथें तुम्ही मनोभावें । स्नान करा मार्कंडेय-नांवें । संगमेश्वरू पूजावा ॥७८॥

ऋषींचे आश्रम । कृष्णातीरीं असती उत्तम । स्नान करितां होय ज्ञान । तयासंनिध कृष्णेपुढें ॥७९॥

पुढें कृष्णाप्रवाहांत । अमरापुर असे ख्यात । पंचगंगासंगमांत । प्रयागाहूनि पुण्य अधिक ॥८०॥

अखिल तीर्थे तया स्थानीं । तप करिती सकळ मुनि । सिद्ध होय त्वरित ज्ञानी । अनुपम क्षेत्र परियेसा ॥८१॥

ऐसें प्रख्यात तया स्थानीं । अनुष्ठितां दिवस तीनी । अखिलाभीष्ट पावोनि । पावती त्वरित परमार्थी ॥८२॥

जुगालय तीर्थ बरवें । दृष्टीं पडतां मुक्त व्हावें । शूर्पालय तीर्थ बरवें । असे पुढें परियेसा ॥८३॥

विश्वामित्रऋषि ख्याति । तप 'छाया' भगवती । तेथें समस्त दोष जाती । मलप्रहरासंगमीं ॥८४॥

कपिलऋषि विष्णुमूर्ति । प्रसन्न त्यासि गायत्री । श्वेतशृंगीं प्रख्याति । उत्तरवाहिनी कृष्णा असे ॥८५॥

तया स्थानीं स्नान करितां । काशीहूनि शतगुणिता । एक मंत्र तेथें जपतां । कोटीगुणें फळ असे ॥८६॥

आणिक असे तीर्थ बरवें । केदारेश्वरातें पहावें । पीठापुरीं दत्तात्रेयदेव - । वास असे सनातन ॥८७॥

आणिक असे तीर्थ थोरी । प्रख्यात नामें मणिगिरि । सप्तऋषीं प्रीतिकरीं । तप केलें बहु दिवस ॥८८॥

वृषभाद्रि कल्याण नगरी । तीर्थे असतीं अपरंपारी । नव्हे संसारयेरझारी । तया क्षेत्रा आचरावें ॥८९॥

अहोबळाचें दर्शन । साठी यज्ञ पुण्य जाण । श्रीगिरीचें दर्शन । नव्हे जन्म मागुती ॥९०॥

समस्त तीर्थे भूमीवरी । आचरावीं परिकरी । रजस्वला होतां सरी । स्नान करितां दोष होय ॥९१॥

संक्रांति कर्काटक धरुनि । त्यजावे तुम्हीं मास दोनी । नदीतीरीं वास करिती कोणी । त्यांसी कांहीं दोष नाहीं ॥९२॥

तयांमध्यें विशेष । त्यजावें तुम्हीं तीन दिवस । रजस्वला नदी सुरस । महानदी येणेंपरी ॥९३॥

भागीरथी गौतमीसी । चंद्रभागा सिंधूनदीसी । नर्मदा शरयू परियेसीं । त्यजावें तुम्हीं दिवस तीनी ॥९४॥

ग्रीष्मकाळीं सर्व नदींस । रजस्वला दहा दिवस । वापी-कूट-तटाकांस । एक रात्र वर्जावें ॥९५॥

नवें उदक जया दिवसीं । येतां ओळखा रजस्वलेसी । स्नान करितां महादोषी । येणेंपरी वर्जावें ॥९६॥

साधारण पक्ष तुम्हांसी । सांगितलीं तीर्थे परियेसीं । जें जें पहाल दृष्टीसीं । विधिपूर्वक आचरावें ॥९७॥

ऐकोनि श्रीगुरुंचें वचन । शिष्य सकळ करिती नमन । गुरुनिरोप कारण । म्हणोनि निघती सकळिक ॥९८॥

सिद्ध म्हणे नामधारकासी । निरोप घेऊनि श्रीगुरुसी । शिष्य गेले यात्रेसी । राहिले श्रीगुरू गौप्यरुपें ॥९९॥

म्हणे सरस्वतीगंगाधर । पुढील कथेचा विस्तार । ऐकतां होय मनोहर । सकळाभीष्टें साधती ॥१००॥

गुरुचरित्र कामधेनु । श्रोते होवोनि सावधानु । जे ऐकती भक्तजनु । लाधती चारी पुरुषार्थ ॥१॥

ब्रह्मरसाची गोडी । सेवितों आम्हीं घडोघडी । ज्यांसी होय आवडी । साधे त्वरित परमार्थ ॥१०२॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्ध-नामधारकसंवादे तीर्थयात्रा निरुपणं नाम पंचदशोऽध्यायः ॥१५॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेव दत्त ॥

( ओंवीसंख्या १०२ )

## अध्याय सोळावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

विनवी शिष्य नामांकित । सिद्धासी असे पुसत । सांगा स्वामी वृत्तांत । गुरुचरित्र विस्तारुनि ॥१॥

शिष्य समस्त गेले यात्रेसी । राहिले कोण गुरुपाशीं । पुढें कथा वर्तली कैसी । विस्तारावें दातारा ॥२॥

ऐकोनि शिष्याची वाणी । संतोषी झाले सिद्ध मुनि । धन्य धन्य शिष्या शिरोमणि । गुरुभक्ता नामधारका ॥३॥

अविद्यामायासुषुप्तींत । निजलें होतें माझें चित्त । तुजकरितां जाहलें चेत । ज्ञानज्योति-उदय मज ॥४॥

तूंचि माझा प्राणसखा । ऐक शिष्या नामधारका । तुजकरितां जोडलों सुखा । गुरुचरित्र आठवलें ॥५॥

अज्ञानतिमिरउष्णांत । पीडोनि आलों कष्टत । सुधामृतसागरांत । तुवां मातें लोटिलें ॥६॥

तुवां केले उपकारासी । संतुष्ट झालों मानसीं । पुत्रपौत्रीं तूं नांदसी । दैन्य नाहीं तुझे घरीं ॥७॥

गुरुकृपेचा तूं बाळक । तुज मानिती सकळ लोक । संदेह न करीं घे भाक । अष्टैश्वर्ये नांदसी ॥८॥

गुरुचरित्रकामधेनु । सांगेन तुज विस्तारुनु । श्रीगुरू राहिले गौप्य होऊन । वैजनाथसंनिधेसीं ॥९॥

समस्त शिष्य तीर्थेसी । स्वामीनिरोपें गेले परियेसीं । होतों आपण गुरुपाशीं । सेवा करीत अनुक्रमें ॥१०॥

संवत्सर एक तया स्थानीं । होते गौप्य श्रीगुरु मुनि । अंबा आरोग्यभवानी । स्नान बरवें मनोहर ॥११॥

असतां तेथें वर्तमानीं । आला ब्राह्मण एक मुनि । श्रीगुरुतें देखोनि । नमन करी भक्तिभावें ॥१२॥

माथा ठेवूनि चरणांवरी । स्तोत्र करी परोपरी । स्वामी मातें तारीं तारीं । अज्ञानसागरीं बुडालों ॥१३॥

तप करतों बहु दिवस । स्थिर नव्हे गा मानस । याचि कारणें ज्ञानास । न दिसे मार्ग आपणातें ॥१४॥

ज्ञानाविणें तापसा । वृथा होती सायास । तुम्हां देखतां मानसा । हर्ष जाहला आजि मज ॥१५॥

गुरुची सेवा बहुत दिवस । केली नाहीं सायासें । याचिकारणें मानस । स्थिर नव्हे स्वामिया ॥१६॥

तूं तारक विश्वासी । जगद्गुरू तूंचि होसी । उपदेश करावा आम्हांसी । ज्ञान होय त्वरितेसीं ॥१७॥

ऐकोनि मुनीचें वचन । श्रीगुरू पुसती हांसोन । जाहलासी तूं केवीं मुनि । गुरुविणें सांग मज ॥१८॥

ऐसें म्हणतां श्रीगुरुमूर्ति । मुनीच्या डोळां अश्रुपाती । दुःख दाटलें अपरमिति । ऐक स्वामी गुरुराया ॥१९॥

गुरु होता आपणासी एक । अतिनिष्ठुर त्याचें वाक्य । मातें गांजिलें अनेक । अकृत्य सेवा सांगे मज ॥२०॥

न सांगे वेदशास्त्र आपण । तर्कभाष्यादि व्याकरण । म्हणे तुझें अंतःकरण । स्थिर नव्हे अद्यापि ॥२१॥

म्हणोनि सांगे आणिक कांहीं । आपुलें मन स्थिर नाहीं । करी त्याचे बोल वायी । आणिक कोप करी मज ॥२२॥

येणेंपरी बहुत दिवशीं । होतों तया गुरुपाशीं । बोले मातें निष्ठुरेसीं । कोपोनि आलों तयावरी ॥२३॥

ऐकोनि तयाचें वचन । श्रीगुरुमूर्ति हास्यवदन । म्हणती ऐकें ब्राह्मणा । आत्मघातकी तूंचि होसी ॥२४॥

एखादा मूर्ख आपुले घरीं । मळ विसर्जी देव्हारीं । आपुलें अदृष्ट ऐसेपरी । म्हणोनि सांगे सकळिकां ॥२५॥

तैसें तुझें अंतःकरण । आपुलें नासिक छेदून । पुढिल्यातें अपशकुन । करुनि रहासी तूंचि एक ॥२६॥

न विचारिसी आपुले गुण । तूतें कैंचें होय ज्ञान । गुरुद्रोही तूंचि जाण । अल्पबुद्धि परियेसा ॥२७॥

आपुले गुरूचे गुणदोष । सदा उच्चार करिसी हर्षे । ज्ञान कैंचें होय मानस । स्थिर होय केवीं आतां ॥२८॥

जवळी असतां निधानु । कां हिंडावें रानोरानु । गुरु असतां कामधेनू । वंचूनि आलासी आम्हांजवळी ॥२९॥

गुरुद्रोही कवण नर । त्यासी नाहीं इह पर । ज्ञान कैंचें होय पुरें । तया दिवांधकासी ॥३०॥

जो जाणे गुरुची सोय । त्यासी सर्व ज्ञान होय । वेदशास्त्र सर्व होये । गुरु संतुष्ट होतांचि ॥३१॥

संतुष्टवितां श्रीगुरुसी । अष्टसिद्धि आपुले वशी । क्षण न लागतां परियेसीं । वेदशास्त्र त्यासी साध्य ॥३२॥

ऐकोनि श्रीगुरूचें वचन । माथा श्रीगुरुचरणीं ठेवून । विनवीतसे कर जोडून । करुणावचनेंकरुनियां ॥३३॥

जय जया जगद्‌गुरु । निर्गुण तूं निर्विकारु । ज्ञानसागर अपरांपरु । उद्धरावें आपणातें ॥३४॥

अज्ञानमाया वेष्टोन । नेणे गुरु कैसा कवण । सांगा स्वामी प्रकाशोन । ज्ञान होय आपणासी ॥३५॥

कैसा गुरु ओळखावा । कोणेपरी आहे सेवा । प्रकाश करोनि सांगावा । विश्ववंद्य गुरुमूर्ति ॥३६॥

जेणें माझें मन स्थिरु । होऊनि ओळखे सोयगुरु । तैसा करणें उपकारु । म्हणोनि चरणीं लागला ॥३७॥

करुणावचन ऐकोनि । श्रीगुरुनाथ संतोषोनि । सांगताति विस्तारोनि । गुरुसेवाविधान ॥३८॥

श्रीगुरु म्हणती ऐक मुनि । गुरु म्हणजे जनकजननी । उपदेशकर्ता आहे कोणी । तोचि जाण परम गुरु ॥३९॥

गुरु विरिंचि हर जाण । स्वरुप तोचि नारायण । मन करुनि निर्वाण । सेवा करावी भक्तीनें ॥४०॥

यदर्थी कथा एक । सांगों आम्ही तत्पर ऐक । आदिपर्वी असे निक । गुरुसेवा भक्तिभावें ॥४१॥

द्वापारांतीं परियेसीं । विप्र एक धौम्यऋषी । तिघे शिष्य होते त्यासी । वेदाभ्यास करावया

॥४२॥

एक 'आरुणी' पांचाळ । दुसरा 'बैद' केवळ । तिसरा 'उपमन्यु' बाळ । सेवा करिती विद्येलागीं ॥४३॥

पूर्वी गुरुची ऐसी रीति । शिष्याकरवीं सेवा घेती । अंतःकरण त्याचें पहाती । निर्वाणवरी शिष्याचें ॥४४॥

पाहोनियां अंतःकरण । असे भक्ति निर्वाण । कृपा करिती तत्क्षण । मनकामना पुरविती ॥४५॥

ऐसा धौम्यमुनि भला । तया आरूणी-पांचाळा । एके दिवशीं निरोप दिल्हा । ऐक द्विजा एकचित्तें ॥४६॥

शिष्यासी म्हणे धौम्यमुनि । आजि तुवां जावोनि रानीं । वृत्तीसी न्यावें तटाकपाणी । जंववरी होय तृप्त भूमि ॥४७॥

असे वृत्ति तळें खालीं । तेथें पेरिली असे साळी । तेथें नेवोनि उदक घालीं । शीघ्र म्हणे शिष्यासी ॥४८॥

ऐसा गुरुचा निरोप होतां । गेला शिष्य धांवत । तटाक असे पाहतां । कालवा थोर वहातसे ॥४९॥

जेथें उदक असे वहात । अतिदरारा गर्जत । वृत्तिभूमि उन्नत । उदक केवीं चढों पाहे ॥५०॥

म्हणे आतां काय करुं । कोपतील मातें श्रीगुरु । उदक जातसे दरारू । केवीं बांधूं म्हणतसे ॥५१॥

आणूनियां शिळा दगड । बांधिता जाहला उदका आड । पाणी जातसे धडाड । जाती पाषाण वाहोनियां ॥५२॥

प्रयत्न करी नानापरी । कांहीं केलिया न चढे वारी । म्हणे देवा श्रीहरि । काय करुं म्हणतसे ॥५३॥

मग मनीं विचार करी । गुरूचे शेतीं न चढे वारी । प्राण त्यजीन निर्धारीं । गुरुचे वृत्तीनिमित्त ॥५४॥

निश्चय करुनि मानसीं । मनीं ध्याई श्रीगुरुसी । म्हणे आतां उपाय यासी । योजूनि यत्न करावा ॥५५॥

घालितां उदकप्रवाहांत । जाती पाषाण वहात । आपण आड पडों म्हणत । निर्धारिलें तया वेळीं ॥५६॥

दोन्ही हातीं धरीं दरडी । पाय टेकी दुसरेकडी । झाला आपण उदकाआड । मनीं श्रीगुरुसी ध्यातसे ॥५७॥

ऐसा शिष्यशिरोमणि । निर्वाण मन करितांक्षणीं । वृत्तीकडे गेलें पाणी । प्रवाहाचें अर्ध देखा ॥५८॥

अर्ध पाणी जैसें तैसें । वाहतसे नित्यसरिसें । तयामध्यें शिष्य संतोषें । बुडाला असे अवधारा ॥५९॥

ऐसा शिष्य तया स्थानीं । बुडाला असे प्रवाहपाणीं । गुरुची वृत्ति जाहली धणी । उदकपूर्ण परियेसा ॥६०॥

त्याचा गुरु धौम्यमुनि । विचार करी आपुले मनीं । दिवस गेला अस्तमानीं । अद्यापि शिष्य न ये म्हणे ॥६१॥

ऐसें आपण विचारीत । गेला आपुले वृत्तींत । जाहलें असे उदक बहुत । न देखे शिष्य तया स्थानीं ॥६२॥

म्हणे शिष्या काय जाहलें । किंवा भक्षिलें व्याघ्रव्याळें । उदकानिमित्त कष्ट केले । कोठें असे म्हणतसे ॥६३॥

ऐसें मनीं विचारीत । उंच स्वरें पाचारीत । अरे शिष्या सखया म्हणत । प्रेमभावें बोलावी ॥६४॥

येणेंपरी करुणावचनीं । पाचारीतसे धौम्यमुनि । शब्द पडे शिष्यकानीं । तेथूनि मग निघाला ॥६५॥

येवोनियां श्रीगुरुसी । नमन केलें भावेसीं । धौम्यमुनीं महाहर्षी । आलिंगोनि आश्वासिलें ॥६६॥

वर दिधला तया वेळीं । ऐक शिष्या स्तोममौळी । तूतें विद्या आली सकळी । वेदशास्त्रादि व्याकरण ॥६७॥

ऐसें म्हणतां तत्क्षणीं । झाला विद्यावंत ज्ञानी । लागतसे गुरुचरणीं । भक्तिभावेंकरुनियां ॥६८॥

कृपानिधि धौम्यमुनि । आपुले आश्रमा नेऊनि । निरोप दिल्हा संतोषोनि । विवाहादि आतां करीं म्हणे ॥६९॥

निरोप घेऊनि शिष्यराणा । गेला आपुले स्थाना । आणिक दोघे शिष्य जाणा । होते तया गुरुजवळी ॥७०॥

दुसरा शिष्य 'बैद' जाणा । गुरुची करी शुश्रूषणा । त्याचे पहावया अंतःकरणा । धौम्य गुरु म्हणतसे ॥७१॥

धौम्य म्हणे शिष्यासी । सांगेन एक तुजसी । तुवां जाऊनि अहर्निशीं । वृत्ति आमुची रक्षिजे ॥७२॥

रक्षूनियां वृत्तीसी । आणावें धान्य घरासी । ऐसें म्हणतां महाहर्षी । गेला तया वृत्तीकडे ॥७३॥

वृत्ति पिके जंववरी । अहोरात्रीं कष्ट करी । राशी होतां अवसरीं । आला आपुले गुरुपाशीं ॥७४॥

सांगता जाहला श्रीगुरुसी । म्हणे व्रीही भरले राशीं । आतां आणावें घरासी । काय निरोप म्हणतसे ॥७५॥

मग म्हणे धौम्यमुनि । बा रे शिष्या शिरोमणि । कष्ट केले बहुत रानीं । आतां धान्य आणावें ॥७६॥

म्हणोनि देती एक गाडा । तया जुंपोनि एक रेडा । गुरु म्हणे जावें पुढा । शीघ्र यावें म्हणतसे ॥७७॥

एकीकडे जुंपी रेडा । आपण ओढी दुसरीकडा । येणेंपरी घेवोनि गाडा । आला तया वृत्तीजवळी ॥७८॥

दोनी खंडी साळीसी । भरी शिष्य गाडियासी । एकीकडे रेडियासी । जुंपोनि ओढी आपण देखा ॥७९॥

रेडा चाले शीघ्रेंसीं । आपण न ये तयासरसी । मग आपुले कंठासी । बांधिता झाला जूं देखा ॥८०॥

सत्राणें तयासरसी । चालत आला मार्गासी । रुतला रेडा चिखलेंसीं । आपुले गळां ओढीतसे ॥८१॥

चिखलीं रुतला रेडा म्हणोनि । चिंता करी बहु मनीं । आपण ओढी सत्राणीं । गळां फांस पडे जैसा ॥८२॥

सोडूनियां रेडियासी । काढिलें शिष्यें गाडियासी । ओढितां आपुले गळां फांसी । पडूनि प्राण त्यजूं पाहे ॥८३॥

इतुकें होतां निर्वाणीं । सन्मुख पातला धौम्यमुनि । त्या शिष्यातें पाहोनि नयनीं । कृपा अधिक उपजली ॥८४॥

सोडूनियां शिष्यातें । आलिंगोनि करूणाभरितें । वर दिधला अभिमतें । संपन्न होसी वेदशास्त्रीं ॥८५॥

वर देतां तत्क्षणेसीं । सर्व विद्या आली त्यासी । निरोप घेऊनियां घरासी । गेला शिष्य परियेसा ॥८६॥

तिसरा शिष्य उपमन्यु । सेवेविषयीं महानिपुण । गुरुची सेवा-शुश्रूषण । बहु करी परियेसा ॥८७॥

त्यासी व्हावा बहुत आहार । म्हणोनि विद्या नोहे स्थिर । त्यासी विचार करीत तो गुरु । यातें करावा उपाय एक ॥८८॥

त्यासी म्हणे धौम्यमुनि । तुज सांगतों म्हणोनि । नित्य गुरें नेऊनि रानीं । रक्षण करीं तृणचारें ॥८९॥

ऐसें म्हणतां गुरुमुनि । नमन करी त्याचे चरणीं । गुरें नेऊनियां रानीं । चारवीत बहुवस ॥९०॥

क्षुधा लागतां आपणासी । शीघ्र आणिलीं घरासी । कोपें गुरु तयासी । म्हणे शीघ्र येतोसि कां रे ॥९१॥

सूर्य जाय अस्तमानीं । तंववरी राखीं गुरें रानीं । येणेंपरी प्रतिदिनीं । वर्तावें तुवां म्हणतसे ॥९२॥

अंगीकारोनि शिष्यराणा । गुरें घेवोनि गेला राना । क्षुधाक्रांत होऊनि जाणा । चिंतीतसे श्रीगुरुसी ॥९३॥

चरती गुरें नदीतीरीं । आपण तेथें स्नान करी । तयाजवळी घरें चारी । असती विप्रआश्रम तेथें ॥९४॥

जाऊनियां तया स्थाना । भिक्षा मागे परिपूर्ण । भोजन करी सावधान । गोधन रक्षी येणेंपरी ॥९५॥

येणेंपरी प्रतिदिवशीं । रक्षूनि आणी गुरें निशीं । वर्ततां ऐसें येरे दिवशीं । पुसता झाला धौम्यमुनि ॥९६॥

गुरु म्हणे शिष्यासी । तूं नित्य उपवासी । तुझा देह पुष्टीसी । कवणेपरी होतसे ॥९७॥

ऐकोनि श्रीगुरुचें वचन । सांगे शिष्य उपमन्य । भिक्षा करितों प्रतिदिन । विप्रांघरीं तेथें देखा ॥९८॥

भोजन करुनि प्रतिदिवसीं । गुरें घेवोनि येतों निशीं । श्रीगुरु म्हणती तयासी । आम्हां सांडूनि केवीं भुक्ती ॥९९॥

भिक्षा मागोनि घरासी । आणोनि द्यावी प्रतिदिवसीं । मागुती जावें गुरांपाशीं । घेऊन यावें निशिकाळीं ॥१००॥

गुरुनिरोपें येरे दिवशीं । गुरें नेऊनि रानासी । मागे भिक्षा नित्य जैसी । नेऊनि दिधली घरांत ॥१॥

घरीं त्यासी भोजन । कधीं नव्हे परिपूर्ण । पुनरपि जाई तया स्थाना । भिक्षा करुनि जेवीतसे ॥२॥

नित्य भिक्षा वेळां दोनी । पहिली भिक्षा देवोनि सदनीं । दुसरी आपण भक्षूनि । काळ ऐसा कंठीतसे ॥३॥

येणेंपरी किंचित्काळ । वर्ततां जाहला महास्थूळ । एके दिवशीं गुरु कृपाळ । पुसतसे शिष्यातें ॥४॥

शिष्य सांगे वृत्तांत । जेणें आपुली क्षुधा शमत । नित्य भिक्षा मागत । वेळ दोनी म्हणतसे ॥५॥

एक वेळ घरासी । आणोनि देतों प्रतिदिवसीं । भिक्षा दुसरे खेपेसी । करितों भोजन आपण ॥६॥

ऐसें म्हणतां धौम्यमुनि । तया शिष्यावरी कोपोनि । म्हणे भिक्षा वेळ दोनी । आणूनि घरीं देईं पां ॥७॥

गुरुनिरोप जेणेंपरी । दोनी भिक्षा आणूनि घरीं । देता जाहला प्रीतिकरीं । मनीं क्लेश न करीच ॥८॥

गुरेंसहित रानांत । असे शिष्य क्षुधाक्रांत । गोवत्स होतें स्तन पीत । देखता जाहला तयासी ॥९॥

स्तन पीतां वांसुरासी । उच्छिष्ट गळे संधींसी । वायां जातें भूमीसी । म्हणोनि आपण जवळी गेला ॥११०॥

आपण असे क्षुधाक्रांत । म्हणोनि गेला धांवत । पसरुनिया दोनी हात । धरी उच्छिष्ट क्षीर देखा ॥११॥

ऐसें क्षीरपान करीं । घेऊनि आपुलें उदर भरी । दोनी वेळ भिक्षा घरीं । देतसे भावभक्तीनें ॥१२॥

अधिक पुष्ट जाहला त्याणें । म्हणे गुरु अवलोकून । पहा हो याचें शरीरलक्षण । कैसा स्थूळ होतसे ॥१३॥

मागुती पुसे तयासी । कवणेपरी पुष्ट होसी । सांगे आपुले वृत्तांतासी । उच्छिष्ट क्षीर पान करितों ॥१४॥

ऐकोनि म्हणे शिष्यासी । मतिहीन होय उच्छिष्टेसीं । दोष असे बहुवसी । भक्षूं नको आजिचेनी ॥१५॥

भक्षूं नको म्हणे गुरू । नित्य नाहीं तया आहारु । दुसरे दिवशीं म्हणे येरु । काय करुं म्हणतसे ॥१६॥

येणेंपरी गुरेंसहित । जात होता रानांत । गळत होतें क्षीर बहुत । एका रुईचे झाडासी ॥१७॥

म्हणे बरवें असे क्षीर । उच्छिष्ट नव्हे निर्धार । पान करूं धणीवर । म्हणोनि तेथें बैसला ॥१८॥

पानें तोडूनि कुसरीं । तयामध्यें क्षीर भरी । घेत होता धणीवरी । तंव भरिलें अक्षियांत ॥१९॥

तेणें गेले नेत्र दोनी । हिंडतसे रानोवनीं । गुरें न दिसती नयनीं । म्हणोनि चिंता करीतसे ॥१२०॥

काष्ट नाहीं अक्षिहीन । करीतसे चिंता गोधना । गुरें पाहों जातां राना । पडिला एका आडांत ॥२१॥

पडोनियां आडांत । चिंता करी तो अत्यंत । आतां गुरें गेलीं सत्य । बोल गुरुचा आला मज ॥२२॥

पडिला शिष्य तया स्थानीं । दिवस गेला अस्तमानीं । चिंता करी धौम्यमुनि। अजूनि शिष्य न येचि कां ॥२३॥

म्हणोनि गेला रानासी । देखे तेथें गोधनासी । शिष्य नाहीं म्हणोनि क्लेशीं । दीर्घस्वरें पाचारी ॥२४॥

पाचारितां धौम्यमुनि। ध्वनि पडला शिष्यकानीं । प्रत्योत्तर देतांक्षणीं । जवळी गेला कृपाळू ॥२५॥

ऐकोनियां वृत्तांत । उपजे कृपा अत्यंत । अश्विनी देवा स्तवीं म्हणत । निरोप दिधला तये वेळीं ॥२६॥

निरोप देतां तये क्षणीं । अश्विनी देवता ध्याय मनीं । दृष्टि आली दोनी नयनीं । आला श्रीगुरुसन्मुखेसीं ॥२७॥

येवोनि श्रीगुरुसी । नमन केलें भक्तीसीं । स्तुति केली बहुवसी । शिष्योत्तमें तये वेळीं ॥२८॥

संतोषोनि धौम्यमुनी । तया शिष्या आलिंगोनि । म्हणे शिष्या शिरोमणी । तुष्टलों तुझ्या भक्तीसी ॥२९॥

प्रसन्न होऊनि शिष्यासी । हस्त स्पर्शी मस्तकेसी । वेदशास्त्रादि तत्क्षणेसीं । आलीं तया शिष्यातें ॥१३०॥

गुरु म्हणे शिष्यासी । जावें आपुले घरासी । विवाहादि करुनि सुखेसीं । नांदत ऐस म्हणतसे ॥३१॥

होईल तुझी बहु कीर्ति । शिष्य होतील तुज अत्यंती । 'उत्तंक' नाम विख्याति । शिष्य तुझा परियेसीं ॥३२॥

तोचि तुझ्या दक्षिणेसी । आणील कुंडलें परियेसीं । जिंकोनियां शेषासी । कीर्तिवंत होईल ॥३३॥

जन्मेजय रायासी । तोच करील उपदेशी । मारवील समस्त सर्पांसी । याग करुनि परियेसा ॥३४॥

तोचि उत्तंक जाऊन । पुढें केला सर्पयज्ञ । जन्मेजयातें प्रेरुन । समस्त सर्प मारविले ॥३५॥

ख्याति जाहली त्रिभुवनांत । तक्षक आणिला इंद्रासहित । गुरुकृपेचें सामर्थ्य । ऐसें असे परियेसा ॥३६॥

जो नर असेल गुरुदूषक । त्यासी कैंचा परलोक । अंतीं होय कुंभीपाक । गुरुद्रोह-पातक्यासी ॥३७॥

संतुष्ट करितां गुरुसी । काय न साधे तयासी । वेदशास्त्र तयासी । लाधे क्षण न लागतां ॥३८॥

ऐसें तूं जाणोनि मानसीं । वृथा हिंडसी अविद्येसीं । जावें आपुले गुरुपाशीं । तोचि तुज तारील सत्य ॥३९॥

त्याचें मन संतुष्टवितां । तुज मंत्र साध्य तत्त्वता । मन करुनि सुनिश्चिता । त्वरित जाईं म्हणितलें ॥१४०॥

ऐसा श्रीगुरू निरोप देतां । विप्र जाहला अतिज्ञाता । चरणांवरी ठेवूनि माथा । विनवीतसे तया वेळीं ॥४१॥

जय जया गुरुमूर्ति । तूंचि साधन परमार्थी । मातें निरोपिलें प्रीतीं । तत्त्वबोध कृपेनें ॥४२॥

गुरुद्रोही आपण सत्य । अपराध घडले मज बहुत । गुरुचें दुखविलें चित्त । आतां केवीं संतुष्टवावें ॥४३॥

सुवर्णादि लोह सकळ । भिन्न होतां सांधवेल । भिन्न होतां मुक्ताफळ । केवीं पुन्हा ऐक्य होय ॥४४॥

अंतःकरण भिन्न होतां । प्रयास असे ऐक्य करितां । ऐसें माझें मन पतित । काय उपयोग जीवूनि ॥४५॥

ऐसें शरीर माझें द्रोही । काय उपयोग वांचून पाहीं । जीवित्वाची वासना नाहीं । प्राण त्यजीन गुरुप्रति ॥४६॥

ऐसेपरी श्रीगुरुसी । विनवितो ब्राह्मण हर्षी । नमूनि निघे वैराग्येसीं । निश्चय केला प्राण त्यजूं ॥४७॥

अनुतप्त जाहला तो ब्राह्मण । निर्मळ जाहलें अंतःकरण । अग्नि लागतां जैसें तृण । भस्म होय तत्क्षणीं ॥४८॥

जैसा कापूरराशीसी । वन्हि लागतां परियेसीं । जळोनि जाय त्वरितेसीं । तैसें तयासी जहालें ॥४९॥

याकारणें पापासी । अनुतप्त होतां मानसीं । क्षालण होय त्वरितेसीं । शतजन्मींचें पाप जाय ॥१५०॥

निर्वाणरुपें द्विजवर । निघाला त्यजूं कलेवर । ओळखोनियां जगद्गुरु । पाचारिती तयावेळीं ॥५१॥

बोलावोनि ब्राह्मणासी । निरोप देती कृपेसीं । न करीं चिंता तूं मानसीं । गेले तुझे दुरितदोष ॥५२॥

वैराग्य उपजलें तुझ्या मनीं । दुष्कृतें गेलीं जळोनि । एकचित्त करुनि मनीं । स्मरें आपुले गुरुचरण ॥५३॥

तये वेळीं श्रीगुरुसी । नमन केलें चरणासी । जगद्गुरु तूंचि होसी । त्रिमूर्तीचा अवतार ॥५४॥

तुझी कृपा होय जरी । पापें कैंचीं या शरीरीं । उदय होतां भास्करीं । अंधकार राहे केवीं ॥५५॥

ऐसेपरी श्रीगुरुसी । स्तुति करी तो भक्तीसीं । रोमांचळ उठती हर्षी । सदवित कंठा जाहला ॥५६॥

निर्मळ मानसीं तयावेळीं । माथा ठेवी चरणकमळीं । विनवीतसे करुणाबहाळीं । म्हणे तारीं तारीं श्रीगुरुमूर्ति ॥५७॥

निर्वाण देखोनि अंतःकरण । प्रसन्न जाहला श्रीगुरु आपण । मस्तकीं ठेविती कर दक्षिण । तया ब्राह्मणासी परियेसा ॥५८॥

परीस लागतां लोहासी । सुवर्ण होय बावनकसी । तैसें तया द्विजवरासी । ज्ञान जहालें परियेसा ॥५९॥

वेदशास्त्रादि तात्काळी । मंत्रशास्त्रें आलीं सकळीं । प्रसन्न जहाला चंद्रमौळी । काय सांगूं दैव त्या द्विजाचें ॥१६०॥

आनंद जाहला ब्राह्मणासी । श्रीगुरु निरोपिती तयासी । आमुचें वाक्य तूं परियेसीं । जाय त्वरित आपुले गुरुपाशीं ॥६१॥

जावोनियां गुरुपाशीं । नमन करीं भावेसीं । संतोषी होईल भरंवसीं । तोचि आपण सत्य मानीं ॥६२॥

ऐसेपरी श्रीगुरुमूर्ति । तया ब्राह्मणा संभाषिती । निरोप घेऊनियां त्वरिती । गेला आपल्या गुरुपाशीं ॥६३॥

निरोप देऊनि ब्राह्मणासी । श्रीगुरु निघाले परियेसीं । 'भिल्लवडी' ग्रामासी । आले भुवनेश्वरी-संनिध ॥६४॥

कृष्णापश्चिमतटाकेसी । औदुंबर वृक्ष परियेसीं । श्रीगुरु राहिले गुप्तेसीं । एकचित्तें परियेसा ॥६५॥

सिद्ध म्हणे नामधारकासी । राहिले श्रीगुरु भिल्लवडीसी । महिमा जाहली बहुवसी । प्रख्यात तुज सांगेन ॥६६॥

म्हणोनि सरस्वतीगंगाधर । सांगे गुरुचरित्रविस्तार । ऐकतां होय मनोहर । सकळाभीष्टें साधती ॥१६७॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्ध-नामधारकसंवादे गुरुशुश्रूषणमाहात्म्यवर्णनं नाम षोडशोऽध्यायः ॥१६॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेव दत्त ॥

( ओंवीसंख्या १६७ )

## अध्याय सतरावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

सिद्ध म्हणे नामकरणी । गुरुभक्तशिखामणि । तुझी भक्ति गुरुचरणीं । लीन जाहली निर्धारीं ॥१॥

पर्जन्य येतां पुढारां । जैसा येतो सूचना वारा । तैसें तुझें दैन्य-हरा । ऐकसी गुरुचरित्र कथनभेद ॥२॥

ऐसें चरित्र कामधेनु । सांगेन तुज विस्तारोन । एकचित्त करुनि मन । ऐक शिष्या नामधारका ॥३॥

कृष्णावेणीतटाकेसी । भुवनेश्वरी-पश्चिमेसीं । औदुंबर वृक्षेसीं । राहिले श्रीगुरु परियेसा ॥४॥

गौप्यरुप असती गुरु । ठाव असे अगोचरु । अनुष्ठान धुरंधरु । चातुर्मास येणेंपरी ॥५॥

सिद्धस्थान असे गहन । भुवनेश्वरीसंनिधान । विशेष श्रीगुरु राहिले म्हणोन । उत्कृष्ट जाहलें महिमान ॥६॥

ऐकोनि सिद्धाचें वचन । नामधारक करी नमन । परमात्मा श्रीगुरुराणा । कां रहावें गौप्यरुपें ॥७॥

त्यासी काय असे तपस । भिक्षा मागणें काय हर्ष । संदेह माझ्या मानसास । निवारावा दातारा ॥८॥

ऐक वत्सा नामधारका । भिक्षा मागतो पिनाका । आणिक सांगेन ऐका । दत्तात्रेय तैसाचि ॥९॥

दत्तात्रेय त्रयमूर्ति । भिक्षुकरुपी असे दिसती । भक्तजनानुग्रहार्थी । तीर्थयात्रे हिंडतसे ॥१०॥

अनुपम तीर्थे भूमीवरी । असती गौप्य अपरांपरीं । श्रीगुरुमूर्ति प्रीतिकरीं । प्रगटले भक्तांलागीं ॥११॥

भक्तजनोपकारार्थ । तीर्थे हिंडे श्रीगुरुनाथ । गौप्य व्हावया कारणार्थ । समस्त येऊनि मागती वर ॥१२॥

लपवितां दिनकरासी । केवीं लपे तेजोराशी । कस्तूरी ठेवितां जतनेसी । वास केवीं गौप्य होय ॥१३॥

आणिक सांगेन तुज साक्षी । गुण कैसा कल्पवृक्षीं । जेथें राहे तया क्षितीकांक्षी । कल्पिलें फळ तेथें होय ॥१४॥

याकारणें तया स्थानीं । प्रगटले गुरुमुनि । सांगेन तुज विस्तारुनि । एकचित्तें परियेसा ॥१५॥

करवीरक्षेत्र नगरांत । ब्राह्मण एक वेदरत । शास्त्रपुराण विख्यात । सांगे सकळ विद्वज्जनां ॥१६॥

अग्रवेदी असे आपण । जाणे तर्क व्याकरण । आन्हिकप्रमाण आचरण । कर्ममार्गी रत होता ॥१७॥

त्यासी जाहला एक सुत । मूर्ख असे उपजत । दैववशें मातापिता मृत । असमाधान होऊनियां ॥१८॥

वर्धतां मातापित्याघरीं बाळ । वर्षे सात जाहलीं केवळ । व्रतबंध करिती निश्चळ । तया द्विजकुमरकासी ॥१९॥

न ये स्नानसंध्या त्यासी । गायत्रीमंत्र परियेसीं । वेद कैंचा मूर्खासी । पशूसमान जहाला असे ॥२०॥

जेथें सांगती अध्ययन । जाऊनि आपण शिकूं म्हणे । तावन्मात्र शिकतांचि क्षण । सवेंचि विस्मृति होय त्यासी ॥२१॥

त्या ग्रामींचे विद्वज्जन । निंदा करिती सकळै जन । विप्रकुळीं जन्मून । ऐसा मूर्ख उपजलासी ॥२२॥

तुझा पिता ज्ञानवंत । वेदशास्त्रादि अभिज्ञात । त्याचे पोटीं कैसा केत । उपजलासी दगडापरी ॥२३॥

जळो जळो तुझें जिणें । पित्याच्या नामा आणिलें उणें । पोटीं बांधूनि पाषाण । तळें विहीरी कां न करिसी ॥२४॥

जन्मोनियां संसारीं । वृथा जाहलासी सूकरापरी । तुज गति यमपुरीं । अनाचारें वर्तसी ॥२५॥

ज्यासी विद्या असे ऐका । तोचि मनुष्यांमध्यें अधिका । जेवीं द्रव्य असे निक्षेपिका । तैसी विद्या परियेसा ॥२६॥

ज्याचे हृदयीं असे विद्या । त्यासी अखिल भोग सदा । यशस्वी होय सुखसंपदा । समस्तांमध्यें पूज्य तोचि ॥२७॥

श्रेष्ठ असे वयें थोर । विद्याहीन अपूज्य नर । अश्रेष्ठ असे एखादा नर । विद्या असतां पूज्यमान ॥२८॥

ज्यासी नाहीं सहोदर । त्यासी विद्या बंधु-भ्रातर । सकळिकां वंद्य होय नर । विद्या असे ऐशागुणें ॥२९॥

एखादे समयीं विदेशासी । जाय नर विद्याभ्यासी । समस्त पूजा करिती त्यासी । विदेश होय स्वदेश ॥३०॥

ज्यासी विद्या असे बहुत । तोचि होय ज्ञानवंत । त्याचे देहीं देवत्व । पूजा घेई सकळांपाशीं ॥३१॥

एखाद्या राज्याधिपतीसी । समस्त वंदिती परियेसीं । ऐसा राजा आपण हर्षी । विद्यावंतासी पूजा करी ॥३२॥

ज्याचे पदरीं नाहीं धन । त्याचें विद्याच धन जाण । विद्या शिकावी याचिकारण । नेणता होय पशूसमान ॥३३॥

ऐकोनि ब्राह्मणांचें वचन । ब्रह्मचारी करी नमन । स्वामींनीं निरोपिलें ज्ञान । विद्याभ्यास करावया ॥३४॥

जन्मांतरीं पूर्वी आपण । केलें नाहीं विद्यादान । न ये विद्या याचि कारण । त्यासी काय करणें म्हणतसे ॥३५॥

ऐसा आपण दोषी । उद्धरावें कृपेसीं । जरी असेल उपाय यासी । निरोपावें दातारा ॥३६॥

परिहासकें ते ब्राह्मण । सांगताति हांसोन । होईल पुढें तुज जनन । तधीं येईल तुज विद्या ॥३७॥

तुज कैंचा विद्याभ्यासु । नर नव्हेसि तूं साच पशु । भिक्षा मागूनि उदर पोस । अरे मूर्खा कुळनाशका ॥३८॥

ऐसें नानापरी नीचोत्तरेसीं । बोलती द्विज लोक त्यासी । वैराग्य धरुनि मानसीं । निघाला बाळ अरण्यासी ॥३९॥

मनीं झाला खेदें खिन्न । म्हणे त्यजीन आपुला प्राण । समस्त करिती दूषण । काय उपयोग जीवूनियां ॥४०॥

जळो जळो आपुलें जिणें । पशु झालों विद्याहीन । आतां वांचोनि काय कारण । म्हणोनि निघाला वैराग्यें ॥४१॥

भिल्लवडीग्रामासी । आला ब्रह्मचारी परियेसीं । अन्नोदक नेघे उपवासी । पातला निशीं दैववशें ॥४२॥

जेथें असे जगन्माता । भुवनेश्वरी विख्याता । तेथें पातला त्वरिता । करी दर्शन तये वेळीं ॥४३॥

न करी स्नान संध्या देखा । अपार करीतसे दुःखा । देवद्वारासन्मुखा । धरणें घेतलें तया वेळीं ॥४४॥

येणेंपरी दिवस तीनी । निर्वाण मन करुनि । अन्नोदक त्यजूनि । बैसला तो द्विजकुमर ॥४५॥

नव्हे कांहीं स्वप्न त्यालागोनि । म्हणोनि कोपे बहु मनीं । म्हणे अंबा भवानी । कां उपेक्षिसी आम्हांसी ॥४६॥

आक्रोशोनि तये वेळीं । शस्त्रें घेऊनियां प्रबळी । आपुली जिव्हा तात्काळी । छेदूनि वाहे देवीचरणीं ॥४७॥

जिव्हा वाहोनि अंबेसी । मागुती म्हणे परियेसीं । जरी तूं मज उपेक्षिसी । वाहीन शिर तुझे चरणीं ॥४८॥

ऐसें निर्वाण मानसीं । क्रमिता झाला तो निशी । स्वप्न जाहलें तयासी । ऐका समस्त श्रोते जन ॥४९॥

"ऐक बाळा ब्रह्मचारी । नको आक्रोशं आम्हांवरी । असे कृष्णापश्चिमतीरीं । त्वरित जाय तयाजवळी ॥५०॥

औदुंबरवृक्षातळीं । असे तापसी महाबळी । अवतारपुरुष चंद्रमौळी । तुझी वांछा पुरवील" ॥५१॥

ऐसें स्वप्न तयासी । जाहलें अभिनव परियेसीं । जागृत होतांचि हर्षी । निघाला त्वरित तेथोनि ॥५२॥

निघाला विप्र त्वरित । पोहत गेला प्रवाहांत । पैलतटा जाऊनि त्वरित । देखता जाहला श्रीगुरुसी ॥५३॥

चरणांवरी ठेवूनि माथा । करी स्तोत्र अत्यंता । श्रीगुरुमूर्ति संतोषतां । आश्वासिती तया वेळीं ॥५४॥

संतोषोनि श्रीगुरुमूर्ति । माथां हस्त ठेविती । ज्ञान जाहलें त्वरिती । जिव्हा आली तात्काळ ॥५५॥

वेद-शास्त्र-पुराण । तर्क भाषा व्याकरण । समस्त त्याचें अंतःकरण । पूर्ण जाहलें तात्काळीं ॥५६॥

जैसा मानससरोवरास । वायस जातां परियेस । जैसा होय राजहंस । तैसें झालें विप्रकुमरा ॥५७॥

चिंतामणि-संपर्केसीं । सुवर्ण होय लोह कैसी । मृत्तिका पडतां जांबूनदीसी । सुवर्ण होय जेवीं देखा ॥५८॥

तैसें तया ब्राह्मणासी । गुरुचरण होतां स्पर्शी । आली अखिल विद्या त्यासी । वेदशास्त्रादि तर्क भाषा ॥५९॥

सिद्ध म्हणे नामधारका । श्रीगुरुमहिमा ऐसी ऐका । जे जे स्थानीं वास देखा । स्थानमहिमा ऐसी असे ॥६०॥

म्हणोनि सरस्वती-गंगाधर । सांगे श्रीगुरुचरित्रविस्तार । ऐकतां होय मनोहर । सकळाभीष्ट साधती ॥६१॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्ध-नामधारकसंवादे भिल्लवडीस्थानमहिमावर्णनं-
मंदमतिब्राह्मणवरप्रदानं नाम सप्तदशोऽध्यायः ॥१७॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेव दत्त ॥

( ओंवीसंख्या ६१ )

## अध्याय अठरावा

श्रीगणेशाय नमः ।

श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः । जय जया सिद्धमुनि । तू तारक भवार्णी । सुधारस आमुचे श्रवणी । पूर्ण केला दातारा ॥१॥

गुरुचरित्र कामधेनु । ऐकता न-धाये माझे मन । कांक्षीत होते अंतःकरण । कथामृत ऐकावया ॥२॥

ध्यान लागले श्रीगुरुचरणी । तृप्ति नव्हे अंतःकरणी । कथामृत संजीवनी । आणिक निरोपावे दातारा ॥३॥

येणेपरी सिद्धासी । विनवी शिष्य भक्तीसी । माथा लावूनि चरणांसी । कृपा भाकी तये वेळी ॥४॥

शिष्यवचन ऐकोनि । संतोषला सिद्धमुनि । सांगतसे विस्तारोनि । ऐका श्रोते एकचित्ते ॥५॥

ऐक शिष्या शिकामणी । धन्य धन्य तुझी वाणी । तुझी भक्ति श्रीगुरुचरणी । तल्लीन झाली परियेसा ॥६॥

तुजकरिता आम्हांसी । चेतन जाहले परियेसीं । गुरुचरित्र आद्यंतेसी । स्मरण जाहले अवधारी ॥७॥

भिल्लवडी स्थानमहिमा । निरोपिला अनुपमा । पुढील चरित्र उत्तमा । सांगेन ऐका एकचित्तें ॥८॥

क्वचित्काळ तये स्थानी । श्रीगुरु होते गौप्येनि । प्रकट जहाले म्हणोनि । पुढे निघाले परियेसा ॥९॥

वरुणासंगम असे ख्यात । दक्षिणवाराणसी म्हणत । श्रीगुरु आले अवलोकित । भक्तानुग्रह करावया ॥१०॥

पुढें कृष्णातटाकांत । श्रीगुरू तीर्थे पावन करीत । पंचगंगासंगम ख्यात । तेथें राहिले द्वादशाब्दे ॥११॥

अनुपम्य तीर्थ मनोहर । जैसें अविमुक्त काशीपुर । प्रयागसमान तीर्थ थोर । म्हणोनि राहिले परियेसा ॥१२॥

कुरवपुर ग्राम गहन । कुरूक्षेत्र तोंचि जाण । पंचगंगासंगम कृष्णा । अत्योत्त्म परियेसा ॥१३॥

कुरुक्षेत्रीं जितके पुण्य । तयाहूनि अधिक असे जाण । तीर्थे अस्ती अगण्य़ । म्हणोनि राहिले श्रीगुरू ॥१४॥

पंचगंगानदीतीर । प्रख्यात असे पुराणांतर । पांच नामे आहेति थोर । सांगेन ऐका एकचित्तें ॥१५॥

शिवा भद्रा भोगावती । कुंभीनदी सरस्वती । ' पंचगंगा' ऐसी ख्याति । महापातक संहारी ॥१६॥

ऐसी प्रख्यात पंचगंगा । आली कृष्णेचिया संगा । प्रयागाहूनि असे चांगा । संगमस्थान मनोहर ॥१७॥

अमरापुर म्हणिजे ग्राम । स्थान असे अनुपम्य । जैसा प्रयागसंगम । तैसे स्थान मनोहर ॥१८॥

वृक्ष असे औदुंबर । प्रत्यक्ष जाणा कल्पतरु । देव असे अमरेश्वर । तया संगमा षटकूळी ॥१९॥

जैसी वाराणसी पुरी । गंगाभागीरथी-तीरी । पंचनदींसंगम थोरी । तत्समान परियेसा ॥२०॥

अमरेश्वरसंनिधानी । आहेति चौसष्ट योगिनी । शक्तितीर्थ निर्गुणी । प्रख्यात असे परियेसा ॥२१॥

अमरेश्वरलिंग बरवे । त्यासी वंदुनि स्वभावे । पुजितां नर अमर होय । विश्वनाथ तोचि जाणा ॥२२॥

प्रयागी करितां माघस्नान । जें पुण्य होय साधन । शतगुण होय तयाहून । एक स्नाने परियेसा ॥२३॥

सहज नदीसंगमांत । प्रयागसमान असे ख्यात । अमरेश्वर परब्रह्म वस्तु । तया स्थानी वास असे ॥२४॥

याकारणें तिये स्थानी । कोटितीर्थे असती निर्गुणी । वाहे गंगो दक्षिणी । वेणीसहित निरंतर ॥२५॥

अमित तीर्थे तया स्थानी । सांगता विस्तार पुराणीं । अष्टतीर्थ ख्याति जीण । तया कृष्णातटाकांत ॥२६॥

उत्तर दिशी असे देखा  वहे कृष्णा पश्चिममुखा । 'शुक्लतीर्थ' नाम ऐका । ब्रहम्हत्यापाप दूर ॥२७॥

औदुंबर सन्मुखेसी । तीनी तीर्थे परियेसी । एकानंतर एक धनुषी । तीर्थे असती मनोहर ॥२८॥

'पापविनाशी'  'काम्यतीर्थ' । तिसरें सिध्द ' वरदतीर्थ । अमरेश्वरसंनिधार्थ । अनुपम्य असे भूमंडळी ॥२९॥

पुढें संगम-षट्कुळांत । प्रयागतीर्थ असे ख्यात । ' शाक्तितीर्थ' अमरतीर्थ' । कोटितीर्थ' परियेसा ॥३०॥

तीर्थे असती अपरांपर । सांगता असे विस्तार । याकारणें श्रीपादगुरु । राहिले तेथें द्वादशाब्दें ॥३१॥

कृष्णा वेणी नदी दोनी । पंचगंगा मिळोनी । सप्तनदीसंगम सगुणी । काय सांगू महिमा त्याची ॥३२॥

ब्रह्महत्यादि महापातकें । जळोनि जातीं स्नानें एकें । ऐसें सिध्द्स्थान निकें । सकळाभीष्ट होय तेथें ॥३३॥

काय सांगूं त्यांची महिमा । आणिक द्यावया नाहीं उपमा । दर्शनमातें होती काम्या । स्नानफळ काय वर्णू ॥३४॥

साक्षात् कल्पतरु । असे वृक्ष औदुबरु । गौप्य होऊन अगोचरु । राहिले श्रीगुरु तया स्थानी ॥३५॥

भक्तजनतारणार्थ । होणार असे ख्यात । राहिले तेथें श्रीगुरुनाथ । म्हणोनि  प्रकट जाहले जाणा ॥३६॥

असता पुढें वर्तमानीं । भिक्षा करावया प्रतिदिनीं । अमरापुर ग्रामी । जाती श्रीगुरु परियेसा ॥३७॥

तया ग्रामी द्विज एक । असे वेदभ्यासक । त्याची भार्या पतिसेवक । पतिव्रतशिरोमणी ॥३८॥

सुक्षीण असे तो ब्राह्मण । शुक्लभिक्षा करी आपण । कर्ममार्गी आचरण । असे सात्विक वृत्तीनें ॥३९॥

तया विप्रमंदिरांत । असे वेल उन्नत । शेंगा निघती नित्य बहुत । त्याणे उदरपूर्ति करी ॥४०॥

एखादे दिवशी त्या ब्राह्मणासी । वरो न मिळे परियेसीं । तया शेंगांते रांधोनि हर्षी । दिवस क्रमी येणेंपरी ॥४१॥

ऐसा तो ब्राह्मण दरिद्री । याचकारणें उदर भरी । पंचमहायज्ञ कुसरी । अतिथि पूजी भक्तीनें ॥४२॥

वर्तता श्रीगुरु एके दिवसीं । तया विप्रमंदिरासी । गेले आपण भिक्षेसी । नेलें विप्रे भक्तिनें ॥४३॥

भक्तिपूर्वक श्रीगुरूसी । पूजा करी तो षोडशी । घेवडे-शेंगा बहुवसी । केली होती पत्र-शाका ॥४४॥

भिक्षा करून ब्राह्मणासी । आश्वासिती गुरु संतोषी । गेलें तुझे दरिद्र दोषी । म्हणोनी निघती तये वेळी ॥४५॥

तया विप्राचे गृहांत । जो का होता वेल उन्नत । घेवडा नाम विख्यात । आंगण सर्व वेष्टिलें असे ॥४६॥

तया वेलाचें झाडमूळ श्रीगुरुमूर्ति छेदिती तात्काळ । टाकोनि देती परिबळें । गेले आपण संगमासी ॥४७॥

विप्रवनिता तये वेळी । दु:ख करिती पुत्र सकळी । म्हणती पहा हो दैव बळी । कैसें अदृष्ट आपुलें ॥४८॥

आम्हीं तया यतीश्वरासी । काय उपद्रव केला त्यासी । आमुचा ग्रास छेदुनी कैसी । टाकोनि दिल्हा भूमीवरी ॥४९॥

ऐसेपरी ते नारी । दु:ख करी नानापरी । पुरुष तिचा कोप करी । म्हणे प्रारब्ध प्रमाण ॥५०॥

म्हणे स्त्रियेसी तये वेळी । जें जें होणार जया काळी । निर्माण करी चंद्रमोळी । तया आधीन । विश्व जाण ॥५१॥

विश्वव्यापक नारायण । उत्पत्तिस्थितिलया कारण । पिपीलिकादि स्थूळ-जीवन । समस्तां आहार पुरवीतसे ॥५२॥

'आयुरन्नं प्रयच्छति' । ऐसें बोले वेदश्रुति । पंचानन आहार हस्ती । केवी करी प्रत्यही ॥५३॥

चौऱ्यायशी लक्ष जीवराशी । स्थूल सूक्ष्म समस्तांसी । निर्माण केलें आहारासी । मग उत्पत्ति तदनंतरें ॥५४॥

रंकरायासी एक दृष्टी । करुनि निक्षेपण । सकृत अथवा दुष्कृत्य जाण । आपुलें आपणचि भोगणें । पुढील्यावरी काय बोल ॥५६॥

आपुलें दैव असतां उणें । पुढिल्या बोलती मूर्खपणे ।जे पेरिलें तोंचि भक्षणें । कवणावरी बोल सांगे ॥५७॥

बोल ठेविसी यतीश्वरासी । आपलें आर्जव न विचारिसी । ग्रास हरितला म्हणसी । अविद्यासागरी बुडोनि ॥५८॥

तो तारक आम्हांसी ।म्हणोनि आला भिक्षेसी । नेलें आमुचे दरिद्रदोषी । तोचि तारील आमुतें ॥५९॥

येणेंपरी स्त्रियेसी । संभाषी विप्र परियेसी । काढोनि वेलशाखेसी । टाकीता झाला गंगेत ॥६०॥

तया वेलाचें मूळ थोरी । जे कां होतें आपुले द्वारी । काढूं म्हणुनि द्विजवरी । खणिता झाला तया वेळीं ॥६१॥

काढितां वेलमूळासी । लाधला कुंभे निधानेसी । आनंद जाहला बहुवसी । घेऊनि गेला घरांत ॥६२॥

म्हणती नवल काय वर्तले । यतीश्वर आम्हां प्रसन्न झाले । म्हणोनि ह्या वेला छेदिलें । निधान लाधलें आम्हांसी ॥६३॥

नर नव्हे तो योगीश्वर होईल ईश्वरीअवतार । आम्हां भेटला दैन्यहर । म्हणती चला दर्शनासी ॥६४॥

जाऊनि संगमा श्रीगुरुसी । पूजा करिती बहुवसी । वृत्तांत सांगती तयासी । तये वेळी परियेसा ॥६५॥

श्रीगुरु म्हणती तयासी । तुम्ही न सांगणें कवणासी । प्रकट करितां आम्हांसी । नसेल लक्ष्मी तुमचे घरी ॥६६॥

ऐसेपरी तया द्विजासी । सांगे श्रीगुरु परियेसी । अखंड लक्ष्मी तुमचे वंशी । पुत्रपौत्री नांदाल ॥६७॥

ऐसा वर लधोन । गेली वनिता तो ब्राह्मण । श्रीगुरुकृपा ऐसी जाण । दर्शनमात्रे दैन्य हरे ॥६८॥

ज्यासी होय श्रीगुरुकृपा । त्यासी कैचें दैन्य पाप । कल्पवृक्ष-आश्रय करितां बापा । दैन्य कैंचे तया घरी ॥६९॥

दैव उणा असेल जो नरु । त्याणें आश्रयावा श्रीगुरु । तोचि उतरेल पैलपारु । पूज्य होय सकळिकांई ॥७०॥

जो कोण भजेल श्रीगुरु । त्यासी लाधेल इह-परु । अखंड लक्ष्मी त्याचे घरी । अष्टैश्वर्ये नांदती ॥७१॥

सिध्द म्हणे नामधारकासी । श्रीगुरुमहिमा असे ऐसी । भजावे तुम्हीं मनोमानसीं । कामधेनु तुझ्या घरीं ॥७२॥

गंगाधराचा कुमर । सांगे श्रीगुरुचरित्रविस्तार । पुढील कथामृतसार । ऐका श्रोते एकचित्तें ॥७३॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिध्द-नामधारकसंवादे अमरापुरमहिमानं-द्विजदैन्यहरणं नाम अष्टादशोऽध्याय: ॥ १८ ॥

श्रीपादश्रीवल्लभ-नृसिंहसरस्वती-दत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेव दत्त ॥ शुभं भवतु ॥

(ओवी संख्या ७३)

## अध्याय एकोणीसावा

श्रीगणेशाय नम: ॥ श्रीसरस्वत्यै नम: ॥ श्रीगुरुभ्यो नम: ॥

नामधारक शिष्यराणा । लागे सिध्दाचिया चरणां । करसंपुट जोडून । विनवीतसे तया वेळी ॥१॥

जय जया सिध्द योगीश्वरा । तूंचि ज्योति अंधकारा । भक्तजनांच्या मनोहरा । भवसागरतारका ॥२॥

अज्ञानतिमिररजनींत । निजलों होतों मदोन्मत्त । गुरुचरित्र मज अमृत । प्राशन करविलें दातारा ॥३॥

त्याणें झालें मज चेत । ज्ञानसूर्यप्रकाश होत । तुझे कृपेने जागृत । जाहलों स्वामी सिध्दमुनि ॥४॥

पुढील कथाविस्तारा । निरोपावा योगीश्वरा । कृपा करी गा दातारा । म्हणोनि लागला चरणांसी ॥५॥

ऐकोनि शिष्याचें वचन । संतोषला सिध्द आपण । सांगतसे विस्तारुन । श्रीगुरुमहिमा अनुपम्य ॥६॥

शिष्योत्तमा नामंकिता । सांगेन ऐके गुरुची कथा । औदुंबरतळी अतिप्रीता । होते श्रीगुरु परियेसा ॥७॥

ऐकोनी सिध्दाचें वचन । नामधारक करी प्रश्न । अनेक पुण्यवृक्ष त्यजून । काय प्रीति औदुंवरी ॥८॥

अश्वत्थ्वृक्ष असे थोर । म्हणोनि सांगती वेद शास्त्र । श्रीगुरुप्रीति औदुंबर । कवण कारण निरोपावें ॥९॥

सिध्द म्हणे नामंकिता । सांगेन याचिया वृतांता । जधीं नरसिंह अवतार होता । हिरण्यकश्यप विदारिला ॥१०॥

नखेंकरूनि दैत्यासी । विदारिलें कोपेसीं । आंतडीं काढूनियां हर्षी । घालती माळ गळां नरहरीनें ॥११॥

त्या दैत्याचे पोटी  विष होतें काळकूटी । जैसी वडवाग्नि मोठी तैसें विष परियेसा ॥१२॥

विदारण करितां दैत्यासी । वेधलें विष त्या नखांसी । तापली नखें बहुवसी । ऐक शिष्या एकचित्तें ॥१३॥

तये समयी महालक्ष्मी  । घेऊनि आली अतिप्रेमी । औदुंबरफळ नामी । शांतीकारणें नखांसी ॥१४॥

तये वेळी शीतलार्थ । नखें रोविलीं औदुंबरात । विषाग्नि झाला शांत । उग्र नरसिंह शांत झाला ॥१५॥

शांत जाहला नृसिंहदेव । देता झाला लक्ष्मीसि खेंव । संतोषोनि उभय देव । वर देती तये वेळीं ॥१६॥

तया समयिं औदुंबरासी देती वर हृषीकेशी । " सदा फळित तूं होसी । 'कल्पवृक्ष ' तुझे नाम ॥१७॥

जे जन भजती भक्तीसीं । काम्यं होय त्वरितसीं । तुज देखतांचि परियेसीं । उग्र विष शांत होय ॥१८॥

जे सेवितील मनुष्यलोक । अखिलकाम्य पावोनि एक । फळ प्राप्त होय निके । पापावेगळा होय नर ॥१९॥

वांझ नारी सेवा करितां । पुत्र होतील तिसी त्वरिता । जे नर असतील दैन्यपीडिता । सेवितं होतील श्रियायुक्त ॥२०॥

तुझी छायीं बैसोन । जे जन करिती जपानुष्ठान । अनंत फळ होय ज्ञान । कल्पिलें फळ होय त्यांसी ॥२१॥

तुझे छायीं जळांत । स्नान करितां पुण्य बहुत । भागीरथीस्नान करीत । तितुकें पुण्य परियेसा ॥२२॥

तुज सेविती त्या नरासी । व्याधि नव्हती कवणे दिवसीं । ब्रह्महत्यादि महादोषी । परिहार होती परियेसा ॥२३॥

जें जें कल्पूनि मानसी । तुज सेविती भावेसीं । कल्पना पुरती भरंवसी । कलियुगी कल्पवृक्ष तूंचि ॥२४॥

सदा वसों तुजपाशीं । लक्ष्मीसहित शांतीसी " । म्हणोनि वर देती हर्षी । नरसिंहमूर्ति तये वेळी ॥२५॥

ऐसा वृक्ष औदुंबर । कलियुगीं तोचि कल्पतरु । नरसिंहमूर्ति होतां उग्र । शांत झाली तयापाशी ॥२६॥

याकारणे श्रीगुरुमूर्ति नृसिंहमंत्र उपासना करिती । उग्रत्वाची करावया शांति । औदुंबरी वास असे ॥२७॥

अवतार आपण तयाचे स्थान आपुलें असे साचें । शांतवन करावया उग्रत्वाचे । म्हणोनि वास औदुंबरी ॥२८॥

सहज वृक्ष तो औदुंवर । कल्पवृक्षसमान तरु । विशेषें वास केला श्रीगुरु । कल्पिली फळे तेथे होती ॥२९॥

तया कल्पद्रुमातळी । होते श्रीगुरुस्तोममौळी । ब्रह्मा-विष्णु-नेत्रभाळी । देह मानुषी धरोनियां ॥३०॥

भक्तजनां तारणार्थ । पावन करिती समस्त तीर्थ । अवतार त्रयमूर्ति गुरुनाथ । भूमीवरी वर्तत असे ॥३१॥

वृक्षातळी अहर्निशीं । श्रीगुरु असती गौप्येसी । माध्यान्हकळसमयासी । समारंभ होय तेथें ॥३२॥

अमरेश्वरसंनिधानीं । वसई चौसष्ट योगिनी । पूजा करावया माध्यान्ही । श्रीगुरुजवळी येती नित्य ॥३३॥

नमन करूनि श्रीगुरूसी । नेती आपुले मंदिरासी । पूजा करिती विधीसीं । गंधपरिमळ-कुसुमें ॥३४॥

आरोगोनि तयां घरी । पुनरपि येती औदुंबरी । एके समयी द्विजवरी । विस्मय करिती देखोनियां ॥३५॥

म्हणती अभिन याति कैसा । न क्री भिक्षा ग्रामांत ऐसा । असतो सदा अरण्यवासा । कवणेपरी काळ कंठी ॥३६॥

पाहूं याचें वर्तमान । कैसा क्रमितो दिनमान । एखादा नर ठेवून । पाहो अंत यतीश्वराचा ॥३७॥

ऐसं विचारूनि मानसी । गेले संगमस्थानासी । माध्यान्हसमयी तयांसी । भय उअपजलें अंत:करणीं ॥३८॥

पाहूं म्हणती श्रीगुरूचा अंत । तेचि जाती यमपंथ । ऐसे विप्र मदोन्मत्त । अधोगतीचे तेचि इष्ट ॥३९॥

उपजतां भय ब्राह्मणांसी । गेले आपुलें स्थानासी । गंगनुज थडियेसी । होता वृत्ति राखीत ॥४०॥

त्याणें देखिले श्रीगुरुसी । आल्या योगिनी पूजेसी । गंगेमध्ये येतां कैसी । मार्ग जाहला जळांत ॥४१॥

विस्मय करी तो नरु । म्हणे कैसा यतीश्वरु । द्विभाग झाला गंगापूरु । केवी गेले गंगेंत ॥४२॥

श्रीगुरुतें नेऊनि। पूजा केली त्या योगिनी। भिक्षा तेथें करूनि आले मागुती बाहेर ॥४३॥

पहात होता गंगानुज । म्हणे कैसे जाहले चोज । अवतार होईल ईश्वरकाज । म्हणोनि पूजिती देवकन्या ॥॥४४॥

येरे दिवसीं मागुती । हाती घेऊन आरति । देवकन्या ओंवाळिती । श्रीगुरूतें नमूनियां ॥४५॥

पुन्हा गंगाप्रवाहांत । श्रीगुरु निघाले योगिनीसहित । हो कां नर होता पहात । तोही गेला सर्वेचि ॥४६॥

नदीतीरी जातां श्रीगुरु । द्विभार जाहलें गंगेत द्वारु । भीतरी दिसे अनुपम्य पुर । रत्नखचित गोपुरेसीं ॥४७॥

अमरावतीसमान नगर जैसी तेजें दिनकर । श्रीगुरु जातांचि समस्त पुर। घेऊनि आलें आरति ॥४८॥

ओवाळून आरति । नेलें आपुले मंदिराप्रति सिंहासन रत्नखचिती । बैसो घालिती तया समयीं ॥४९॥

पूजा करिती विधीसीं । जे कां उपचार षोडशी । अनेकापरी षड्रसेसीं । आरोगिलें तये वेळीं ॥५०॥

श्रीगुरु दिसती तया स्थानीं । त्रैमूर्ति जैसा शुलपाणि । पूजा घेऊनि तत्क्षणीं । मग परतले तयेवेळी ॥५१॥

देखोनियां तया नरासी । म्हणती तूं कां आलासी । विनवी तो नर स्वमियासी । सहज आलों दर्शनाते ॥५२॥

म्हणोनि लागला गुरुचरणीं । तल्लीन होवोनि अंत:करणीं । म्हणे स्वामी गिरिजारमणा । होसी त्रयमूर्ति तुंचि एक ॥५३॥

न कळे तुझें स्वरूपज्ञान । संसारमाया वेष्टून । तूं तारक या भवाणी । उध्दरावे स्वामिया ॥५४॥

तूं तारक विश्वासी । म्हणोनि भूमी अवतरलासी । अज्ञान म्हणिजे रजनीसी । ज्योति:स्वरूप तूंचि एक ॥५५॥

तुझें दर्शन होय ज्यासी । सर्वाभीष्ट फळ होय त्यासी । इहपर अप्रयासी । जोडे नरा न लागतां क्षण ॥५६॥

ऐशापरी तो देखा । स्तुति करितो नर ऐका । संतोषूनि गुरुनायकें । आश्वासिले तया वेळी ॥५७॥

श्रीगुरु म्हणती तयासी । तुझें दैन्य गेलें परियेसी । जें जें तूं इच्छिसी मानसी । सकळाभीष्ट पावशील ॥५८॥

येथील वर्तमान ऐसी । न सांगावे कवणासी । जया दिवशी प्रगट करिसी । तूतें हानी होईल जाण ॥५९॥

येणेंपरी तयासी । श्रीगुरु सांगती परियेसी ।लाले औदुंबरापाशी । गंगानुज-समागमें ॥६०॥

श्रीगुरूचा निरोप घेऊन । गेला गंगानुज आपण । वृत्तिस्थानीं जातांचि क्षण । निधान त्यासी लाधलें ॥६१॥

ज्ञानवं तो झाला नरु । नित्य सेवा करी तो गुरु । पुत्रपौत्र श्रियाकर । महानंदे वर्ततसे ॥६२॥

भक्तिभावें श्रीगुरुसी । नमन करी प्रतिदिवसीं । सेवा करी कलत्रेंसी । एकोभावेंकरूनियां ॥६३॥

वर्तता ऐसे एके दिवसी । आली पौर्णिमा माघमासीं । नमन करूनि श्रीगुरूसी । विनवीतसे तो भक्त ॥६४॥

म्हणे स्वामी जगद्‌गुरु । माघस्नानी प्रयाग थोरु । म्हणोनि सांगती द्विजवरु । काशीपूर महाक्षेत्र ॥६५॥

कैसे प्रयाग गयास्थान । कैसें वाराणसी भुवन । नेणों आपण यातिहीन । कृपा करणें स्वामिया ॥६६॥

श्रीगुरु म्हणती तयासी । पंचगंगासंगमेंसी । ' प्रयाग ' जाणावें भरंवसी । ' काशीपुर " तें जुगुळ ॥६७॥

दक्षिण ' गया' कोल्हापुर । त्रिस्थळी ऐसें मनोहर । जरी पहासी प्रत्यक्षाकार । दावीन तुज चाल आतां ॥६८॥

बैसले होते व्याघ्राजिनीं । धरी गा मागे दृढ करूनि । मनोवेगें तत्क्षणी । गेले प्रयागा प्रात:काळी ॥६९॥

तेथे स्नान करूनि । गेले काशीस माध्याह्निं । विश्वनाथा दाखवूनि सर्वेचि गेले गयेसी ॥७०॥

ऐसी त्रिस्थळी आचरोनि । आले परतोनि अस्तमानीं । येणेपरी । तयास्थानीं । देखता झाला तो नर ॥७१॥

विश्वनाटक श्रीगुरुमूर्ति । प्रकट झाली ऐसी किर्ति । श्रीगुरु मनीं विचारिती । आतां येथे गौप्य व्हावे ॥७२॥

ऐसेपरी तयास्थानीं । प्रकट झाले श्रीगुरुमुनि अमरेश्वरातें पुसोनि । निघत झाले तये वेळी ॥७३॥

श्रीगुरु निघतां तेथोनि । आल्या चौसष्ट योगिनी । निनविताति करूणावचनीं । आम्हां सोडूनि केवीं जातां ॥७४॥

नित्य तुमचे दर्शनासी । तापत्रय हरती दोषी । अन्नपूर्णा तुम्हांपाशी । केवी राहुं स्वामिया ॥७५॥

येणेंपरी श्रीगुरुसी । योगिनी विनविती भक्तीसीं । भक्तवत्सलें संतोषीं । दिधला वर वेळीं ॥७६॥

श्रीगुरु म्हणती तयांसी। सदा असों औदुंबरेसी । प्रकटार्थ जाणे पूर्वेसी । स्थान आमुचें येथेचि असे ॥७७॥

तुम्ही रहावें येथें औदुंबरी । कल्पवृक्ष मनोहरी । अन्नपूर्णा प्रीतिकरीं । औदुंबरी ठेवितों ॥७८॥

कल्पवृक्ष औदुंबर । येथे असा तुम्ही स्थिर । अमरापुर पश्चिम तीर । अमर स्थान हेंचि जाणा ॥७९॥

प्रख्यात होईल स्थान बहुत । समस्त नर पूजा करीत । मनकामना होय त्वरित । तुम्हीं त्यांसी साह्य व्हावे ॥८०॥

तुम्हांसहित औदुंबरी । आमुच्या पादुका मनोहरी । पूजा करिती जे तत्परी मनकामना पुरती जाणा ॥८१॥

येथे असे अन्नपूर्णा ।नित्य करिती आराधना । तेणें होय कामना । अतुर्विध पुरुषार्थ ॥८२॥

पापविनाशी काम्यतीर्थ । सिध्द्‌तीर्था स्नान करीत । सात वेळ स्नपन करीत तुम्हांसहित औदुंबरी ॥८३॥

साठी वर्षे वांझेसी । पुत्र होती शतायुषी । ब्रह्महत्या पाप नाशी । स्नानमात्रे त्या तीर्था ॥८४॥

सोमसूर्यग्रहणेसी । अथवा मास संक्रांतीसी । स्नान करिती फळें कैसी । ऐका श्रोते एकचित्तें ॥८६॥

श्रुंग-खूर-सुवर्णेसी । अलंकृत धेनूसी । सहस्त्र कपिला ब्राह्मणांसी । सुरनदीतीरी ऐका । भोजन दिल्हें फळ असे ॥८८॥

औदुंबरवृक्षातळीं । जप करिती जे मननिर्मळी । कोटिगुणें होती फळें । होम केलिया तैसेंचि ॥८९॥

रुद्र जपोनि एकादशी । पूजा करिती मनोमानसी । अतिरुद्र केले फळसदृशी । एकाचित्तें परियेसा ॥९०॥

मंदगती प्रदक्षिणा । करितां होय अनंत पुण्य । पदोपदीं वाजपेययज्ञ । फळ तेथें परियेसा ॥९१॥

नमन करितां येणेंपरीं। पुण्य असे अपरांपरी । प्रदक्षिणा दोन चारी । करूनी करणें नमस्कार ॥९२॥

कुष्ठ असेल अंगहीन । त्याणें करणें प्रदक्षिणा । लक्ष वेळ करितां जाणा । देवासमान देह होय ॥९३॥

ऐसे स्थान मनोहरु । सहज असे कल्पतरु । म्हणोनि सांगतति गुरु । चौसष्ठ योगिनींसी ॥९४॥

ऐसा निरोप देऊन । श्रीगुरु निघाले तेथून । जेथें होतें गाणगाभुवन । भीमातीरी अनुपम्य ॥९५॥

विश्वरूप जगन्नाथ । अखिल ठायीं असे वसत । औदुंबरी प्रीति बहुत । नित्य तेथें वसतसे ॥९६॥

गौप्य राहोनी औदुंबरी । प्रकटरूपें गाणगापुरी । राहिले गुरु प्रीतिकरीं । प्रख्यात झाले परियेसा ॥९७॥

सिध्द म्हणे नामधारकासी । श्रीगुरुमहिमा आहे ऐसी । प्रकट झाले बहुवसी । गाणगापुरी परियेसा ॥९८॥

म्हणोनि सरस्वतीगंगाधर । सांगे गुरुचरित्रविस्तार । भक्तिपूर्वक ऐकती नर । लाभे चतुर्विध पुरुषार्थ ॥९९॥

गुरुचरित्र कामधेनु । जे ऐकती भक्तजनु । त्यांचे घरी निधानु । सकळाभीष्टें पावती ॥१००॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिध्द-नामधारकसंवादे औदुबरवृक्षमहिमानं -

योगिनीप्रतिदिनदर्शनं तथा वरप्रदानं नाम एकोनविशोऽध्याय: ॥१९॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेव दत्त ॥ ॐ ॥ ॐ ॥ ॐ ॥

(ओवी संख्या १००)

## अध्याय विसावा

श्रीगणेशाय नम: ॥ श्रीसरस्वत्यै नम: ॥ श्री गुरुभ्यो नम: ॥

नामधारक शिष्यराणा । लागे सिध्दचिया चरणा । विनवीतसे कर जोडून । भक्तिभावेंकरूनि ॥१॥

पुसतसे तयावेळी । माथा ठेवोनि चरणकमळी । जय जया सिध्द-स्तोममौळी । विनंति एक अवधारा ॥२॥

स्वामी निरोपिलें आम्हांसी । श्रीगुरु आले गाणगापुरासी । गौप्यरूपें अमरापुरासी । औदुंबरी असती म्हणतां ॥३॥

वर देऊनि योगिनींसी । आपण आले प्रकटेसी । पुढे तया स्थानी कैसी । विस्तार झाला तें निरोपावें ॥४॥

वृक्ष सांगसी औदुंबर । निश्चयें म्हणसी कल्पतरु । पुढे कवणा झाला वरु । निरोपावे दातारा॥५॥

शिष्यवचन ऐकोनि । संतोषला सिध्दमुनि । सांगतसे विस्तारुनि । औदुंबरास्थानमहिमा ॥६॥

सिध्द म्हणे ऐक बाळा । किती सांगूं गुरुची लीळा । औदुंबरी सर्वकाळ । वास आपण असे जाणा ॥७॥

जया नाम कल्पतरु । काय पुससी तयाचा वरु । जेथे वास श्रीगुरु॥ कल्पिलें फळ तेथें होय ॥८॥

अमित झाला तेथें महिमा । सांगावया अशक्य आम्हां । एखादा सांगो दृष्टांत तुम्हां । शिष्योत्तमा नामधारक ॥९॥

'शिरोळे' म्हणिजे ग्रामेसी । विप्र एक परियेसीं । 'गंगाधर' नाम ऐसी । वेदरत होता जाणा ॥१०॥

त्याची भार्या पतिव्रता । शांत असे सुशीलता । तिसी पुत्र होती ते सर्वेचि मृत्युता । कष्टतसे येणेंपरी ॥११॥

पांच पुत्र तिसी झाले । सर्वेचि पंचत्व पावले । अनेक देव आराधिले । नव्हे कवणेपरी स्थिर ॥१२॥

दु:ख करी ते नारी । व्रत उपवास अपरांपरी । पूर्वकर्म असे थोरी । स्थिर नोहे पुत्र तिसी ॥१३॥

रहणी कर्मविपाकेसी । विचार करिती तिच्या दोषासी । पुत्रशोक व्हावयासी । सांगती पातकें तये वेळी ॥१४॥

सांगती विप्र विद्वज्जन । पुत्र न वांचती काय कारण । पूर्वजन्म-दोषगुण । विस्तार करिती तियेसी ॥१५॥

गर्भपात स्त्रियांसी । जे जन करिती तामसी । पावती वांझ-जन्मासी । झाले पुत्र मरती जाणे ॥१६॥

अश्ववध गोवध करी । वांझ होय सदा ज्वरी । एकदा परद्रव्य अपहारी । अपुत्री होय तो जाणा ॥१७॥

विप्र म्हणती तियेसी । तुझे पूर्वजन्म-दोषी । दिसतसे आम्हांसी । सांगूं ऐका एकचित्ते ॥१८॥

शोनेकगोत्री द्विजापाशीं । रीण घेतले द्रव्यासी । मागता तुवां न देसी । कष्टला बहुत तो ब्राह्मण ॥१९॥

लोभी होता तो ब्राह्मण । द्रव्यसंबंधे दिधला प्राण । आत्महत्या केलिया गुणें । तो पिशाच झाला असे ॥२०॥

गर्भपात करी तो तुज । जाहल्या मृत्यु करी तो द्विज । तुझें कर्म असे सहज । आपली जोडी भोगावी ॥२१॥

ऐकोनी ब्राह्मणाचे वचन । विप्रवनिता खेदे खिन्न । अनुतप्त होऊनि अंत:करण । द्विजचरणा लागली ॥२२॥

कर जोडोनि तये वेळी । विनवीतसे करुणाबहाळी । माथा ठेवूनि चरणकमळी । पुसतसे तयावेळी ॥२३॥

ऐसी पापिणी दुराचारी । बुडाल्यें पापाचे सागरी । स्वामी मातें तारी तारी । उपाय सांगणे म्हणतसे ॥२४॥

ऐसी पापें हळाहळी । अपत्ये भक्षिली चांडाळी । औषधी सांगा तुम्ही सकळी । म्हणोनी सभेसी विनवीतसे ॥२५॥

विप्र म्हणती तियेसी । तुवां केली ब्रह्महत्या दोषी । अपहारिलें द्रव्यासी । ब्राह्मण पिशाच जाहला असे ॥२६॥

जधी मेला द्विजवर । केली नाहीं क्रियाकर्म-पर । त्याचें द्रव्य तुवां सारें । भोगिलें असे जन्मांतरी ॥२७॥

त्यासी करणें उध्दारगति । सोळावें कर्म करावें रीतीं । द्रव्य द्यावें एकशती । तया गोत्रद्विजासी ॥२८॥

तेणें होय तुज बरवें । एकोभावें आचरावें । कृष्णतीरी वास करावें । एक मास उपवासी ॥२९॥

पंचगंगासंगमेसी । तीर्थे असती बहुवसी । औदुंबरवृक्षासी । आराधावें परियेसा ॥३०॥

पापविनाशी करुनी स्नान । वेळ सात औदुंबरस्नपन । अभिषेकोनि श्रीगुरुचरण । पुन्हा स्नान काम्यतीर्थी ॥३१॥

विधिपूर्वक श्रीगुरुचरणीं । पूजा करावी भावोनी॥ येणेंपरी भक्तीने । मास एक आचरावें ॥३२॥

स्थान असे श्रीगुरुचें । नरसिंहसरस्वतीचें । तुझे दोष जातील साचे । पुत्र होतील शतायुषी ॥३३॥

मास आचरोनी येणेंपरी । मग ब्राह्मणातें पाचारीं । द्रव्य द्यावें शौनकगोत्री । द्वीजवरासी एक शत ॥३४॥

त्याचेनि नामें कर्म सकळ । आचरावें मन निर्मळ । होतील तुझे कष्ट सफळ । श्रीगुरुनाथ तारील ॥३५॥

गुरुस्मरण करूनि मनीं । तूं पूजा करीं वो गुरुचरणीं । तुझें पाप होईल धुणी । ब्राह्मणसमंध परिहरेल ॥३६॥

ऐसें सांगतां द्विजवरीं । ऐकोनि सती चिंता करी । शतद्रव्य आमुच्या घरीं । कधीं न मिळे परियेसा ॥३७॥

कष्ट करीन आपुले देहीं । उपवासादि पूजा पाहीं । मासोपवास एकोभावीं । करीन आपण गुरुसेवा ॥३८॥

येणेंपरी तये नारी । सांगे आपुले निर्धारीं । ऐकोनियां द्विजवरीं । निरोप देती तये वेळी ॥३९॥

विप्र म्हणती ऐक बाळे । तूर्ते द्रव्य इतुकें न मिळे । सेवा करीं वो मननिर्मळें । श्रीगुरुचरणीं तूं आतां ॥४०॥

निष्कृति तुझिया पापासी ।श्रीगुरु करील परियेसीं। औंदुबरसंनिधेंसी । वास असे निरंतर ॥४१॥

तो कृपाळू भक्तांसी । निवारील ब्रह्महत्यादोषासी । जितुकें येईल तुझ्या शक्तीसी । द्रव्य वेंची गुरुनिरोपें ॥४२॥

परिसोनि द्विजवचन । विप्रवनिता संतोषोन । गेली त्वरित ठाकोन । जेथें स्थान श्रीगुरूचें ॥४३॥

स्नान करूनि संगमासी । पापविनाशीं विधीसीं । सात वेळ स्नपनेसीं । करी औदुंबरी प्रदक्षिणा ॥४४॥

काम्यतीर्थी करूनि स्नान । पूजा करूनि श्रीगुरुचरण । प्रदक्षिणा करूनि नमन । करीतसे उपवास ॥४५॥

येणेंपरी दिवस तीनी । सेवा करितां ते ब्राह्मणी । आला विप्र तिच्या स्वप्नीं । द्रव्य मागे शत एक ॥४६॥

अद्यापि जरी न देसी । घेईन तुझे प्राणासी । पुढें तुझ्या वंशासी । वाढों नेदीं अवधारीं ॥४७॥

वायां करिसी तूं सायासी । पुत्र कैंचे तुझे वंशी । म्हणोनि कोपें मारावयासी । आला पिशाच स्वप्नांत ॥४८॥

भयचकित ते वनिता । औदुंबराआड रिघतां । तंव देखिलें श्रीगुरुनाथा । तयापाठीं रिघाली ॥४९॥

अभय देवोनि नारीसी । वारिता झाला ब्राह्मणासी । पुसती श्रीगुरु तयासी । कां मारिसी स्त्रियेसी ॥५०॥

विप्र विनवी श्रीगुरूसी । "जन्मांतरी आपणासी । अपहार केला द्रव्यासी । प्राण त्यजिला यास्तव ॥५१॥

स्वामी कृपाळू सर्वांसी । आमुचे शत्रूचा पक्षपात करिसी । तुंही यतीश्वर तापसी । पक्षपात करूं नये " ॥५२॥

ऐकोनि तयाचें वचन । श्रीगुरु म्हणती कोपोन । "उपद्रव देसी भक्तजना । तूंतें शिक्षा करूं जाण ॥५३॥

आम्ही सांगों जेंणें रीती । जरी ऐकसी हितार्थी । तुज होईल सद्गति । पिशाचत्व परिहरेल ॥५४॥

जें काय देईल विप्रवनिता । तुवां अंगिकारावें सर्वथा । जरी न ये तुझ्या चित्ता । जाईं आतां येथोन ॥५५॥

राखीव माझिया भक्तांसी । वंशोवंशी अभिवृध्दीसीं ; । पुनरपि जरी पाहूं येसी । शिक्षा करूं " म्हणती गुरु ॥५६॥

ऐकोनि श्रीगुरुचें वचन । विप्र-पिशाच करी नमन । " स्वामी तुझे देखिले चरण । उध्दरावें आपणासी ॥५७॥

जेणेंपरी आपणासी । होय गति उध्दरावयासी । निरोप देसी करुणेसीं । अंगिकारूं स्वामिया " ॥५८॥

श्रीगुरु म्हणती तयासी । विप्रवनिता भावेसीं । करील कर्म दहा दिवशी । गति होईल तूतें जाणा ॥५९॥

येणेंपरी तयासी । निरोप देती स्त्रियेसी । जें असेल तुजपाशी । आचरीं कर्म तया नामीं ॥६०॥

अष्टतीर्थी स्नान करी । तया नामें अवधारीं । सात दिवस येणेंपरी । स्नपन करीं औदुंबरा ॥६१॥

ब्रह्महत्या तुझे दोषी । जातील त्वरित भरंवसी । कन्या पुत्र पूर्णायुषी । होतील म्हणती श्रीगुरु ॥६२॥

ऐसें देखोनि जागृतीं । विप्रवनिता भयचकिती । ज्ञाने पाहे श्रीगुरुमूर्ति । न विसंवे मनांत ॥६३॥
श्रीगुरुनिरोपें दहा दिवस । केलें आचरण परियेस । ब्रह्महत्या गेला दोष । गति झाली ब्राह्मणासी ॥६४॥
येरे दिवशी स्वप्नांत । प्रत्यक्ष आले श्रीगुरुनाथ । नारिकेल दोन देत । भरली ओंटी तियेची ॥६५॥
म्हणे पारणें करीं वो तूं आतां । पुत्र होतील वेदरता । वाढे त्यांची संतति बहुता । चिंता न करीं अहो बाळे ॥६६॥
गुरुनिरोपें आराधन । करिती दंपती मन:पूर्ण । प्रकट झाला श्रीगुरुराणा । संपर्क लोह-परिसापरी ॥६७॥
गुरुनिरोपें आराधन । करिती दंपती मन:पूर्ण । प्रकट झाला श्रीगुरुराणा । संपर्क लोह परिसापरी ॥६८॥
पुढें तया नारीसी। पुत्रयुग्म सद्वंशी । झाले श्रीगुरुकृपेसीं । एकचित्तें परियेसा ॥६९॥
व्रतबंध करिती ज्येष्ठासी । समारंभ अनंत हर्षी । चौलकर्म दुजियासी । करूं पहाती मातापिता ॥७०॥
समारंभ करी जननी । चौलकर्म करणें मनीं । पुत्रासी जाहली वर्षे तीन्ही । अत्योल्हास मानसीं ॥७१॥
समारंभ अतिप्रीतीं । करिती झाली आयती । पूर्व दिवसी मध्यरात्रीं । आली व्याधि कुमरासी ॥७२॥
व्याधि असती अष्टोत्तर । एकाहूनि एक थोर । तयामध्यें जो का तीव्र । धनुर्वात तयासी ॥७३॥
अवयव वांकोनि । दिसे भयानक नयनी । येणेपरी दिवस तीन्ही । कष्टातसे तो बाळ ॥७४॥
तया दिवशीं अस्तमानीं । पंचत्व पावला तत्क्षणी । शोक करिती जनक जननी । ऐका श्रोते एकचित्तें ॥७५॥
आक्रोशोनि भूमीसी । आफळी शिर सत्राणेसीं । पाषाण घेवोनि उरासी । घात करी ते नारी ॥७६॥
देह टाकी धरणीवरी । निर्जीव होवोनि क्षणभरी । आठवी दु:ख अपरांपरी । नयनीं वाहे पूर्ण जळ ॥७७॥
प्रेतपुत्रावरी लोळे । अलिंगोनि परिबळें । विष्टोनियां मायाजाळें । प्रलापीतसे ते नारी ॥७८॥
म्हणे ताता पुत्रराया । प्राणरक्षका माझ्या प्रिया । मातें केवी सोडूनियां । जासी कठोर मन करूनि ॥७९॥
कोठें गेलासी खेळावया । स्तनींचें क्षीर जातसे वायां । शीघ्र येई गा ठाकोनियां । पुत्रराया परियेसीं ॥८०॥
केवीं विसरूं तुझे गुण । माझा तूंचि निर्धान । तुझे गोजिरें बोलणें । केवीं विसरूं पुत्रराया ॥८१॥
तुझे रूपासारखा सुत । केवी देखों मी निश्चित । निधान देखत्यें स्वप्नांत । तैसें मज चाळिवलें ॥८२॥
पुत्र व्यालें पांच आपण । त्यात तूं एक निधन । जधीं झालें गर्भधारण । तैपासाव संतोष ॥८३॥
डोहळे मज उत्तम होती । कधी नसे मी दुश्चिती । अत्योल्हास नवमासांतीं । पुत्र होईल म्हणोनि ॥८४॥
श्रीगुरूंनी दिधला मातें वर । पुत्र होईल निर्धार । त्याणें मज हर्ष फार । वरद पिंड म्हणोनि॥८५॥
जधीं तुज प्रसूत जाहल्यें । अनंत सौख्य मीं लाधलें । प्राणप्रिया तुज मीं पोसिलें । आमुतें रक्षिसी म्हणोनि ॥८६॥
मज भरंवसा तुझा बहुत । वृध्दाप्याचा पोषक म्हणत । आम्हांसी सांडूनि जातां उचित । धर्म नव्हे पुत्रराया ॥८७॥
दु:ख झालें मज बहुत ।विसरल्यें बाळा तुज देखत । तूं तारक आमुचा सत्य । म्हणोनि विश्वास केला जाण ॥८८॥
ऐंसें नानापरी देखा । दु:ख करी ते बाळिका । निवारण करिती सकळ लोक । वाया दु:ख तूं कां करिसी ॥८९॥
देवदानवऋषेश्वरांसी । होणार न चुके परियेसीं । ब्रह्मा लिही ललाटेंसी। तेचि अढळ जाण सत्य ॥९०॥
अवतार होताति हरिहर । तेही न राहती स्थिर । उम्ही तरी मनुष्य नर । काय अढळ तुम्हांसी॥९१॥
येणेंपरी सांगती जन । आणखी दु:ख आठवी मन । म्हणे मातें दिधलीं जाण । स्थिर म्हणोनि दोन्ही फळें ॥९२॥
श्रीगुरु-नरसिंहसरस्वती । भूमंडळीं महाख्याति । औदुंबरी सदा वसती । त्यांणी दिधले मज सुत ॥९३॥
त्याचे बोल केवी मिथ्या । मातें दिधला वर सत्या । त्यासी घडो माझी हत्या। पुत्रासवें देईन प्राण ॥९४॥

म्हणोनि आठवी श्रीगुरूसी । देवा मातें गांजिलेंसी । विश्वास केला मी तुम्हांसी । सत्य वाक्य तुझें म्हणत ॥९५॥

सत्यसंकल्प तूंचि होसी । म्हणोनि होत्यें विश्वासीं । घात केला गा आम्हांसी । विश्वासघातकी केवी न म्हणों ॥९६॥

त्रयमूर्तीचा अवतारु । तुंचि नरसिंहसरस्वती गुरू। ध्रुवा विभीषणा दिधला वरु । केवीं सत्य म्हणों आतां ॥९७॥

विश्वास केला तुझे बोलें । आतां मातें उपेक्षिलें । माझ्या मनीं निश्चय केला । प्राण देईन तुम्हांवरी ॥९८॥

लोक येती तुझ्या स्थानीं । सेवा करिती निवसोनि । औदुंबरी प्रदक्षिणा करूनि । पुरश्चरणें करिताति ॥९९॥

आपण केलें पुरश्चरण । फळा आलें मज साधन । आतां तुजवरी देईन प्राण । काय विश्वास तुझ्या स्थानीं ॥१००॥

कीर्ति होईल सृष्टींत । आम्हां केला तुवां घात । पुढें तुज भजती भक्त । काय भरंवसा तयांसी ॥१॥

ब्रह्मस्वदोषें पीडोन । दृढ धरिले तुझे चरण । अंगीकारोनि मध्यें त्यजणें । कवण धर्म घडतसे ॥२॥

व्याघ्रातें धेनु भिऊन । जाय आणिकापाशीं ठासून । तोचि मारी तिचा प्राण । तयापरी झालें आपणासी ॥३॥

कीं एखादा पूजेसी । जाय देउळा संधीसी । तेंचि देऊळ तयासी । मृत्यु जोऊनि वर पडे ॥४॥

तयपरी आपणासी । जाहलें स्वामी परियेसीं । माझ्या प्राणसुतासी । न राखिसी देवराया ॥५॥

येणेंपरी अहोरात्री । दु:ख करीतसे ते नारी । उदय जाहला दिनकरीं । प्रात:काळीं परियेसा ॥६॥

द्विज ज्ञाते मिळोनि सकळी । येती तये स्त्रियेजवळी । वायां दु:ख सर्वकाळी । करिसी मूर्खपणें तूं ॥७॥

जे जे समयीं होणार गति । ब्रह्मादिकां न चुके ख्याति । चला जाऊं गंगेप्रती । प्रेतसंस्कार करूं आतां ॥८॥

ऐसें वचन ऐकोनि । महा आक्रोश करी मनी । आपणासहित घाला वन्ही । अथवा नेदी प्रेतासी ॥९॥

आपणासहित बाळासी । करा पां अग्निप्रवेशी । येरवी नेदीं प्रेतासी । म्हणोनि उरीं बांधी बाळा ॥११०॥

लोक म्हणती तियेसी । नव्हसी तूं स्त्री, कर्कशी । प्रेतासवें प्राण देसी । कवण धर्म सांग आम्हां ॥११॥

नाहीं देखिलें न ऐकों कानीं । पुत्रासवें देती प्राण कोणी । वायां बोलसी मूर्खपणीं । आत्महत्या महादोष ॥१२॥

नानापरी तियेसी । बोधिती लोक परियेसीं । निश्चय तिनें केला ऐसी । प्राण त्यजीन पुत्रासवें ॥१३॥

दिवस गेला दोन प्रहर । प्रेतासी करूं नेदी संस्कार । अथवा न ये गंगतीरा । ग्रामीं आकांत वर्तला ॥१४॥

इतुकिया अवसरीं । आला एक ब्रह्मचारी । सांगे तिसी सविस्तारीं । आत्मज्ञान तये वेळीं ॥१५॥

सिध्द म्हणे नामधारका । पुढें अपूर्व झालें ऐका । ब्रह्मचारी आला एका । बोधिता झाला ज्ञान तिसी ॥१६॥

बाळ नव्हे तोचि गुरु । आला नरवेषधारु । नरसिंहसरस्वती अवतारु । भक्तवत्सल परियेसा ॥१७॥

म्हणोनि सरस्वतीगंगाधर सांगे गुरुचरित्राविस्तार । ऐकता होय मनोहर । शतायुषी पुरुष होय ॥१८॥

भक्तिपूर्वक ऐकती जरी । व्याधि नव्हती त्यांचे । पूर्णायुषी ते होती अमरी । सत्य माना माझा बोल ॥११९॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिध्द-नामधारकसंवादे ब्रह्मसमंधपरिहार-प्रेतजननीशोकनं नाम विशोऽध्याय: ॥२०॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेव दत्त ॥ ( ओवीसंख्या ११९ )

## अध्याय एकविसावा

श्रीगणेशाय नमः ।

सिद्ध म्हणे नामधारका । ब्रह्मचारी कारणिका । उपदेशी ज्ञान निका । तये प्रेतजननीसी ॥१॥

ब्रह्मचारी म्हणे नारीसी । मूढपणे दुःख करिसी । कोण वाचला धरणीसी । या संसारी सांग मज ॥२॥

उपजला कोण मेला कोण । उत्पत्ति झाली कोठोन । जळात उपजे जैसा फेण । बुदबुद राहे कोठे स्थिर ॥३॥

जैसा देह पंचभूती । मिळोनि होय आकृति । वेगळी होता पंचभूती । अव्यक्त होय देह जाण ॥४॥

तया पंचभूतांचे गुण । मायापाशी वेष्टोन । भ्रांति लाविली मी देह म्हणोन । पुत्रमित्रकलत्रमिषे ॥५॥

सत्त्व रज तमोगुण । तया भूतांपासोन । वेगळाली केली लक्षण । होती ऐका एकचित्ते ॥६॥

देवत्व होय सत्त्वगुण । रजोगुण मनुष्य जाण । दैत्यांसी तमोगुण । गुणानुसारे कर्मे घडती ॥७॥

जेणे कर्मे आचरती । सुकृत अथवा दुष्कृति । तैशीच होय फळप्राप्ति । आपुले आपण भोगावे ॥८॥

जैसी गुणाची वासना । इंदिये तयाधीन जाणा । मायापाशी वेष्टोनि गहना । सुखदुःखे लिप्त करिती ॥९॥

या संसारवर्तमानी । उपजती जंतु कर्मानुगुणी । आपल्या आर्जवापासोनि । सुखदुःखादि भोगिती ॥१०॥

कल्पकोटी वरुषे ज्यांसी । असती आयुष्ये देवऋषि । न सुटे कर्म तयासी । मनुष्याचा कवण पाड ॥११॥

एखादा नर देहाधीन । काळ करी आपुले गुण । कर्म होय अनेक गुण । देहधारी येणेपरी ॥१२॥

जो असे देहधारी । तयासी विकार नानापरी । स्थिर नव्हे तो निर्धारी । आपुले पाप म्हणावया ॥१३॥

या कारणे ज्ञानवंत । संतोष न करी उपजत । अथवा नरा होय मृत्यु । दुःख आपण करू नये ॥१४॥

जधी गर्भसंभव होता । काय दिसे आकारता । अव्यक्त दिसे व्यक्तता । सवेचि होय अव्यक्त पै ॥१५॥

बुदबुद निघती जैसे जळी । सवेचि नष्ट तात्काळी । तैसा देह सर्वकाळी । स्थिर नव्हे सर्वथा ॥१६॥

जधी गर्भप्रसव झाले । विनाशी म्हणोनि जाणिले । कर्मानुबंधे जैसी फळे । तैसे भोगणे देहासी ॥१७॥

कोणी मरती पूर्ववयेसी । अथवा मरती वृद्धपणेसी । आपुले अर्जिती असती जैशी । तेणेपरी घडे जाण ॥१८॥

मायापाशी वेष्टोनि । म्हणती पिता सुत जननी । कलत्र मित्र तेणे गुणी । आपुले आपुले म्हणती मूढ ॥१९॥

निर्मळ देह म्हणो जरी । उत्पत्ति मांसरुधिरी । मळमूत्रांत अघोरी । उद्भव झाला परियेसा ॥२०॥

कर्मानुसार उपजतांची । ललाटी लिहितो विरंची । सुकृत अथवा दुष्कृतेची । भोग भोगणे म्हणोनि ॥२१॥

ऐसे कर्म काळासी । जिंकिले नाही परियेसी । या कारणे देहासी । नित्यत्व नाही परियेसा ॥२२॥

स्वप्नी निधान दिसे जैसे । कोणी धरावे भरवसे । इंद्रजाल गारूड जैसे । स्थिर केवी मानिजे ॥२३॥

तुझे तूचि सांग वहिले । कोटी वेळा जन्म झाले । मनुष्य किंवा पशुत्व लाधले । पक्षी अथवा कृमिरूप ॥२४॥

जरी होतीस मनुष्ययोनी । कोण कोणाची होतीस जननी । कोण कोणाची होतीस गृहिणी । सांग तुझे त्वा निश्चये ॥२५॥

कवण तुझी मातापिता । जन्मांतरींची सांग आता । वाया दुःख करिसी वृथा । पुत्र आपुला म्हणोनि ॥२६॥

पंचभूतात्मक देह । चर्ममांस-अस्थि-मज्जा -समूह । वेष्टोनिया नव देह । मळबद्ध शरीर नावे ॥२७॥

कैचा पुत्र कोठे मृत्यु । वाया भ्रमोनि का रडत । सांडोनि द्यावे कैचे प्रेत । संस्कारिती लौकिकार्थ ॥२८॥

येणेपरी ब्रह्मचारी । सांगे तत्त्व विस्तारी । परिसोनिया विप्रनारी । विनवितसे तयासी ॥२९॥

विप्रवनिता तये वेळी । विनवीतसे करुणा बहाळी । स्वामी निरोपिले धर्म सकळी । परी स्थिर नव्हे अंतःकरण ॥३०॥

प्रारब्ध प्रमाण म्हणो जरी । तरी का भजावा श्रीहरी । परीस संपर्क लोह जरी । सुवर्ण न होय कोण बोले ॥३१॥
आम्ही पहिले दैवहीन । म्हणोनि धरिले श्रीगुरुचरण । अभय दिधले नाही मरण । म्हणोनि विश्वासलो आम्ही ॥३२॥
एखाद्या नरा येता ज्वर । धुंडीत जाय वैद्यघर । औषध घेवोनि प्रतिकार । सवेचि करिती आरोग्यता ॥३३॥
एके समयी मनुष्यासी । आश्रय करिती करुणेसी । साह्य होय भरंवसी । आली आपदा परिहारी ॥३४॥
त्रयमूर्तीचा अवतार । श्रीनृसिंहसरस्वती असे नर । तेणे दिधला असे वर । केवी असत्य होय सांगे ॥३५॥
आराधिले म्या तयासी । वर दिधला गा मजसी । त्याचा भरवसा मानसी । धरोनि होते स्वस्थचित्त ॥३६॥
विश्वासुनी असता आपण । केवी केले निर्माण । कैसे झाले माझे मूर्खपण । म्हणोनि स्वामी निरोपिसी ॥३७॥
याकारणे आपण आता । प्राण त्यजीन तत्त्वता । देह समर्पीन श्रीगुरुनाथा । वाढो कीर्ति तयाची ॥३८॥
ऐकोनि तियेचे वचन । ओळखून भाव मन । सांगे बुद्धि तीस ज्ञान । उपाय यासी करी आता ॥३९॥
विश्वास केला श्रीगुरूसी । पुत्र लाधला पूर्णायुषी । जरी आला मृत्यु त्यासी । घेवोनि जाय गुरुस्थाना ॥४०॥
जेथे लाधला तुज वर । तेथे ठेवी कलेवर । पंचगंगाकृष्णातीर । औदुंबरवृक्षातळी ॥४१॥
ऐसे वचन ऐकोनि । विश्वास झाला तिचे मनी । पाठी शव बांधोनि । घेवोनि गेली औदुंबरा ॥४२॥
जेथे होत्या गुरुपादुका । आफळी शिर ते बालिका । रुधिरे भरल्या त्या पादुका । आक्रोशे रडे ती नारी ॥४३॥
समस्त शोकाहुनी अधिक । साहवेना पुत्रशोक । क्षयरोग तोचि एक । मातापितया मृत्युमूळ ॥४४॥
ऐसे करिता झाली निशी । विप्र मागती प्रेतासी । म्हणती आक्रोश का हो करिसी । संस्कारोनि जाऊ आता ॥४५॥
मनुष्य नाही अरण्यात । केवी राहू जाऊ म्हणत । जळू दे वो आता प्रेत । अहो कर्कशा म्हणे ती ज्ञाती ॥४६॥
काही केलिया नेदी प्रेत । आपणासवे जाळा म्हणत । पोटी बांधोनिया प्रेत । लोळतसे पादुकांवरी ॥४७॥
म्हणती विप्र ज्ञाती लोक । राहो नये रानी ऐक । तस्करबाधा होईल देख । जाऊ आता घरासी ॥४८॥
जाऊ स्नान करूनि । उपवास होय आजच्या दिनी । प्रातःकाळी येवोनि । दहन करू म्हणताती ॥४९॥
आजिचे रात्री प्रेतासी । सुटेल वास दुर्गंधीसी । देईल आपोआप दहनासी । त्रासून जाणा कर्कशा ॥५०॥
म्हणोनि निघती सकळ लोक । राहिले तेथे जननीजनक । प्रेत देखोनि करिती शोक । झाली रात्री परियेसा ॥५१॥
निद्रा नाही दिवस दोन्ही । शोक करिती जनकजननी । तीन याम होता रजनी । झोप आली तियेसी ॥५२॥
देखतसे सुषुप्तीत । जटाधारी भस्मोध्दूलित । व्याघ्रचर्मे परिधानित । रुद्राक्षमाळा सर्वांगी ॥५३॥
योगदंड त्रिशूळ हाती । आले औदुंबराप्रति । का हो शोक करिसी सती । आक्रोशोनि आम्हांवरी ॥५४॥
काय झाले तुझिया कुमारा । करू त्यासी प्रतिकारा । म्हणोनि दे तो अभय करा । भक्तवत्सला श्रीगुरु ॥५५॥
भस्म काढोनि प्रेतासी । लावीतसे सर्वांगासी । मुख पसरी म्हणे तिसी । वायुपूर करू म्हणे ॥५६॥
प्राण म्हणे वायु जाण । बाहेर गेला निघोन । घातला मागुती आणून । पुत्र तुझा जीवंत होय ॥५७॥
इतुके देखोनि भयचकित । झाली नारी जागृत । म्हणे आपणा कैसी भ्रांत । पडिली असे प्रेतावरी ॥५८॥
जे का वसे आपुले मनी । तैसेचि दिसे निद्रास्वप्नी । कैचा देव नृसिंहमुनि । भ्रांति आपणा लागलि असे ॥५९॥
आमुचे प्रारब्ध असे उणे । देवावरी बोल काय ठेवणे । अज्ञान आम्ही मूर्खपणे । श्रीगुरूवरी बोल काय ॥६०॥
येणेपरी चिंता करीत । तव प्रेतासी झाले चेत। सर्वांगही उष्ण होत । सर्वसंधी जीव आला ॥६१॥
म्हणे प्रेता काय झाले । किंवा भूत संचारले । मनी भय उपजले । ठेवी काढोनि दूर परते ॥६२॥

सर्व संधीसी जीव आला । बाळ उठोनि बैसला । म्हणे क्षुधा लागली मला । अन्न दे की म्हणे माते ॥६३॥
रुदन करीतसे तये वेळी । आला कुमार मातेजवळी । स्तन घालिता मुखकमळी । क्षीर निघे बत्तीस धारा ॥६४॥
संतोश भय होऊनि तिसी । संदेह वाटे मानसी । कडे घेऊनि बाळकासी । गेली आपुल्या पतीजवळी ॥६५॥
जागृत करूनि पतीसी । सांगे वृत्तान्त तयासी । पति म्हणे तियेसी । ऐसे चरित्र श्रीगुरूचे ॥६६॥
म्हणोनि दंपत्य दोघे जाणा । करोनि औदुंबरी प्रदक्षिणा । साष्टांग नमुनी चरणा । नानापरी स्तोत्रे करिती ॥६७॥
जय जयाजी वरदमूर्ति । ब्रह्मा विष्णु शिवयती । भक्तवत्सला तुझी ख्याति । वासना पहासी भक्तांची ॥६८॥
तू तारक विश्वासी । म्हणोनि भूमी अवतरलासी । अशक्य तूते वर्णावयासी क्षमा करणे स्वामिया ॥६९॥
बाळ जैसे कोपेसी । निष्ठुर बोले मातेसी । तैसे अविद्यामायापाशी । तुम्हा निष्ठुर बोलिलो ॥७०॥
सर्वस्वी आम्हा क्षमा करणे । म्हणोनि घालिती लोटांगणे । विनवोनिया करुणावचने । गेली स्नानासी गंगेत ॥७१॥
स्नान करोनि बाळकासहित । धुती झाली पादुकांचे रक्त । औदुंबरा स्नपन करीत । लाविती दीप तये वेळी ॥७२॥
पूजा करिती भक्तीसी । मंत्रपूर्वक विधींसी । शमीपत्र कुसुमेसी । पूजा करिती परियेसा ॥७३॥
नीरांजन तये वेळा । करिती गायन परिबळा । अतिसंतोषी ती अबला । भक्तिभावे स्तुति करीत ॥७४॥
इतुके होय तो गेली निशी । उदय झाला दिनकरासी । संस्कारू म्हणोनि प्रेतासी । आले विप्र ज्ञाती सकळ ॥७५॥
तव देखती कुमारासी । विस्मय झाला सकळिकांसी । समाधान करिती हर्षी । महा आनंद वर्तला ॥७६॥
ऐसा श्रीगुरुस्थानमहिमा । अखिल लोक लाधले कामा । एकेकाची सांगता महिमा । विस्तार होईल बहु कथा ॥७७॥
पुत्रप्राप्ति वांझेसी । श्रीप्राप्ति दारिद्र्यासी । आरोग्य होईल रोगियासी । अपमृत्यु न ये जाणा ॥७८॥
सिद्ध म्हणे नामधारका । स्थानमहिमा ऐशी ऐका । अपार असे सांगता देखा । साधारण निरोपिले ॥७९॥
तया औदुंबरातळी । श्रीगुरु वसे सर्वकाळी । काम्य होत तात्काळी । आराधिता नरहरीसी ॥८०॥
भाव असावा आपुले मनी । पूजा करावी श्रीगुरुचरणी । जी जी वासना ज्याचे मनी । त्वरित होय परियेसा ॥८१॥
हृदयशूळ गंडमाळ । अपस्मार रोग सकळ । परिहरती तात्काळ । श्रीगुरुपादुका अर्चिता ॥८२॥
जो असेल मंदमति । बधिर मुका चरण नसती । औदुंबरी सेवा करिती । सुदेह होय सत्य माना ॥८३॥
चतुर्विध पुरुषार्थ । तेथे होय निश्चित । प्रत्यक्ष वसे श्रीगुरुनाथ । औदुंबरी सनातन ॥८४॥
तया नाव कल्पतरू । प्रत्यक्ष झाणा औदुंबरू । जे जे मनी इच्छिती नरू । साध्य होय परियेसा ॥८५॥
किती वर्णू तेथील महिमा । सांगता अशक्य असे आम्हा । श्रीगुरुसरस्वती नामा । प्रख्यात असे परियेसा ॥८६॥
गंगाधराचा नंदन । सांगे गुरुचरित्र विस्तारोन । भक्तिपूर्वक ऐकती जे जन । सकलाभीष्टे पावती ॥८७॥
म्हणोनि सरस्वतीगंगाधर । सदा श्रीगुरुचरणी स्थिर । उतरवी पैलपार । इहसौख्य परगति ॥८८॥
इति श्रीगुरुचरित्रामृत । गुरुमाहात्म्यपरमामृत । विप्रपुत्रसंजीवनामृत । निरोपिले असे येथे ॥८९॥
इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे बालसंजीवन नाम एकविंशोऽध्यायः ॥२१॥
श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओवीसंख्या ॥८९॥
श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु

वेष्टोनिया मायापाशी । झालो आपण महातामसी । नोळखो तुझ्या स्वरूपासी । क्षमा करणे स्वामिया ॥३२॥
तू कृपाळु सर्वा भूती । आमुचे दोष नाणी चित्ती । आम्हा द्यावी उद्धारगति । म्हणोनि चरणी लागती ॥३३॥
एखादे समयी लीलेसी । पर्वत करसी तृणासरसी । पर्वत पाहसी कोपेसी । भस्म होय निर्धारी ॥३४॥
तूचि सृष्टि स्थापिसी । तूचि सर्वांचे पोषण करिसी । तूचि कर्ता प्रळयासी । त्रिमूर्ति जगद्गुरु ॥३५॥
तुझा महिमा वर्णावयासी । मति नाही आम्हांसी । उद्धरावे दीनासी । शरणागता वरप्रदा ॥३६॥
ऐसे विप्र विनविती । श्रीगुरु त्यासी निरोप देती । तुम्ही क्षोभविला भारती । त्रिविक्रम महामुनि ॥३७॥
आणिक केले बहुत दोषी । निंदिले सर्व विप्रांसी । पावाल जन्म ब्रह्मराक्षसी । आपुली जोडी भोगावी ॥३८॥
आपुले आर्जव आपणापासी । भोगिजे पुण्यपापासी । निष्कृति न होता क्रियमाणासी । गति नाही परियेसा ॥३९॥
श्रीगुरुवचन ऐकोनि । लागती विप्र दोघे चरणी । कधी उद्धरो भवार्णवी । म्हणोनिया विनविती ॥४०॥
श्रीगुरुनाथ कृपामूर्ति । त्या विप्रांते निरोप देती । ब्रह्मराक्षस व्हाल प्रख्याति । संवत्सर बारापर्यंत ॥४१॥
अनुतप्त झालिया कारण । शांतिरूप असाल जाण । जो का शुकनारायण । प्रथम वाक्य म्हणतसा ॥४२॥
तुमचे पाप शुद्ध होता । द्विज येईल पर्यटता । पुढील वाक्य तुम्हा सांगता । उद्धारगति होईल ॥४३॥
आता जावे गंगेसी । स्थान बरवे बैसावयासी । म्हणोनि निरोपिती त्यासी । गेले विप्र ते वेळी ॥४४॥
निघता ग्रामाबाहेरी । हृदयशूल अपरंपारी । जाता क्षण नदीतीरी । विप्र पंचत्व पावले ॥४५॥
आपण केल्या कर्मासी । प्रयत्न नाही आणिकासी । ऐसे विप्र तामसी । आत्मघातकी तेचि जाणा ॥४६॥
श्रीगुरुवचन येणेपरी । अन्यथा नव्हे निर्धारी । झाले राक्षस द्विजवरी । बारा वर्षी गति पावले ॥४७॥
विप्र पाठविले गंगेसी । मागे कथा वर्तली कैसी । नामधारक शिष्यासी । सिद्ध सांगे अवधारा ॥४८॥
पतित झाला महाज्ञानी । जातिस्मरण सप्तजन्मी । पूर्वापार विप्र म्हणोनि । निर्धार केला मनात ॥४९॥
नमन करूनि श्रीगुरूसी । विनवी पतित भक्तीसी । अज्ञानमाया तिमिरासी । ज्योतिरूप जगद्गुरु ॥५०॥
विप्र होतो पूर्वी आपण । केवी झालो जातिहीन । सांगावे जी विस्तारोन । त्रिकाळज्ञान अंतरसाक्षी ॥५१॥
जन्मांतरी आपण देख । पाप केले महादोष । की विरोधिले विनायक । नृसिंहसरस्वती सांग पा ॥५२॥
ऐसे वचन ऐकोनि । सांगती गुरु प्रकाशूनि । म्हणोनि सांगती सिद्धमुनि । नामधारक शिष्यासी ॥५३॥
म्हणोनि सरस्वतीगंगाधर । सांगे गुरुचरित्रविस्तार । पुढील कथा ऐकता नर । पतित होय ब्रह्मज्ञानी ॥५४॥
ऐसी पुण्यपावन कथा । ऐकता उद्धार अनाथा । पावे चतुर्विध पुरुषार्था । निश्चयेसी जाण पा ॥५५॥
इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे मदोन्मत्तविप्रशापकथनं नाम सप्तविंशोऽध्यायः ॥२७॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओवीसंख्या ॥५५॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु

# अध्याय अठ्ठाविसावा

श्रीगणेशाय नमः ।

नामधारक म्हणे सिद्धासी । पुढील कथा सांग आम्हांसी । उल्हास माझे मानसी । गुरुचरित्र अतिगोड ॥१॥

सिद्ध म्हणे नामधारका । कथा असे अतिविशेष । ऐकता जाती सर्व दोष । ज्ञानज्योतिप्रकाशे ॥२॥

श्रीगुरु म्हणती पतितासी । आपुले पूर्वजन्म पुससी । सांगेन ऐक परियेसी । चांडालजन्म होणार गति ॥३॥

पुण्यपापांची गति । आपुले आर्जव भोगिती । कर्मविपाकी असे ख्याति । नीचश्रेष्ठकर्मानुसारी ॥४॥

विप्र क्षत्रिय वैश्य शूद्र वर्ण । यांचेपासाव चांडाल वर्ण । उपजला असता ज्ञातिहीन । जातिविभाग कर्मापरी ॥५॥

विप्रस्त्रियेपासी देखा । शूद्र जाय व्यभिचारिका । पिंड उपजे तो चांडालिका । सोळावी जाती चांडाल ॥६॥

हे मूळ उत्पत्तीचे लक्षण । नाना दोषांचे आचरण । तेणे हीन जन्म घेणे । विप्रादि चारी वर्णांसी ॥७॥

या दोषाचा विस्तार । सांगतो की सविस्तर । विप्रे करिता अनाचार । जन्म हीनजाती पावे ॥८॥

गुरु अथवा मातापिता । सांडोनि जाय तत्त्वतां । चांडालजन्म होय निरुता । सोडिता कुलस्त्रियेसी ॥९॥

कुलदेवता सोडोनि एका । पूजा करी आणिका । तो होय चांडाल देखा । सदा अनृत बोले नर ॥१०॥

सदा जीवहिंसा करी । कन्याविक्रय मनोहरी । लटिकेचि आपण प्रमाण करी । तोही जन्मे चांडालयोनी ॥११॥

शूद्रहस्ते करी भोजन । अश्वविक्रय करी ब्राह्मण । तोही चांडाल होय जाण । सदा शूद्रसंपर्कै ॥१२॥

शूद्रस्त्रीसी सदा संग । नित्य असे दासीयोग । गृहभांड अतळती त्याग । तेणे देवपितृकर्मे करी ॥१३॥

तोही पावे हीनयोनी । जो का अग्नि-घाली रानी । गायवासरांसी विघडोनि । वेगळी करी तोही । होय चांडाल ॥१४॥

सोडी आपुल्या जननीते । आणि मारी लेकराते । वेगळी करी आपुल्या सत्ते । तोही जन्मे चांडाल ॥१५॥

बैलावरी विप्र बैसे । शूद्रान्न जेवी हर्षे । चांडाल होय भरवसे । ऐसे म्हणती श्रीगुरु ॥१६॥

विप्र तीर्थास जावोन । श्राद्धादि न करी जाण । परान्न प्रतिग्रह घेणे । तो होय चांडाल ॥१७॥

षट्कर्मेरहित विप्र देखा । कपिला गाईचे दुग्ध ऐका । न करिता अभिषेका । क्षीरपान जो करी ॥१८॥

तोही पावे चांडालयोनी । तुळसीपत्रे ओरपोनि । पूजा करी देवांलागोनि । शालिग्राम शूद्रे भजलिया ॥१९॥

न सेवीच मातापिता । त्यजी त्यासी न प्रतिपाळिता । चांडाल होय जन्मता । सप्तजन्मी कृमि होय ॥२०॥

पहिली एक स्त्री असता । दुजी करोनि तिसी त्यजिता । होय जन्म त्यासी पतिता । आणिक सांगेन एक नवल ॥२१॥

श्रमोनि अतिथी आला असता । वेद म्हणवोनि अन्न घालिता । जन्म पावे हा तत्त्वता । चांडालयोनी परियेसा ॥२२॥

योग्य विप्रांते निंदिती । आणिक जाती पूजिती । चांडालयोनी जाती । वृत्तिलोप केलिया ॥२३॥

तळी विहिरी फोडी मोडी । शिवालयी पूजा तोडी । ब्राह्मणांची घरे मोडी । तोही जन्मे पतितकुळी ॥२४॥

स्वामिस्त्रियेसी । शत्रुमित्रविश्वासस्त्रीसी । जो करी व्याभिचारासी । तोही जन्मे पतितागृही ॥२५॥

दोघी स्त्रिया जयासी । त्यात ठेवी प्रपंचेसी । अतिथि आलिया अस्तमानासी । ग्रास न दे तोही पतित होय ॥२६॥

त्रिसंध्यासमयी देखा । जो विप्र जेवी अविवेका । भाक देउनी फिरे निका । तो जन्मे चांडालयोनी ॥२७॥

राजे देती भूमिदान । आपण घेती हिरोन । संध्याकाली करी शयन । तोही होय चांडाल ॥२८॥

वैश्वदेवकालि अतिथीसी । जो करी दुष्टोत्तरेसी । अन्न न देई तयासी । कुक्कुटजन्म होवोनि उपजे ॥२९॥

गंगातीर्थांची निंदा करी । एकादशी भोजन करी । स्वामीस सोडी समरी । चांडालयोनी तया जन्म ॥३०॥

स्त्री संभोगी पर्वणीसी । अथवा हरिहरादिवशी । वेद शिकवी शूद्रासी । चांडालयोनी जन्म पावे ॥३१॥

मृत्युदिवसी न करी श्राद्ध । केले पुण्य सांगे प्रसिद्ध । वाटेकरांसी करी भेद । चांडालयोनी जन्म पावे ॥३२॥

ग्रीष्मकाली अरण्यात । पोई घालिती ज्ञानवंत । तेथे विघ्न जो करी । तोही जन्मे चांडालयोनी ॥३३॥

नाडीभेद न कळता वैद्यकी । जाणोनि औषधे दे आणिकी । तो होय महापातकी । चांडालयोनीत संभवे ॥३४॥

जारण मारण मोहनादि । मंत्र जपती कुबुद्धि । जन्म चांडाल होय त्रिशुद्धी । वेदमार्ग त्यजिता विप्रे ॥३५॥

श्रीगुरुसी नर म्हणे कोण । हरिहराते निंदे जाण । अन्य देवतांचे करी पूजन । तो नर पतित होय ॥३६॥

ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । आपुले कर्म त्यजूनि मंद । आणिक कर्म आचरे सदा । तोही होय चांडाल ॥३७॥

शूद्रापासूनी मंत्र शिके । त्यासी घडती सर्व पातके । गंगोदक क्षीरोदके । श्वानचर्मी घातले परी ॥३८॥

विधवा स्त्रीशी संग करी । शिव्या देऊन अतिथि जेववी घरी । श्राद्धदिनी पिंड न करी । चांडालयोनी तो जन्मे ॥३९॥

माता पिता गुरु द्वेषी । तो जन्मे चांडालयोनीसी । आणिक जन्म पापवंशी । उपजोनि येती परियेसा ॥४०॥

गुरूची निंदा करी हर्षी । सदा असे विप्रद्वेषी । वेदचर्चा करी बहुवशी । तो होय ब्रह्मराक्षस ॥४१॥

भजे आपण एक दैवत । दुजे देव निंदा करीत । तो होय अपस्मारित । दरिद्ररूपे पीडतसे ॥४२॥

माता पिता गुरु वर्जोन । वेगळा होय स्त्री आपण । बेरडाचे पोटी उपजोन । रोगी होऊन राहतसे ॥४३॥

सदा वेद दूषी आपण । अवमानीत ब्राह्मण । कर्मभ्रष्ट होय आपण । मूत्रकृच्छ्ररोगी होय ॥४४॥

लोकांचे वर्मकर्म आपण । सदा करी उच्चारण । हृदयरोगी होय जाण । महाकष्ट भोगीतसे ॥४५॥

गर्भपात करी स्त्रियेसी । वांझ होवोनि उपजे परियेसी । पुत्र झालिया मरती त्वरेसी । गर्भपात करू नये ॥४६॥

धर्मशास्त्रादि पुराण । सांगता नायके जाण । आणिक जेविता दृष्टि आपण । बहिरट होवोनि उपजे ॥४७॥

पतितासवे करी इष्टती । गर्दभजन्म पावती । त्यासी रस औषध घेती । मृगयोनी जन्मे तो ॥४८॥

ब्रह्महत्या केली जरी । क्षयरोगी होय निर्धारी । सुरापानी ओळखा परी । श्यामदंत उपजेल ॥४९॥

अश्ववध गोवध करिता । वांझ ज्वरी होय निश्चिता । सवेचि होय अनुतप्तता । दोष काही नाही त्यासी ॥५०॥

विश्वासघातकी नरासी । जन्म होय ऐसा त्यासी । अन्न जेविता वांति उर्वशी । अन्नवैरी तो होय ॥५१॥

सेवक एकाचा चाळवोन । घेवोनि जाती जे जन । त्यासी होय जाण बंधन । कारागृह भोगीतसे ॥५२॥

सर्पजाती मारी नर । सर्पयोनी पुढे निर्धार । ऐसे दोष अपार । आता तस्कर प्रकरण सांगेन ॥५३॥

स्त्रियांते चोरूनि घेऊनि जाय । मतिहीन जन्म होय । सदा क्लेशी आपण होय । अंती जाय नरकासी ॥५४॥

सुवर्णचोरी करी नर । प्रमेहव्याधि होय निर्धार । पुस्तक चोरिता नर । अंध होउनि उपजे देखा ॥५५॥

वेस्त्रचोरी करी जरी । श्वित्री रोगी होय निर्धारी । गणद्रव्यचोरी घरी । ब्रह्मांडपुराणी बोलिले असे ॥५७॥

परद्रव्य-अपहार देखा । परदत्तापहार विशेषा । परद्वेषी नर ऐका । धान्य अपुत्री होउनि उपजे ॥५८॥

अन्नचोरी केलिया देखा । गुल्मव्याधि होय ऐका । धान्य करील तस्करिका । रक्तांग होय दुर्गंध शरीर ॥५९॥

का एखादा तैल चोरी । तोही दुर्गंधी पावे शरीरी । परस्त्रीब्रह्मस्व अपहारी । ब्रह्मराक्षसजन्म पावे ॥६०॥

मोती माणिक रत्ने देखा । चोरी करी नर ऐका । हीनजातीसी जन्म निका । पावे नर अवधारा ॥६१॥

पत्रशाखादि फळे चोरी । खरूजी होय अपरंपारी । रक्तांगी होय निर्धारी । गोचिड होय तो नर ॥६२॥

कांस्य लोह कर्पास लवण । तस्करिता नरा जाण । श्वेतकुष्ठ होय निर्गुण । विचारोनि रहाटावे ॥६३॥

देवद्रव्यापहारी देखा । देवकार्यनाश अपहार देखा । पंडुरोगी तो निका । फळचोरी विद्रूपी ॥६४॥

परनिक्षेपचोरी करी देखा । करिता होय सदा शोका । धनतस्कर उंष्ट्र ऐका । जन्म पावे अवधारा ॥६५॥

फलचोरी होय वनचर । जलचोरही होय कावळा थोर । गृहोपकरणे तस्कर । काकजन्म तो पावे ॥६६॥

मधुतस्कर अवधारी । जन्म पावे होय घारी । गोरस करी चोरी । कुष्ठी होय परियेसा ॥६७॥

श्रीगुरु म्हणती पतितासी । जन्म पावे ऐसिया दोषी । आता सांगेन व्यभिचारप्रकरणेसी । शांतिपर्वी बोलिले असे ॥६८॥

परस्त्री आलिंगिया देखा । शतजन्म श्वान निका । पुढे मागुती सप्तजन्मिका । भोगी दुःखा अवधारा ॥६९॥

परस्त्रीयोनी पाहे दृष्टीने । जन्मे तो अंधत्वपणे । बंधुभार्यासंपर्क करणे । गर्दभजन्म तो पावे ॥७०॥

तोही जन्म सोडोनि । निघोनि जाय सर्पयोनी । पुन्हा नरकी जावोनि । नाना कष्ट भोगीतसे ॥७१॥

सखीभार्यासवे ऐका । मातुलस्त्री असे विशेखा । येखादा करी संपर्का । श्वानयोनी जन्म पावे ॥७२॥

परस्त्रियांचे वदन । न करावे कदा अवलोकन । कुबुद्धी करिता निरीक्षण । चक्षुरोगी होऊनि उपजे ॥७३॥

आपण असे शूद्रजाति । विप्रस्त्रीशी करी रति । ती दोघेही कृमि होती । हे निश्चित अवधारा ॥७४॥

सदा शूद्रसंपर्क करी । याची स्त्री व्यभिचारी । जन्म पावे हो कुतरी । महादोष बोलिलासे ॥७५॥

ऐसे तया पतिताप्रती । श्रीगुरु आपण निरोपिती । ऐकत होता त्रिविक्रमभारती । प्रश्न केला श्रीगुरूसी ॥७६॥

स्वामी निरोपिले धर्म सकळ । ऐकता होय मन निर्मळ । जरी घडले एक वेळ । पाप जाय कवणेपरी ॥७७॥

श्रीगुरु म्हणती त्रिविक्रमासी । प्रायश्चित्त असे पापासी । पश्चात्ताप होय ज्यासी । पाप नाही सर्वथा ॥७८॥

पाप असे थोर केले । अंतःकरणी असे खोचले । त्यासी प्रायश्चित्त भले । कर्मविपाकी बोलिले ॥७९॥

प्रायश्चित्तांची विधाने । सांगेन ऐका स्थिर मने । अनेक ऋषींची वचने । ती सांगेन ऐका तुम्ही ॥८०॥

प्रथम व्हावा ब्रह्मदंड । तेणे होय पापखंड । गोदाने सालंकृत अखंड । अशक्त तरी द्रव्य द्यावे ॥८१॥

निष्क अथवा अर्धनिष्क । सूक्ष्म पाप पाव निष्क । स्थूलसूक्ष्म असेल पातक । तेणे विधीं द्रव्य द्यावे ॥८२॥

अज्ञानकृत पापासी । पश्चात्तापे शुद्धि परियेसी । गुरुसेवा तत्परेसी । केलिया गुरु निवारी ॥८३॥

नेणता पाप केलियासी । प्रायश्चित्त असे परियेसी । प्राणायाम द्विशतेसी । पुण्यतीर्थी दहा स्नाने ॥८४॥

तीन गुंजा सुवर्ण द्यावे । नदी आचरावे दोन गावे । सौम्य पातक याचि भावे । जाती पापे परियेसी ॥८५॥

स्त्रीपुरुष दोघांत एक । करिती पुण्यपाप दोष । दोघेही पडती दोषात । दोघे आचरावे प्रायश्चित्त ॥८६॥

आणिक एक असे प्रकार । जेणे पाप होय दूर । गायत्रीजप दहा सहस्त्र । करावा तेणे वेदमंत्र ॥८७॥

याचे नाव गायत्रीकृच्छ्र । महादोषी करी पवित्र । ऐसे करावे विचित्र । श्रीगुरु सांगती त्रिविक्रमासी ॥८८॥

प्राजापत्यकृच्छ्र देखा । असे विधि अतिविशेषा । भोजन करावे मुक्त एका । अथवा अयाचित भिक्षा ॥८९॥

उपवास करावे तीन दिवस । स्मरावे गुरुचरणास । येणे जाती सौम्य दोष । जे आपणासी सामान्य ॥९०॥

'अतिकच्छ्र' असे एक । एकचित्ते मुनि ऐक । दोष असतील सामान्यक । अज्ञानेचि केलिया ॥९१॥

अन्न घ्यावे सप्तविंशति ग्रास । सकाळी बारा रात्री पंचदश । अथवा दोनी अष्ट ग्रास । अयाचित अन्न द्यावे ॥९२॥

ऐसे सौम्य पातकासी । विधि असती परियेसी । मास एक नेमेसी । अंजुली एक जेवावे ॥९३॥

उपवास तीन करावे देखा । प्रकार सांगेन आणिका । तीन दिन उपोषका । घृतपारणे करावे ॥९४॥

तीन दिवस घृत घेवोनि । क्षीर घ्यावे दिवस तीनी । तीन दिवस वायु भक्षोनि । पुनः क्षीर एक दिवस ॥९५॥

एखादा असेल अशक्त । तयासी असे एक व्रत । तीळ गुळ लाह्या पीठ । उपवास एक करावा ॥९६॥

पूर्णकृच्छ्र करा ऐसी । पर्णोदक घ्यावे प्रतिदिवशी । करावे तितके उपवासी । पश्चात्तापे प्राशन कीजे ॥९७॥

कमल बिल्व अश्वत्थ । कुशोदक बिंदु नित्य । पान करावे सत्य । पर्णकृच्छ्र परियेसा ॥९८॥

आणिक एक प्रकार । करी चांद्रायण-आचार । कुक्कुटांडप्रमाण आहार । ग्रास घ्यावे वर्धमानी ॥९९॥

अमावास्येसी एक ग्रास । पौर्णिमेसी पंचदश । कृष्णपक्षी उतरत । दुसरे मासी हविष्यान्न ॥१००॥

आपले पाप प्रगटूनि । उच्चारावे सभास्थानी । पश्चात्तापे जळूनि । पाप जाय अवधारा ॥१॥

आता सांगेन तीर्थकृच्छ्र । यात्रा करावी पवित्र । वाराणसी श्वेतपर्वत । स्नानमात्रे पापे जाती ॥२॥

वरकड तीर्थी गेलियासी । गायत्रीजप सहस्त्रेसी । पाप जाय त्वरेसी । अगस्तीवचन बोलिले असे ॥३॥

समुद्रसेतुबंधेसी । स्नान केलिया परियेसी । भ्रूणहत्यापाप नाशी । कृतघ्नादि पातके ॥४॥

विधिपूर्वक शुचीसी । जप कोटी गायत्रीसी । ब्रह्महत्यापाप नाशी । ऐके त्रिविक्रम एकचित्ते ॥५॥

लक्ष गायत्री जप केलिया । सुरापानपाप जाय लया । सुवर्णचोरी केलिया । सात लक्ष जपावे ॥६॥

अष्ट लक्ष गुरुतल्पगासी । गायत्री जपता पाप नाशी । आता सांगेन परियेसी । वेदाक्षरे पाप दूर ॥७॥

पवमानसूक्त चत्वारी । पठण करिता ब्रह्महत्या दूरी । इंद्रमित्र अवधारी । एक मास जपावे ॥८॥

सुरापानादि पातके । जातील येणे सूक्तके । शुनःशेपा नाम सूक्ते । सुवर्णहरा पाप जाय ॥९॥

पवमानशन्नसूक्त । पठण करिता हविष्योक्त । मास एक पठत । गुरुतल्पगादिक हरती ॥११०॥

पंच मास सहा मास । मिताहर करुनी पुरुष । पुरुषसूक्ते कर्मनाश । पंचमहापापे नासती ॥११॥

त्रिमधु म्हणेजे मंत्रसूक्त । सुवर्णात्रीनास मंत्र । जपावे नाचिकेत । समस्त पातके प्रायश्चित्त ॥१२॥

नारायणपन्न देखा । जपावे भक्तिपूर्वका । नाशी पंच महापातका । प्रीतिपूर्वक जपावे ॥१३॥

त्रिपदा नाम गायत्रीसी । जपती जे भक्तीसी । अघमर्षण त्रिरावृत्तेसी । सप्त जन्म पाप जाय ॥१४॥

अपांमध्य पन्नासी । तद्विष्णो नाम सूक्तेसी । जपती जे जन भक्तीसी । सप्त जन्म पाप जाय ॥१५॥

आणिक असे विधान देखा । अज्ञानकृत दोषादिका । अनुतप्त होवोनि विशेषा । पंचगव्य प्राशन कीजे ॥१६॥

गोमूत्र गोमय क्षीर । दधि घृत कुशसार । विधिमंत्रे घ्यावे निर्धार । पहिले दिनी उपवास ॥१७॥

नीलवर्ण गोमूत्र । कृष्णगोमय पवित्र । ताम्र गायत्रीचे क्षीर । श्वेतधेनूचे दधि घ्यावे ॥१८॥

कपिला गाईचे तूप बरवे । ऐसे पंचगव्य बरवे घ्यावे । एकेकाचे क्लप्त भावे । सांगेन सर्व अवधारा ॥१९॥

गोमूत्र घ्यावे पावशेर। अंगुष्ठपर्व गोमय पवित्र । क्षीर पावणे दोन शेर । दधि तीन पाव घ्यावे ॥१२०॥

घृत घ्यावे पाव शेर । तितुकेचि मिळवावे कुशनीर । घेता मंत्र उच्चार । विस्तारोनि सांगेन ॥२१॥

कुशांसहित सहा रसे । एकेकासी मंत्र पृथक् असे । प्रथम मंत्र इरावती असे । इदं विष्णु दुजा देख ॥२२॥

मानस्तोक मंत्र तिसरा । प्रजापति चतुर्थ अवधारा । पंचम गायत्री उच्चारा । सहावी व्याह्रति प्रणवपूर्वका ॥२३॥

ऐसे मंत्रोनि पंचगव्य । प्यावे अनुतप्त एकभाव । अस्थिगत चर्मगत पूर्व । पापे जाती अवधारा ॥२४॥

गाई न मिळता इतुके जिन्नसी । कपिला गाय मुख्य परियेसी । दर्शनमात्रे दोष नाशी । कपिला गाई उत्तम ॥२५॥

पंचमहापातक नावे । ब्रह्महत्या सुरापान जाणावे । स्वर्णस्तेय गुरुतल्पग जाणावे । पाचवा त्यासवे मिळालेला ॥२६॥

चौघे पातकी देखा । पाचवा तया मिळता देखा । त्यासहित पंचमहापातका । आहेती पापे परियेसा ॥२७॥
सुरापानी ब्रह्मघातकी । सुवर्णस्तेय गुरुतल्पकी । पाचवा महाघातकी । जो सानुकूळ मिळे तो ॥२८॥
ऐसे पातक घडे त्यासी । प्रायश्चित्त परियेसी । श्रीगुरुसंतोषी । अनुग्रहे पुनीत ॥२९॥
एखादा मिळेल शास्त्रज्ञ । स्वधर्माचारे अभिज्ञ । त्याच्या अनुग्रहे पापघ्न । पुनीत होय अवधारा ॥१३०॥
ऐसे श्रीगुरु त्रिक्रमासी । प्रायश्चित्त सांगती परियेसी । सकल विप्र संतोषी । ज्ञानप्रकाशे होती ॥३१॥
श्रीगुरु म्हणती पतितासी । पूर्वी तू विप्र होतासी । माता पिता गुरु दूषी । तेणे होय चांडालजन्म ॥३२॥
आता सांगतो ऐक । स्नानसंगमी मास एक । केलिया दोष जाती निःशंक । पुनः विप्रजन्म होसी ॥३३॥
पतित म्हणे स्वामीसी । तव दर्शन जाहले आम्हांसी । कावळा जाता मानसासी । राजहंस तो होतसे ॥३४॥
तैस तव दर्शनमात्रे । पवित्र झाली सकळ गात्रे । तारावे आता त्वा कृपापात्रे । शरणागतासी ॥३५॥
परिस लागता लोखंडासी । सुवर्ण होय तत्क्षणेसी । सुवर्ण मागुती लोहासी । केवी मिळे स्वामिया ॥३६॥
तव दर्शनसुधारसी । आपण झालो ज्ञानराशी । अभिमंत्रोनि आम्हांसी । विप्रांमध्ये मिळवावे ॥३७॥
ऐकोनि तयाचे वचन । गुरु बोलती हासोन । तव देह जातिहीन । विप्र केवी म्हणतील ॥३८॥
पतिताच्या गृहासी । उपजोनि तू वाढलासी । ब्रह्मत्व केवी पावसी । विप्र निंदा करितील ॥३९॥
पूर्वी ऐसा विश्वामित्र । क्षत्रियवंशी गाधिपुत्र । तपोबळे म्हणवी पवित्र । म्हणे तो विप्र आपणा ॥१४०॥
ब्रह्मयाची शत वर्षे । तप केले महाक्लेशे । त्याचे बळे म्हणवीतसे । ब्रह्मऋषी आपणा ॥४१॥
इंद्रादि सुरवरांसी । विनविता झाला परियेसी । आपणाते ब्रह्मर्षि । म्हणा ऐसे बोलतसे ॥४२॥
देव म्हणती तयासी । आम्हा गुरु वसिष्ठ ऋषि । जरी तो बोले ब्रह्मऋषि । तरी आम्ही अंगिकारू ॥४३॥
मग त्या वसिष्ठासी । विनवी विश्वामित्र ऋषि । विप्र म्हणा आपणासी । केले तप बहुकाळ ॥४४॥
वसिष्ठ म्हणे विश्वामित्र । क्षत्रिय तपास अपात्र । देह टाकोनि मग पवित्र । विप्रकुळी जन्मावे ॥४५॥
मग तुझा होईल व्रतबंध । होईल गायत्रीप्रबोध । तधी तुवा होसी शुद्ध । ब्रह्मऋषि नाम तुझे ॥४६॥
काही केल्या न म्हणे विप्र । मग कोपला विश्वामित्र । वसिष्ठाचे शत पुत्र । मारिता झाला तये वेळी ॥४७॥
ब्रह्मज्ञानी वसिष्ठ ऋषि । नव्हे कदा तामसी । अथवा न म्हणे ब्रह्मऋषि । तया विश्वामित्रासी ॥४८॥
वर्तता ऐसे एके दिवसी । विश्वामित्र कोपेसी । हाती घेउनी पर्वतासी । घालू आला वसिष्ठावरी ॥४९॥
विचार करीत मागुती मनी । जरी वधीन वसिष्ठमुनि । आपणाते न म्हणे कोणी । ब्रह्मऋषि म्हणोनिया ॥१५०॥
इंद्रादि देव समस्त ऋषि । म्हणती वसिष्ठवाक्यासरसी । आपण म्हणो ब्रह्मऋषि । अन्यथा नाही म्हणोनिया ॥५१॥
ऐशा वसिष्ठमुनीस । मारिता यासी फार दोष । म्हणोनि टाकी गिरिवरास । भूमीवरी परियेसा ॥५२॥
अनुतप्त झाला अंतःकरणी । वसिष्ठे ते ओळखूनि । ब्रह्मऋषि म्हणोनि । पाचारिले तये वेळी ॥५३॥
संतोषोनि विश्वामित्र । म्हणे बोल बोलिला पवित्र । म्हणे घरी अन्नमात्र । तुम्ही घ्यावे स्वामिया ॥५४॥
संतोषोनि वसिष्ठ । तयालागी बोलत । म्हणे शरीर हे निभ्रांत । सूर्यकिरणी पचवावे ॥५५॥
विश्वामित्रे अंगिकारिले । सूर्यकिरणे देहा जाळिले । सहस्त्रकिरणी तापले । देह सर्व भस्म झाला ॥५६॥
विश्वामित्र महामुनि । अतिसामर्थ्य अनुष्ठानी । पहिला देह जाळोनि । नूतन देह धरियेला ॥५७॥
ब्रह्मर्षि तेथोन । विश्वामित्र झाला जाण । सकळांसी मान्य । महाराज ॥५८॥

मग म्हणती सकळ मुनि । विश्वामित्र ब्रह्मज्ञानी । ब्रह्मऋषी म्हणोनि । झाला त्रिभुवनी प्रख्यात ॥५९॥

या कारणे तव देह । विसर्जावा जन्म इह । अनुतप्त तव भाव । ब्रह्मकुल भाविसी ॥१६०॥

ऐसे त्या पतितासी । बोधिता गुरु परियेसी । लाधले सुख त्यासी । त्याच्या मानसी न ये काही ॥६१॥

निधान सापडे दरिद्र्यासी । तो का सांडील संतोषी । अमृत सापडता रोग्यासी । का सांडील जीवित्व ॥६२॥

एखादे ढोर उपवासी । पावे तृणबिढारासी । तेथोनि जावया त्यासी । मन नव्हे सर्वथा ॥६३॥

तैसे त्या पतितासी । लागले ध्यान गुरूसी । न जाय आपुल्या मंदिरासी । विप्र आपणा म्हणतसे ॥६४॥

इतुके होता ते अवसरी । आली त्यांची पुत्रनारी । म्हणो लागले अपस्मारी । म्हणोनि आलो धावत ॥६५॥

जवळ येता स्त्रियेसी । स्पर्शो नको म्हणे तिसी । कोपेकरोनि मारावयासी । जात असे तो पतित ॥६६॥

दुःख करी ती भार्या । दुरुनी नमे गुरुपाया । पति माते सोडोनिया । जातो आता काय करू ॥६७॥

कन्या पुत्र मज बहुत । तया कोण पाळित । आम्हा सांडोनि जातो किमर्थ । सांगा तयासी स्वामिया ॥६८॥

जरी न सांगाल स्वामी त्यासी । त्यजीन प्राण पुत्रासरसी । येरवी आपणाते कोण पोषी । अनाथ मी स्वामिया ॥६९॥

ऐकोनि तियेचे वचन । गुरु बोलती हासोन । त्या नराते बोलावून । सांगताती परियेसा ॥१७०॥

गुरु म्हणती पतितासी । जावे आपुल्या घरासी । पुत्रकलश क्षोभता दोषी । तूते केवी गति होय ॥७१॥

या संसारी जन्मोनिया । संतोषवावे इंद्रिया । मग पावे धर्मकाया । तरीच तरे भवार्णव ॥७२॥

या कारणे पूर्वीच जाणा । न करावी आपण अंगना । करोनि तिसी त्यजिता जाणा । महादोष बोलिजे ॥७३॥

सूर्य-भूमी-साक्षीसी । तुवा वरिले स्त्रियेसी । तीस त्यागिता महादोषी । तूते नव्हे गति जाण ॥७४॥

श्रीगुरुवचन ऐकोन । विनवीतसे कर जोडून । केवी होऊ जातिहीन । ज्ञान होवोनि मागुती ॥७५॥

श्रीगुरु मनी विचारिती । याचे अंगी असे विभूति । प्रक्षाळावे लुब्धका-हाती । अज्ञानत्व पावेल ॥७६॥

ऐसे मनी विचारूनि । सांगती शिष्यासी बोलावोनि । एका लुब्धका पाचारोनि । आणा अतित्वरेसी ॥७७॥

तया ग्रामी द्विज एक । करी उदीम वाणिक । तयाते पाचारिती ऐक । तया पतितासन्निध ॥७८॥

श्रीगुरु म्हणती त्यासी । उदक घेवोनि हस्तेसी । स्नपन करी गा पतितासी । होय आसक्त संसारी ॥७९॥

आज्ञा होता ब्राह्मण । आला उदक घेऊन । त्यावरी घालिता तत्क्षण । गेली विभूति धुवोनि ॥८०॥

विभूति धूता पतिताचे । झाले अज्ञान मन त्याचे । मुख पाहता स्त्री-पुत्रांचे । धावत गेला त्याजवळी ॥८१॥

आलिंगोनिया पुत्रासी । भ्रांति म्हणे त्यासी । का आलो या स्थळासी । तुम्ही आला कवण कार्या ॥८२॥

ऐसा मनी विस्मय करीत । निघोनि घरा गेला पतित । सांगितला वृत्तान्त । विस्मय सर्व करिताती ॥८३॥

इतुके झाले कौतुक । पहाती नगरलोक । विस्मय करिती सकळिक । म्हणती अभिनव काय झाले ॥८४॥

त्रिविक्रमभारती मुनि । जो का होता गुरुसन्निधानी । पुसतसे विनवोनि । ऐका श्रोते एकचित्ते ॥८५॥

त्रिविक्रम म्हणे श्रीगुरूसी । होतो संदेह मानसी । निरोप द्यावा कृपेसी । विनंती एक अवधारा ॥८६॥

महापतित जातिहीन जाण । तयाते दिधले दिव्यज्ञान । अंग धुता तत्क्षण । गेले ज्ञान केवी त्याचे ॥८७॥

विस्तारोनि आम्हांसी । निरोपावे कृपेसी । म्हणोनि लागला चरणांसी । भावभक्ति करोनिया ॥८८॥

ऐसे पुत्र त्रिविक्रम यति । श्रीगुरु तया निरोपिती । त्याचे अंगाची विभूति । धुता गेले ज्ञान त्याचे ॥८९॥

ऐसे विभूतीचे महिमान । माहात्म्य असे पावन । सांच होय ब्रह्म पूर्ण । भस्ममहिमा अपार ॥१९०॥

गुरुवचन ऐकोनि । विनवीतसे त्रिविक्रम मुनि । देव गुरुशिरोमणि । भस्ममहिमा निरोपावा ॥९१॥

सिद्ध म्हणे शिष्यासी । भस्ममहिमा परियेसी । गुरु सांगता विस्तारेसी । एकचित्ते अवधारा ॥९२॥

म्हणोनि सरस्वतिगंगाधर । गुरुचरित्रविस्तार । ऐकता होय मनोहर । सकळाभीष्टे साधती ॥९३॥

पुढील कथा पावन । सांगे सिद्ध विस्तारोन । महाराष्ट्रभाषेकरून । सांगे सरस्वती गुरुदास ॥९४॥

इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे कर्मविपाककथनं नाम अष्टाविंशोऽध्यायः ॥२८॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओवीसंख्या ॥१९५॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु

## अध्याय एकोणतिसावा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः ।

नामधारक विनवी सिद्धासी । मागे कथा निरोपिलीसी । भस्ममाहात्म्य श्रीगुरूसी । पुसिले त्रिविक्रमभारतीने ॥१॥

पुढे कथा कवणेपरी । झाली असे गुरुचरित्री । निरोप द्यावा सविस्तारी । सिद्धमुनि कृपासिंधु ॥२॥

ऐसे विनवी शिष्य राणा । ऐकोनि सिद्ध प्रसन्नवदना । सांगतसे विस्तारून । भस्ममाहात्म्य परियेसा ॥३॥

श्रीगुरु म्हणती त्रिविक्रमासी । भस्ममाहात्म्य मज पुससी । एकचित करूनि मानसी । सावधान ऐक पा ॥४॥

पूर्वापरी कृतयुगी । वामदेव म्हणिजे योगी । प्रसिद्ध गुरु तो जगी । वर्तत होता भूमीवरी ॥५॥

शुद्ध बुद्ध ब्रह्मज्ञानी । गृह-सारादि वर्जूनि । कामक्रोधादि त्यजूनि । हिंडत होता महीवरी ॥६॥

संतुष्ट निःस्पृह असे मौनी । भस्म सर्वांगी लावोनि । जटाधारी असे मुनि । वल्कल-वस्त्र व्याघ्राजिन ॥७॥

ऐसा मुनि भूमंडळात । नाना क्षेत्री असे हिंडत । पातला क्रौंचारण्यात । जेथे नसे संचार मनुश्यमात्राचा ॥८॥

तया स्थानी असे एक । ब्रह्मराक्षस भयानक । मनुष्यादि जीव अनेक । भक्षीतसे परियेसा ॥९॥

ऐशा अघोर वनात । वामदेव गेला हिंडत । ब्रह्मराक्षस अवलोकित । आला धावोनि भक्षावया ॥१०॥

ब्रह्मराक्षस क्षुधाक्रांत । आला असे भक्षू म्हणत । करकरा दात खात । मुख पसरूनि जवळी आला ॥११॥

राक्षस येता देखोनि । वामदेव निःशंक धीर मनी । उभा असे महाज्ञानी । पातला राक्षस तयाजवळी ॥१२॥

राक्षस मनी संतोषत । ग्रास बरवा लाधला म्हणत । भक्षावया कांक्षा बहुत । येवोनि धरिला आलिंगोनि ॥१३॥

आलिंगिता मुनीश्वरासी । भस्म लागले राक्षसासी । जाहले ज्ञान तयासी । जातिस्मरण जन्मांतरीचे ॥१४॥

पातक गेले जळोनि । राक्षस झाला महाज्ञानी । जैसा लागता चिंतामणि । लोह सुवर्ण केवी होय ॥१५॥

जैसा मानससरोवरास । वायस जाता होय हंस । अमृत पाजिता मनुष्यास । देवत्व होय परियेसा ॥१६॥

जैसे का जंबूनदीत । घालिता मृत्तिका कांचन त्वरित । तैसा जाहला पापी पुनीत । मुनीश्वराचे अंगस्पर्श ॥१७॥

समस्त मिळती कामना । दुर्लभ सत्पुरुषाचे दर्शन । स्पर्श होता श्रीगुरुचरण । पापावेगळा होय नर ॥१८॥

ब्रह्मराक्षस भयानक । काय सांगो त्याची भूक । गजतुरग मनुष्यादिक । नित्य आहार करी सकळ ॥१९॥

इतुए भक्षिता तयासी । न वचे भूक परियेसी । तृषाक्रांत समुद्रासी । प्राशन करिता न वचे तृषा ॥२०॥

ऐसा पापिष्ट राक्षस । होता मुनीचा अंगस्पर्श । गेली क्षुधा-तृषा-आक्रोश । झाला ज्ञानी परियेसा ॥२१॥

राक्षस ज्ञानी होऊनि । लागला मुनीश्वराचे चरणी । त्राहि त्राहि गुरुशिरोमणि । तू साक्षात ईश्वर ॥२२॥

तारी तारी मुनिवरा । बुडालो अघोर सागरा । उद्धरावे दातारा । कृपासिंधु जगदीशा ॥२३॥

तुझ्या दर्शनमात्रेसी । जळत्या माझ्या पापराशी । तू कृपाळू भक्तांसी । तारी तारी जगद्गुरु ॥२४॥

येणेपरी मुनिवरास । विनवीतसे राक्षस । वामदेव कृपासुरस । पुसतसे तये वेळी ॥२५॥

वामदेव म्हणे तयासी । तुवा कवणाचा कवण वंशी । ऐसा अघोर ठायी वससी । मनुष्य मात्र नसे ते ठायी ॥२६॥

ऐकोनि मुनीचे वचन । ब्रह्मराक्षस करी नमन । विनवीतसे कर जोडोन । ऐक त्रिविक्रम मुनिराया ॥२७॥

म्हणे राक्षस तये वेळी । आपणासी ज्ञान जहाले सकळी । जातिस्मरण अनंतकाळी । पूर्वापरीचे स्वामिया ॥२८॥

तयामध्ये माझे दोष । उत्कृष्ट जन्म पंचवीस । दिसतसे प्रकाश । ऐक स्वामी वामदेवा ॥२९॥

पूर्वजन्मे पंचविसी । होया राजा यवन-देशी । 'दुर्जय' नाम आपणासी । दुराचारी वर्तलो जाण ॥३०॥

म्या मारिले बहुत लोक । प्रजेसी दिधले दुःख । स्त्रिया वरिल्या अनेक । राज्यमदे करूनिया ॥३१॥

वरिल्या स्त्रियांव्यतिरिक्त । बलात्कारे धरिल्या अमित । एक दिवस देवोनि रति । पुनरपि न भोगी तयासी ॥३२॥

एके दिवशी एकीसी । रति देऊनि त्यजी तिसी । ठेविले अंतर्गृहासी । पुनरपि तीते न देखे नयनी ॥३३॥

ऐसे अनेक स्त्रियांसी । ठेविले म्या अंतर्गृहासी । माते शापिती अहर्निशी । दर्शन नेदी म्हणोनिया ॥३४॥

समस्त राजे जिंकोनिया । आणि स्त्रिया धरोनिया । एकेक दिवस भोगूनिया । त्याते ठेविले अंतर्गृहासी ॥३५॥

जेथे स्त्रिया सुरूपे असती । बळे आणोन देई मी रति । ज्या न येती संतोषवृत्ती । तया द्रव्य देऊनि आणवी ॥३६॥

विप्र होते माझे देशी । ते जाऊनि राहिले आणि देशी । जाऊनि आणी त्यांचे स्त्रियांसी । भोगी आपण उन्मत्तपणे ॥३७॥

पतिव्रता सुवासिनी । विधवा मुख्य करोनि । त्याते भोगी उन्मत्तपणी । रजस्वला स्त्रियांसी देखा ॥३८॥

विवाह न होता कन्यांसी । बलात्कारे भोगी त्यांसी । येणेपरी समस्त देशी । उपद्रविले मदांधपणे ॥३९॥

ब्राह्मणस्त्रिया तीन शते । शतचारी क्षत्रिया ते । वैश्यिणी वरिल्या षट्शत । शूद्रस्त्रिया सहस्त्र जाण ॥४०॥

एक शत चांडाळिणी । सहस्त्र वरिल्या पुलदिनी । पाच शत स्त्रिया डोंबिणी । रजकिणी वरिल्या शत चारी ॥४१॥

असंख्यात वारवनिता । भोगिल्या म्या उन्मत्तता । तथापि माझे मनी तृप्तता । नाही झाली स्वामिया ॥४२॥

इतुक्या स्त्रिया भोगून । संतुष्ट नव्हे माझे मन । विषयासक्त मद्यपान । करी नित्य उन्मत्ते ॥४३॥

वर्तता येणेपरी देखा । व्याधिष्ठ झालो यक्ष्मादिका । परराष्ट्रराजे चालोनि ऐका । राज्य हिरतले स्वामिया ॥४४॥

ऐसेपरी आपणासी । मरण जाहले परियेसी । नेले दूती यमपुरासी । मज नरकामध्ये घातले ॥४५॥

देवांसी सहस्त्र वर्षे देखा । दहा वेळ फिरविले ऐका । पितृसहित आपण देखा । नरक भोगिले येणेपरी ॥४६॥

पुढे जन्मलो प्रेतवंशी । विद्रूप देही परियेसी । सहस्त्र शिश्ने अंगासी । लागली असती परियेसी ॥४७॥

येणेपरी दिव्य शत वर्षे । कष्टलो बहु क्षुधार्थे । पुनरपि पावलो यमपंथ । अनंत कष्ट भोगिले ॥४८॥

दुसरा जन्म आपणासी । व्याघ्रजन्म जीवहिंसी । अजगर जन्म तृतीयेसी । चवथा जाहलो लांडगा ॥४९॥

पाचवा जन्म आपणासी । ग्रामसूकर परियेसी । सहावा जन्म जाहलो कैसी । सरडा होऊनि जन्मलो ॥५०॥

सातवा जन्म झालो श्वान । आठवा जंबुक मतिहीन । नवम जन्म रोही-हरण । दहावा झालो ससा देखा ॥५१॥

मर्कट जन्म एकादश । घारी झालो मी द्वादश । जन्म तेरावा मुंगूस । वायस जाहलो चतुर्दश ॥५२॥

जांबुवंत झालो पंचादश । रानकुक्कुट मी षोडश । जन्म जाहलो परियेस । पुढे येणेपरी अवधारी ॥५३॥

सप्तदश जन्मी आपण । गर्दभ झालो अक्षहीन । मार्जारयोनी । संभवून । आलो स्वामी अष्टादशेसी ॥५४॥

एकुणिसावे जन्मासी । मंडूक झालो परियेसी । कासवजन्म विशतीसी । एकविसावा मस्त्य झालो ॥५५॥

बाविसावा जन्म थोर । झालो तस्कर उंदीर । दिवांध झालो मी बधिर । उलूक जन्म तेविसावा ॥५६॥

जन्म चतुर्विंशतीसी । झालो कुंजर तामसी । पंचविंशति जन्मासी । ब्रह्मराक्षस आपण देखा ॥५७॥

क्षुधाक्रांत अहर्निशी । कष्टतसे परियेसी । निराहारी अरण्यावासी । वर्ततसे स्वामिया ॥५८॥

तुम्हा देखता अंतःकरणी । वासना झालो भक्षीन म्हणोनि । यालागी आलो धावोनि । पापरूपी आपण देखा ॥५९॥

तुझा अंगस्पर्श होता । जातिस्मरण झाले आता । सहस्त्र जन्मीचे दुष्कृत । दिसतसे स्वामिया ॥६०॥

माते आता जन्म पुरे । तुझ्या अनुग्रहे मी तरे । घोरांधार संसार । आता यातना कडे करी ॥६१॥

तू तारक विश्वासी । म्हणोनि माते भेटलासी । तुझी दर्शनमहिमा कैसी । स्पर्श होता ज्ञान झाले ॥६२॥

भूमीवरी मनुष्य असती । तैसा रूप दिससी यति । परि तुझी महिमा ख्याति । निरुपम असे दातारा ॥६३॥

महापापी दुराचारी । आपण असे वनांतरी । तुझे अंगस्पर्शमात्री । ज्ञान जाहले अखिल जन्मांचे ॥६४॥

कैसा महिमा तुझ्या अंगी । ईश्वर होशील की जगी । आम्हा उद्धारावयालागी । आलासी स्वामी वामदेवा ॥६५॥

ऐसे म्हणता, राक्षसासी । वामदेव सांगे संतोषी । भस्ममहिमा आहे ऐशी । माझे अंगीची परियेसा ॥६६॥

सर्वांग माझे भस्मांकित । तुझे अंगा लागले क्वचित । त्याणे झाले तुज चेत । ज्ञानप्रकाश शत जन्मांतरीचे ॥६७॥

भस्ममहिमा अपरांपर । परि ब्रह्मादिका अगोचर । याचिकारणे कर्पूरगौर । भूषण करी सर्वांगी ॥६८॥

ईश्वरे वंदिल्या वस्तूसी । वर्णिता अशक्य आम्हांसी । तोचि शंकर व्योमकेशी । जाणे भस्ममहिमान ॥६९॥

जरी तू पुससी आम्हांसी । सांगेन दृष्टांत परियेसी । आम्ही देखिले दृष्टीसी । अपार महिमा भस्माचा ॥७०॥

विप्र एक द्रविडदेशी । आचारहीन परियेसी । सदा रत शूद्रिणीसी । कर्मभ्रष्ट वर्तत होता ॥७१॥

समस्त मिळोनि विप्रयाति । तया द्विजा बहिष्कारिती । मातापिता दाईज गोती । त्यजिती त्यासी बंधुवर्ग ॥७२॥

येणेपरी तो ब्राह्मण । प्रख्यात झाला आचारहीन । शूद्रिणीते वरून । होता काळ रमूनिया ॥७३॥

ऐसा पापी दुराचारी । तस्करविद्येने उदर भरी । आणिक स्त्रियांशी व्यभिचारी । उन्मत्तपणे परियेसा ॥७४॥

वर्तता ऐसे एके दिवसी । गेला होता व्यभिचारासी । तस्करविद्या करिता निशी । वधिले त्यासी एके शूद्र ॥७५॥

वधूनिया विप्रासी । ओढोनि नेले तेचि निशी । टाकिले बहिर्ग्रामेसी । अघोर स्थळी परियेसा ॥७६॥

श्वान एक तये नगरी । बैसला होता भस्मावरी । क्षुधाक्रांत अवसरी । गेला हिंडत प्रेतघ्राणी ॥७७॥

देखोनि तया प्रेतासी । गेला श्वान भक्षावयासी । प्रेतावरी बैसून हर्षी । क्षुधानिवारण करीत होता ॥७८॥

भस्म होते श्वानाचे पोटी । लागले प्रेताचे ललाटी । वक्षःस्थळी बाहुवटी । लागले भस्म परियेसा ॥७९॥

प्राण त्यजिता द्विजवर । नेत होते यमकिंकर । नानापरी करीत मार । यमपुरा नेताति ॥८०॥

कैलासपुरीचे शिवदूत । देखोनि आले ते प्रेत । भस्म सर्वांगी उद्धूलित । म्हणती याते कवणे नेले ॥८१॥

याते योग्य शिवपुर । केवी नेले ते यमकिंकर । म्हणोनि धावती वेगवक्त्रे । यमकिंकरा मारावया ॥८२॥

शिवदूत येता देखोनि । यमदूत जाती पळोनि । तया द्विजाते सोडूनि । गेले आपण यमपुरा ॥८३॥

जाऊनि सांगती यमासी । गेलो होतो भूमीसी । आणीत होतो पापियासी । अघोररूपेकरूनिया ॥८४॥

ते देखोनि शिवदूत । धावत आले मारू म्हणत । हिरोनि घेतले प्रेत । वधीत होते आम्हांसी ॥८५॥

आता आम्हा काय गति । कधी न वचो त्या क्षिती । आम्हांसी शिवदूत मारिती । म्हणोनि विनविती यमासी ॥८६॥

ऐकोनि दूतांचे वचन । यम निघाला कोपून । गेला त्वरित ठाकून । शिवदूताजवळी देखा ॥८७॥

यम म्हणे शिवदूतांसी । का मारिले माझ्या किंकरासी । हिरोनि घेतले पापियासी । केवी नेता शिवमंदिरा ॥८८॥

याचे पाप असे प्रबळ । जितकी गंगेत असे वाळू । तयाहूनि अधिक केवळ । अघोररूप असे देखा ॥८९॥

नव्हे योग हा शिवपुरासी । याते बैसवोनि विमानेसी । केवी नेता मूढपणेसी । म्हणोनि कोपे यम देखा ॥९०॥

ऐकोनि यमाचे वचन । शिवदूत सांगती विस्तारून । प्रेतकपाळी लांछन । भस्म होते परियेसा ॥९१॥

वक्षःस्थळी ललाटेसी । बाहुमूळी करकंकणेसी । भस्म लाविले प्रेतासी । केवी आतळती तुझे दूत ॥९२॥

आम्हा आज्ञा ईश्वराची । भस्मांकित तनु मानवाची । जीव आणावा त्या नराचा । कैलासपदी शाश्वत ॥९३॥

भस्म कपाळी असत । केवी आतळती तुझे दूत । तात्काळी होतो वधित । सोडिले आम्हा धर्मासी ॥९४॥

पुढे तरी आपुल्या दूता । बुद्धि सांगा तुम्ही आता । जे नर असती भस्मांकिता । त्याते तुम्ही न आणावे ॥९५॥
भस्मांकित नरासी । दोष न लागती परियेसी । तो योग्य होय स्वर्गासी । म्हणोनि सांगती शिवदूत ॥९६॥
शिवदूत वचन ऐकोन । यमधर्म गेला परतोन । आपुले दूता पाचारून । सांगतसे परियेसा ॥९७॥
यम सांगे आपुले दूता । भूमीवरी जाऊनि आता । जे कोण असतील भस्मांकित । त्याते तुम्ही न आणावे ॥९८॥
अनेकपरी दोष जरी । केले असतील धुरंधरी । त्याते न आणावे आमुचे पुरी । त्रिपुंड टिळक नरासी ॥९९॥
रुद्राक्षमाळा ज्याचे गळा । असेल त्रिपुंड्र टिळा । त्याते तुम्ही नातळा । आज्ञा असे ईश्वराची ॥१००॥
वामदेव म्हणे राक्षसासी । या विभूतीचा महिमा असे ऐशी । आम्ही लावितो भक्तीसी । देवादिका दुर्लभ ॥१॥
पाहे पा ईश्वर प्रीतीसी । सदा लावितो भस्मासी । ईश्वरे वंदिल्या वस्तूसी । कवण वर्णू शके सांग मज ॥२॥
ऐकोनि वामदेवाचे वचन । ब्रह्मराक्षस करी नमन । उद्धारावे जगज्जीवना । ईश्वर तूचि वामदेवा ॥३॥
तुझे चरण मज भेटले । सहस्त्र जन्मीचे ज्ञान जाहाले । काही पुण्य होते केले । त्याणे गुणे भेटलासी ॥४॥
आपण जधी राज्य करिता । केले पुण्य स्मरले आता । तळे बांधविले रानात । दिल्ही वृत्ति ब्राह्मणांसी ॥५॥
इतुके पुण्य आपणासी । घडले होते परियेसी । वरकड केले सर्व दोषी । राज्य करिता स्वामिया ॥६॥
जधी नेले यमपुरासी । यमे पुसिले चित्रगुप्तासी । माझे पुण्य त्या यमासी । चित्रगुप्ते सांगितले ॥७॥
तधी माते यमधर्मे आपण । सांगितले होते हे पुण्य । पंचविंशति जन्मी जाण । फळासी येईल म्हणोनि ॥८॥
तया पुण्यापासोन । भेटी जाहली तुझे चरण । करणे स्वामी उद्धारण । जगद्गुरु वामदेवा ॥९॥
या भस्माचे महिमान । कैसे लावावे विधान । कवण मंत्र-उद्धारण । विस्तारूनि सांग मज ॥११०॥
वामदेव म्हणे राक्षसासी । विभूतीचे धारण मज पुससी । सांगेन आता विस्तारेसी । एकचित्ते ऐक पा ॥११॥
पूर्वी मंदरगिरिपर्वती । क्रीडेसी गेले गिरिजापति । कोटि रुद्रादिगणसहिती । बैसले होते वोळगेसी ॥१२॥
तेहतीस कोटी देवांसहित । देवेंद्र आला तेथे त्वरित । अग्नि वरुण यमसहित । कुबेर वायु आला तेथे ॥१३॥
गंधर्व यक्ष चित्रसेन । खेचर पन्नग विद्याधरण । किंपुरुष सिद्ध साध्य जाण । आले गुह्यक सभेसी ॥१४॥
देवाचार्य बृहस्पति । वसिष्ठ नारद तेथे येती । अर्यमादि पितृसहिती । तया ईश्वर-वोळगेसी ॥१५॥
दक्षादि ब्रह्मा येर सकळ । आले समस्त ऋषिकुळ । उर्वश्यादि अप्सरामेळ । आले त्या ईश्वरसभेसी ॥१६॥
चंडिकासहित शक्तिगण देखा । आदित्यादि द्वादशार्का । अष्ट वसू मिळोन ऐका । आले ईश्वराचे सभेसी ॥१७॥
अश्विनी देवता परियेसी । विश्वेदेव मिळून निर्दोषी । आले ईश्वरसभेसी । ऐके ब्रह्मराक्षसा ॥१८॥
भूतपति महाकाळ । नंदिकेश्वर महानीळ । काठीकर दोघे प्रबळ । उभे पार्श्वी असती देखा ॥१९॥
वीरभद्र शंखकर्ण । मणिभद्र षट्कर्ण । वृकोदर देवमान्य । कुंभोदर आले तेथे ॥१२०॥
कुंडोदर मंडोदर । विकटकर्ण कर्णधार । घारकेतु महावीर । भुतनाथ तेथे आला ॥२१॥
भृंगी रिटी भूतनाथ । नानारूपी गण समस्त । नानावर्ण मुखे ख्यात । नानावर्ण-शरीर-अवयवी ॥२२॥
रुद्रगणाची रूपे कैसी । सांगेन ऐका विस्तारेसी । कित्ये कृष्णवर्णैसी । श्वेत-पीत-धूम्रवर्ण ॥२३॥
हिरवे ताम्र सुवर्ण । लोहित चित्रविचित्र वर्ण । म्डूकासारिखे असे वदन । रुद्रगण आले तेथ ॥२४॥
नानाआयुधे-शस्त्रेसी । नाना वाहन भूषणेसी । व्याघ्रमुख कित्येकांसी । किती सूकर-गजमुखी ॥२५॥
कित्येक नक्रमुखी । कित्येक श्वान-मृगमुखी । उष्ट्रवदन कित्येकी । किती शरभ-शार्दूलवदने ॥२६॥

कित्येक भैरुंडमुख । सिंहमुख कित्येक । दोनमुख गण देख । चतुर्मुख गण कितीएक ॥२७॥

चतुर्भुज गण अगणिक । कितीएका नाही मुख । ऐसे गण तेथे येती देख । ऐक राक्षसा एकचित्ते ॥२८॥

एकहस्त द्विहस्तेसी । पाच सहा हस्तकेसी । पाद नाही कितीएकांसी । बहुपादी किती जाणा ॥२९॥

कर्ण नाही कित्येकांसी । एककर्ण अभिनव कैसी । बहुकर्ण परियेसी । ऐसे गुण येती तेथे ॥१३०॥

कित्येकांसी नेत्र एक । कित्येका चारी नेत्र विचित्र । किती स्थूळ कुब्जक । ऐसे गण ईश्वराचे ॥३१॥

ऐशापरीच्या गणांसहित । बैसला शिव मूर्तिमंत । सिंहासन रत्नखचित । सप्त प्रभावळीचे ॥३२॥

आरक्त एक प्रभावळी । तयावरी रत्ने जडली । अनुपम्य दिसे निर्मळी । सिंहासन परियेसा ॥३३॥

दुसरी एक प्रभावळी । हेमवर्ण पिवळी । मिरवीतसे रत्ने बहळी । सिंहासन ईश्वराचे ॥३४॥

तिसरिये प्रभावळीसी । नीलवर्णे रत्ने कैसी । जडली असती कुसरीसी । सिंहासन ईश्वराचे ॥३५॥

शुभ्रचतुर्थ प्रभावळी । रत्नखचित असे कमळी । आरक्तवर्ण असे जडली । सिंहासन शंकराचे ॥३६॥

वैडूर्यरत्नखचित । मोती जडली असती बहुत । पाचवी प्रभावळी ख्यात । सिंहासन ईश्वराचे ॥३७॥

सहावी भूमि नीलवर्ण । भीतरी रेखा सुवर्णवर्ण । रत्ने जडली असती गहन । अपूर्व देखा त्रिभुवनांत ॥३८॥

सातवी ऐसी प्रभावळी । अनेक रत६ने असे जडली । जे का विश्वकर्म्याने रचिली । अपूर्व देखा त्रिभुवनांत ॥३९॥

ऐशा सिंहासनावरी । बैसलासे त्रिपुरारि । कोटिसूर्य तेजासरी । भासतसे परियेसा ॥१४०॥

महाप्रळयसमयासी । सप्तार्णव-मिळणी जैसी । तैसिया श्वासोच्छ्वासेसी । बैसलासे ईश्वर ॥४१॥

भाळनेत्र ज्वाळमाळा । संवर्ताग्नि जटामंडळा । कपाळी चंद्र षोडशकळा । शोभतसे सदाशिव ॥४२॥

तक्षक देखा वामकर्णी । वासुकी असे कानी दक्षिणी । तया दोघांचे नयन । नीलरत्नापरी शोभती ॥४३॥

नीलकंठ दिसे आपण नागहार आभरण । सर्पाचेचि करी कंकण । मुद्रिकाही देखा सर्पाचिया ॥४४॥

मेखला तया सर्पाचे । चर्मपरिधान व्याघ्राचे । शोभा घंटी दर्पणाचे । ऐसेपरी दिसतसे ॥४५॥

कर्कोटक-महापद्म । केली नूपुरे पाईजण । जैसा चंद्र-संपूर्ण । तैसा शुभ्र दिसतसे ॥४६॥

म्हणोनि कर्पूरगौर म्हणती । ध्यानी ध्याईजे पशुपति । ऐसा भोळाचक्रवर्ती । बैसलासे सभेत ॥४७॥

रत्नमुकुट असे शिरी । नागेंद्र असे केयूरी । कुंडलांची दीप्ति थोरी । दिसतसे ईश्वर ॥४८॥

कंठी सर्पाचे हार । नीलकंथ मनोहर । सर्वांगी सर्पाचे अलंकार । शोभतसे ईश्वर ॥४९॥

शुभ्र कमळे अर्चिला । की चंदने असे लेपिला । कर्पूरकेळीने पूजिला । ऐसा दिसे ईश्वर ॥१५०॥

दहाभुजा विस्तारेसी । एकेक हाती आयुधेसी । बैसलासे सभेसी । सर्वेश्वर शंकर ॥५१॥

एके हाती त्रिशूळ देखा । दुसरा डमरू सुरेखा । येरे हाती खड्ग तिखा । शोभतसे ईश्वर ॥५२॥

पानपात्र एका हाती । धनुष्य-बाणे कर शोभती । खट्वांग फरश येरे हाती । अंकुश करी मिरवीतसे ॥५३॥

मृग धरिला असे करी देखा । ऐसा तो हा पिनाका । दहाभुजा दिसती निका । बैसलासे सभेत ॥५४॥

पंचवक्त्र सर्वेश्वर । एकेक मुखाचा विस्तार । दिसतसे सालंकार । सांगेन ऐका श्रोतेजन ॥५५॥

कलंकाविणे चंद्र जैसा । किंवा क्षीरफेन ऐसा । भस्मभूषणे रूपे कैसा । दिसे मन्मथाते दाहोनिया ॥५६॥

सूर्य-चंद्र अग्निनेत्र । नागहार कटिसूत्र । दिसे मूर्ति पवित्र । सर्वेश्वर परियेसा ॥५७॥

शुभ्र टिळक कपाळी । बरवा शोभे चंद्रमौळी । हास्यवदन केवळी । अपूर्व देखा श्रीशंकर ॥५८॥

दुसरे मुख उत्तरेसी । शोभतसे विस्तारेसी । ताम्रवर्णाकार कमळेसी । अपूर्व दिसे परियेसा ॥५९॥

जैसे दाडिंबाचे फूल । किंवा प्रातःरविमंडळ । तैसे मिरवे मुखकमळ । ईश्वराचे परियेसा ॥१६०॥

तिसरे मुख पूर्वदिशी । गंगा अर्धचंद्र शिरसी । जटाबंदन केली कैसी । सर्पवेष्टित परियेसा ॥६१॥

चवथे मुख दक्षिणेसी । मिरवे नीलवर्णेसी । विक्राळ दाढा दारुणेसी । दिसतसे तो ईश्वर ॥६२॥

मुखांहूनि ज्वाला निघती । तैसा दिसे तीव्रमूर्ति । रुंडमाळा शोभती । सर्पवेष्टित परियेसा ॥६३॥

पाचवे असे ऐसे वदन । व्यक्ताव्यक्त असे जाण । साकार निराकार सगुण । सगुण निर्गुण ईश्वर ॥६४॥

सलक्षण निर्लक्षण । ऐसे शोभतसे वदन । परब्रह्म वस्तु तो जाण । सर्वेश्वर पंचमुखी ॥६५॥

काळ व्याळ सर्प बहुत । कंठी माळ मिरवे ख्यात । चरण मिरविती आरक्त । कमळापरी ईश्वराचे ॥६६॥

चंद्रासारिखी नखे देखा । मिरवे चरणी पादुका । अळंकार-सर्प ऐका । शोभतसे परमेश्वर ॥६७॥

व्याघ्रांबर पांघरुण । सर्प बांधले असे आपण । गाठी बांधिली असे जाण । नागबंधन करूनिया ॥६८॥

नाभी चंद्रावळी शोभे । हृदयी कटाक्ष रोम उभे । परमार्थमूर्ति लाभे । भक्तजना मनोहर ॥६९॥

ऐसा रुद्र महाभोळा । सिंहासनी आरूढला । पार्वतीसहित शोभला । बैसलासे परमेश्वर ॥१७०॥

पार्वतीचे श्रृंगार । नानापरीचे अलंकार । मिरवीतसे अगोचर । सर्वेश्वरी परियेसा ॥७१॥

कनकचाफे गोरटी । मोतियांचा हार कंठी । रत्नखचित मुकुटी । नागबंदी दिसतसे ॥७२॥

नानापरीच्या पुष्पजाति । मुकुटावरी शोभती । तेथे भ्रमर आलापिती । परिमळालागी परियेसा ॥७३॥

मोतियांची थोर जाळी । मिरवीतसे मुकुटाजवळी । रत्ने असती जडली । शोभायमान दिसतसे ॥७४॥

मुख दिसे पूर्णचंद्र । मिरवतसे हास्य मंद । जगन्माता विश्ववंद्य । दिसतसे परमेश्वरी ॥७५॥

नासिक बरवे सरळ । तेथे म्रिअवे मुक्ताफळ । त्यावरी रत्ने सोज्ज्वळ । जडली असती शोभायमान ॥७६॥

अधर पवळवेली दिसे । दंतपंक्ति रत्न जैस । ऐसी माता मिरवतसे । जगन्माता परियेसा ॥७७॥

कानी तानवडे भोवरिया । रत्नखचित मिरवलिया । अलंकार महामाया । लेइली असे जगन्माता ॥७८॥

पीतवर्ण चोळी देखा । कुच तटतटित शोभे निका । एकावेळी रत्ने अनेका । शोभतसे कंठी हार ॥७९॥

कालव्याल सर्प थोर । स्तनपान करिती मनोहर । कैसे भाग्य दैव थोर । त्या सर्पाचे परियेसा ॥१८०॥

आरक्त वस्त्र नेसली । जैसे दाडिंब पुष्पवेली । किंवा कुंकुमे डवरिली । गिरिजा माता परियेसा ॥८१॥

बाहुदंड सुरेखा । करी कंकण मिरवे देखा । रत्नखचित मेखळा देखा । लेईली असे अपूर्व जे ॥८२॥

चरण शोभती महा बरवे । असती नेपुरे स्वभावे । ऐसे पार्वती-ध्यान ध्यावे । म्हणती गण समस्त ॥८३॥

अष्टमीच्या चंद्रासारिखा । मिरवे टिळक काअळी कैसा त्रिपुंड्र टिळा शुभ्र जैसा । मोतियांचा परियेसा ॥८४॥

नानापरीचे अलंकार । अनेकपरीचे श्रृंगार । कवण वर्णू शके पार । जगन्माता अंबिकेचा ॥८५॥

ऐसा शंभु उमेसहित । बैसलासे सभेत । तेहतीस कोटि परिवारसहित । इंद्र उभा वोळगेसी ॥८६॥

उभे समस्त सुरवर । देवऋषि सनत्कुमार । आले तेथे वेगवक्त्रे । तया ईश्वरसभेसी ॥८७॥

सनत्कुमार तये वेळी । लागतसे चरणकमळी । साष्टांग नमन बहाळी । विनवीतसे शिवासी ॥८८॥

जय जया उमाकांता । जय जया शंभु विश्वकर्ता । त्रिभुवनी तूचि दाता । चतुर्विध पुरुषार्थ ॥८९॥

समस्त धर्म आपणासी । स्वामी निरोपिले कृपेसी । भवार्णवी तरावयासी । पापक्षयाकारणे ॥१९०॥

आणिक एक आम्हा देणे । मुक्ति होय अल्पपुण्ये । चारी पुरुषार्थ येणे गुणे । अनायासे साधिजे ॥९१॥

एऱ्हवी समस्त पुण्यासी । करावे कष्त असमसहासी । हितार्थ सर्व मानवांसी । निरोपावे स्वामिया ॥९२॥

ऐसे विनवी सनत्कुमा । मनी संतोषोनिया ईश्वर । सांगता झाला कर्पूरगौर । सनत्कुमार मुनीसी ॥९३॥

ईश्वर म्हणे तयेवेळी । ऐका देव ऋषि सकळी । घडे धर्म तात्काळी । ऐसे पुण्य सांगेन ॥९४॥

वेदशास्त्रसंमतेसी । असे धर्म परियेसी । अनंत पुण्य त्रिपुंड्रेसी । भस्मांकित परियेसा ॥९५॥

ऐकोनि विनवी सनत्कुमार । कवणे विधी लाविजे नर । कवण 'स्थान', 'द्रव्य' परिकर । 'शक्ति' 'देवता' कवण असे ॥९६॥

कवण 'कर्तृ' किं 'प्रमाण' । कोण 'मंत्रे' लाविजे आपण । स्वामी सांगा विस्तारून । म्हणोनि चरणी लागला ॥९७॥

ऐसी विनंती ऐकोनि । सांगे शंकर विस्तारोनि । गोमय द्रव्य, देवता-अग्नि । भस्म करणे परियेसा ॥९८॥

पुरातनीचे यज्ञस्थानी । जे का असे मेदिनी । पुण्य बहुत लाविताक्षणी । भस्मांकिता परियेसा ॥९९॥

सद्योजाता'दि मंत्रेसी । घ्यावे भस्म तळहस्तासी । अभिमंत्रावे भस्मासी । 'अग्निरित्या'दि मंत्रेकरोनि ॥२००॥

'मानस्तोके' ति मंत्रेसी । संमदावे अंगुष्ठेसी । त्र्यंबकादि मंत्रेसी । शिरसी लाविजे परियेसा ॥१॥

'त्र्यायुषे' ति मंत्रेसी । लाविजे ललाटभुजांसी । त्याणेची मंत्रे परियेसी । स्थानी स्थानी लाविजे ॥२॥

तीनी रेखा एके स्थानी । लावाव्या त्याच मंत्रांनी । अधिक न लाविजे भ्रुवांहुनी । भ्रूसमान लाविजे ॥३॥

मध्यमानामिकांगुळेसी । लाविजे पहिले ललाटेसी । प्रतिलोम-अंगुष्ठेसी । मध्यरेषा काढिजे ॥४॥

त्रिपुंड्र येणेपरी । लाविजे तुम्ही परिकरी । एक एक रेखेच्या विस्तारी । सांगेन ऐका एकचित्ते ॥५॥

नव देवता विख्यातेसी । असती एकेक रेखेसी । 'अ' कार गार्हपत्यासी । भूरात्मा रजोगुण ॥६॥

ऋग्वेद आणि क्रियाशक्ति । प्रातःसवन असे ख्याति । महादेव-देव म्हणती । प्रथम रेखा येणेपरी ॥७॥

दुसरे रेखेची देवता । सांगेन ऐका विस्तारता । 'उ' कार दक्षिणाग्नि देवता । नभ सत्त्व जाणावे ॥८॥

यजुर्वेद म्हणिजे त्यासी । मध्यंदिन-सवन परियेसी । इच्छाशक्ति अंतरात्मेसी । महेश्वर-देव जाण ॥९॥

तिसरी रेखा मधिलेसी । 'म' कार आहवनीय परियेसी । परमात्मा दिव हर्षी । ज्ञानशक्ति तमोगुण ॥२१०॥

तृतीयसवन परियेसी । सामवेद असे त्यासी । शिवदैवत निर्धारिसी । तीनि रेखा येणेविधि ॥११॥

ऐसे नित्य नमस्कारूनि । त्रिपुंड्र लाविजे भस्मेनि । महेश्वराचे व्रत म्हणोनि । वेदशास्त्रे बोलताति ॥१२॥

मुक्तिकामे जे लाविती । त्यासी पुनरावृत्ति । जे जे मनी संकल्पिती । लाधे चारी पुरुषार्थ ॥१३॥

ब्रह्मचारी-गृहस्थासी । वानप्रस्थ-यतीसी । समस्ती लाविजे हर्षी । भस्मांकित त्रिपुंड्र ॥१४॥

महापापी असे आपण । उपपातकी जरी जाण । भस्म लाविता तत्क्षण । पुण्यात्मा तोचि होय ॥१५॥

क्षत्रिय-वैश्य-शूद्र-स्त्रीवध्यासी । गोहत्यादि-पातकासी । वीरहत्या-आत्महत्येसी । शुद्धात्मा करी भस्मांकित ॥१६॥

विधिपूर्वक मंत्रेसी । जे लाविती भक्तीसी । त्यांची महिमा अपारेसी । वंद्य होय देवलोकी ॥१७॥

जरी नेणे मंत्रासी । त्याणे लाविजे भावशुद्धीसी । त्याची महिमा अपारेसी । एकचित्ते परियेसा ॥१८॥

परद्रव्यहारक देखा । परस्त्रीगमन ऐका असेल पापी परनिंदका । तोही पुनीत होईल जाणा ॥१९॥

परक्षेत्रहरण देखा । परपीडक असेल जो का । सस्य आराम तोडी का । ऐसा पातकी पुनीत होई ॥२२०॥

गृहदाहादि केला दोष । असत्यवादी परियेस । पैशून्यपण पापास । वेदविक्रय पाप जाणा ॥२१॥

कूटसाक्षी व्रतत्यागी । कौटिल्य करी पोटालागी । ऐसी पाप सदा भोगी । तोही पुनीत होय जाणा ॥२२॥

गाई-भूमि-हिरण्यदान । म्हैषी-तीळ-कंबळदान । घेतले असेल वस्त्रान्न । तोही पुनीत होय जाणा ॥२३॥

धान्यदान जलादिदान । घेतले असेल नीचापासून । त्याणे करणे भस्मधारण । तोही पुनीत होय जाणा ॥२४॥

दासी-वेश्या-भुजंगीसी । वृषलस्त्री-रजस्वलेसी । केले असती जे का दोषी । तोही पुनीत जाणा ॥२५॥

कन्या विधवा अन्य स्त्रियांशी । घडला असेल संग जयासी । अनुतप्त होऊनि परियेसी । भस्म लाविता पुनीत होईल ॥२६॥

रस-मांस-लवणादिका । केला असेल विक्रय जो का । पुनीत होय भस्मसंपर्का । त्रिपुंड्र लाविता परियेसा ॥२७॥

जाणोनि अथवा अज्ञानता । पाप घडले असंख्याता । भस्म लाविता पुनीता । पुण्यात्मा होय जाणा ॥२८॥

नाशी समस्त पापांसी । भस्ममहिमा आहे ऐशी । शिवनिंदक पापियासी । न करी पुनीत परियेसा ॥२९॥

शिवद्रव्य अपहारकासी । निंदा करी शिवभक्तांसी । न होय निष्कृति त्यासी । पापावेगळा नव्हे जाणा ॥२३०॥

रुद्राक्षमाळा जयाचे गळा । लाविला असेल त्रिपुंड्र टिळा । अन्य पापी होय केवळा । तोही पूज्य तीही लोकी ॥३१॥

जितुकी तीर्थे भूमीवरी । असतील क्षेत्रे नानापरी । स्नान केले पुण्य-सरी । भस्म लाविता परियेसा ॥३२॥

मंत्र असती कोटी सात । पंचाक्षरादि विख्यात । अनंत आगम असे मंत्र । जपिले फळ भस्मांकिता ॥३३॥

पूर्वजन्म-सहस्त्रांती । सहस्त्र जन्म पुढे होती । भस्मधारणे पापे जाती । बेचाळीस वंशादिक ॥३४॥

इहलोकी अखिल सौख्य । होती पुरुष शतायुष्य । व्याधि न होती शरीरास । भस्म लाविता नरासी ॥३५॥

अष्टैश्वर्यै होती त्यासी । दिव्य शरीर परियेसी । अंती ज्ञान होईल निश्चयेसी । देहांती तया नरा ॥३६॥

बैसवोनि दिव्य विमानी । देवस्त्रिया शत येऊनि । सेवा करिती येणे गुणी । घेऊनि जाती स्वर्गभुवना ॥३७॥

विद्याधर सिद्धजन । गंधर्वादि देवगण । इंद्रादि लोकपाळ जाण । वंदिती समस्त तयासी ॥३८॥

अनंतकाळ तया स्थानी । सुखे असती संतोषोनि । मग जाती तेथोनि । ब्रह्मलोकी शाश्वत ॥३९॥

एकशत कल्पवरी । रहाती ब्रह्मलोकी स्थिरी । तेथोनि जाती वैकुंठपुरी । विष्णुलोकी परियेसा ॥२४०॥

ब्रह्मकल्प तीनवरी । रहाती नर वैकुंठपुरी । मग पावती कैलासपुरी । अक्षय काळ तेथे रहाती ॥४१॥

शिवसायुज्य होय त्यासी । संदेह सोडोनिया मानसी । लावा त्रिपुंड्र भक्तीसी । सनत्कुमारादि सकळिक हो ॥४२॥

वेदशास्त्रदि उपनिषदार्थ । सार पाहिले मी अवलोकित । चतुर्विध पुरुषार्थ । भस्मधारणे होय जाणा ॥४३॥

ऐसे त्रिपुंड्रमहिमान । सांगितले ईश्वरे विस्तारून । लावा तुम्ही सकळ जन । सनत्कुमारादि ऋषीश्वर हो ॥४४॥

सांगोनि सनत्कुमारासी । गेला ईश्वर कैलासासी । सनत्कुमार महाहर्षी । गेला ब्रह्मलोकाप्रती ॥४५॥

वामदेव महामुनि । सांगती ऐसे विस्तारोनि । ब्रह्मराक्षसे संतोषोनि । नमन केले चरणकमलासी ॥४६॥

वामदे म्हणे राक्षसासी । भस्ममाहात्म्य आहे ऐसी । माझे अंगस्पर्शेसी । ज्ञान तुज प्रकाशिले ॥४७॥

ऐसे म्हणोनि संतोषी अभिमंत्रोनि भस्मासी । देता झाला राक्षसासी । वामदेव तया वेळी ॥४८॥

ब्रह्मराक्षस तया वेळी । लाविता त्रिपुंड्र कपाळी । दिव्यदेह तात्काळी । तेजोमूर्ति जाहला परियेसा ॥४९॥

दिव्य अवयव झाले त्यासी । जैसा सूर्यसंकाशी । झाला आनंदरूप कैसी । ब्रह्मराक्षस तया वेळी ॥२५०॥

नमन करूनि योगीश्वरासी । केली प्रदक्षिणा भक्तीसी । विमान आले तत्क्षणेसी । सूर्यसंकाश परियेसा ॥५१॥

दिव्य विमानी बैसोनि । गेला स्वर्गासी तत्क्षणी । वामदेव महामुनी । दिधला तयासी परलोक ॥५२॥

वामदेव महादेव । मनुष्यरूप दिसतो स्वभाव । प्रत्यक्ष जाणा तो शांभव । हिंडे भक्त तारावया ॥५३॥

त्रयमूर्तीचा अवतारु । वामदेव तोचि गुरु । करावया जगदोद्धारु । हिंडत होता भूमीवरी ॥५४॥

भस्ममाहात्म्य असे थोरु । विशेष हस्तस्पर्श गुरु । ब्रह्मराक्षसासी दिधला वरु । उद्धार गति परियेसा ॥५५॥

समस्त मंत्र असती । गुरूविणे साध्य नव्हती । वेदशास्त्रे वाखाणिती । 'नास्ति तत्त्वं गुरोः परम' ॥५६॥

सूत म्हणे ऋषेश्वरांसी । भस्ममाहात्म्य आहे ऐसी । गुरुहस्ते असे विशेषी । तस्माद् गुरुचि कारण ॥५७॥

येणेपरी त्रिविक्रमासी । सांगती श्रीगुरु विस्तारेसी । त्रिविक्रमभारती हर्षी । चरणांवरी माथा ठेवित ॥५८॥

नमन करूनि श्रीगुरूसी । निघाला आपुले स्थानासी । झाले ज्ञान समस्तांसी । श्रीगुरूच्या उपदेशे ॥५९॥

येणेपरी सिद्धमुनि । सांगते झाले विस्तारूनि । ऐकतो शिष्य नामकरणी । भक्तिभावेकरूनिया ॥२६०॥

म्हणोनि सरस्वतीगंगाधर । सांगे गुरुचरित्रविस्तार । भक्तिभावे ऐकती नर । लाघे चारी पुरुषार्थ ॥२६१॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्ध-नामधारकसंवादे भस्ममहिमावर्णन नाम एकोनत्रिंशोऽध्यायः ॥२९॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेव दत्त ॥ (ओवीसंख्या २६१)

## अध्याय तिसावा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः ।

नामधारक शिष्यराणा । लागे सिद्धाचिया चरणा । विनवीतसे कर जोडून । भक्तिभावेकरूनिया ॥१॥

जय जया सिद्धमुनि । तूचि तारक भवार्णी । अज्ञानतिमिर नासोनि । ज्योतिःस्वरूप तूचि होसी ॥२॥

अविद्यामायासागरी । बुडालो होतो महापुरी । तुझी कृपा जाहली तरी । तारिले माते स्वामिया ॥३॥

तुवा दाविला निज-पंथ । जेणे जोडे परमार्थ । विश्वपालक गुरुनाथ । तूचि होसी स्वामिया ॥४॥

गुरुचरित्र सुधारस । तुवा पाजिला आम्हांस । तृप्त न होय गा मानस । तृषा आणिक होतसे ॥५॥

तुवा केलिया उपकारासी । उत्तीर्ण नव्हे मी वंशोवंशी । निजस्वरूप आम्हांसी । दाविले तुम्ही सिद्धमुनि ॥६॥

मागे कथा निरोपिलीसी । अभिनव जाहले सृष्टीसी । पतिताकरवी ख्यातीसी । वेद चारी म्हणविले ॥७॥

त्रिविक्रम महामुनेश्वरासी । बोधिले ज्ञान प्रकाशी । पुढे कथा वर्तली कैशी । विस्तारावे दातारा ॥८॥

ऐकोनि शिष्याचे वचन । संतोषला सिद्ध आपण । प्रेमभावे आलिंगोन । आश्वासीतसे तये वेळी ॥९॥

धन्य धन्य शिष्यमौळी । तुज लाधले अभीष्ट सकळी । गुरूची कृपा तात्काळी । जाहली आता परियेसा ॥१०॥

धन्य धन्य तुझी वाणी । वेध लागला श्रीगुरुचरणी । तूचि तरलासी भवार्णी । सकळाभीष्टे साधतील ॥११॥

तुवा पुसिला वृत्तांत । संतोष झाला आजि बहुत । श्रीगुरुमहिमा असे ख्यात । अगम्य असे सांगता ॥१२॥

एकेक महिमा सांगता । विस्तार होईल बहु कथा । संकेतमार्गे तुज आता । निरोपीतसे परियेसी ॥१३॥

पुढे असता वर्तमानी । तया गाणगग्रामभुवनी । महिमा होतसे नित्यनूतनी । प्रख्यातरूप होऊनिया ॥१४॥

त्रयमूर्तीचा अवतार । झाला नृसिंहसरस्वती नर । महिमा त्याची अपरंपारु । सांगता अगम्य परियेसा ॥१५॥

महिमा तया त्रयमूर्तीची । सांगता शक्ति आम्हा कैची काया धरूनि मानवाची । चरित्र केले भूमीवरी ॥१६॥

तया स्थानी असता गुरु । ख्याति झाली अपरांपरु । प्रकाशत्व चारी राष्ट्र । समस्त येती दर्शना ॥१७॥

येती भक्त यात्रेसी । एकोभावे भक्तीसी । श्रीगुरुदर्शनमात्रेसी । सकळाभीष्ट पावती ॥१८॥

दैन्य पुरुष होती श्रियायुक्त । वांझेसी पुत्र होय त्वरित । कुष्ठे असेल जो पीडित । सुवर्ण होय देह त्याचा ॥१९॥

अक्षहीना अक्ष येती । बधिर कर्णी ऐकती । अपस्मारादि रोग जाती । श्रीगुरुचरणदर्शनमात्रे ॥२०॥

परीस लागता लोहासी । सुवर्ण होय नवल कायसी । श्रीगुरुकृपा होय ज्यासी । सकळाभीष्ट पाविजे ॥२१॥

ऐसे असता वर्तमानी । उत्तर दिशे माहुरस्थानी । होता विप्र महाधनी । नाम तया 'गोपीनाथ' ॥२२॥

तया पुत्र होऊनि मरती । करी दुःख अनेक रीती । दत्तात्रेया आराधिती । स्त्रीपुरुष दोघेजण ॥२३॥

पुढे जाहला आणिक सुत । तया नाम ठेविती 'दत्त' । असती आपण धनवंत । अति प्रीती वाढविले ॥२४॥

एकचि पुत्र तया घरी । अति प्रीति तयावरी । झाला पाच संवत्सरी । व्रतबंध केला तयासी ॥२५॥

वर्षे बारा होता तयासी । विवाह करिती प्रीतीसी । अतिसुंदर नोवरीसी । विचारूनि प्रीतिकरे ॥२६॥

मदनाचे रतीसरसी । रूप दिसे नोवरीसी । अति प्रीति सासूश्वशुरासी । महाप्रेमे प्रतिपाळिती ॥२७॥

दंपती एकचि वयेसी । अति प्रिय महा हर्षी । वर्धता झाली षोडशी । वर्षे तया पुत्रासी ॥२८॥

दोघे सुंदर सुलक्षण । एकापरीस एक प्राण । न विसंबिती क्षण क्षण । अतिप्रिय परियेसा ॥२९॥

जावें तपोभूमीसी । पूजा करीं गा भक्तींसी । रामेश्वर महाहर्षीं । पूजीं मग सोमनाथ ॥३१॥

भरतेश्वर असे थोर । लक्ष्मणेश्वर मनोहर । पूजीं मग शत्रुघ्नेश्वर । भूमिदेवी अर्चीं मग ॥३२॥

नकुळेश्वर पूजोन । करीं रामेश्वरध्यान । पुनर्दर्शन दे म्हणोन । विनवावें परियेसा ॥३३॥

असंख्यात तीर्थ वरुण । तेथें करा तुम्हीं नमन । असंख्यात लिंगें जाण । पूजा करावी भक्तींसी ॥३४॥

पुढें असे लिंग थोर । नामें देव सिद्धेश्वर । पूजा करीं गा मनोहर । पशुपाणि विनायक ॥३५॥

याची पूजा करोनि । पृथ्वीश्वरातें नमोनि । शरयूकूपीं स्नान करोनि । कपिलधारा स्नान करीं ॥३६॥

वृषभध्वजा पूजोनि । ज्वालानृसिंहाचे वंदी चरणीं । वरुणासंगमीं स्नान करोनि । श्राद्धादि कर्मे करावीं ॥३७॥

संगमेश्वर पूजावा । सर्वविनायक बरवा । पुढें पूजीं तूं केशवा । भावें करुनि ब्रह्मचारी ॥३८॥

पूजा प्रऱ्हादेश्वरासी । स्नान कपिलातीर्थासी । त्रिलोचनेश्वरासी । पूजा करीं गा भक्तीनें ॥३९॥

पुढें असे महादेव । पंचगंगातीर ठाव । पूजा करीं गा भक्तिभावें । तया बिंदुमाधवासी ॥४०॥

पूजीं मंगळागौरीसी । गभस्तेश्वरा परियेसीं । वसिष्ठ वामदेवासी । पर्वतेश्वर पूजावा ॥४१॥

महेश्वराचे पूजेसी । पुढें सिद्धिविनायकासी । पूजा सप्तवर्णेश्वरासी । सर्वगणेश पूजावा ॥४२॥

मग जावें मणिकर्णिके । स्नान करावें विवेकें । विश्वेश्वरातें स्मरोनि निकें । महादेव पूजावा ॥४३॥

मग जावें मुक्तिमंडपासी । नमन करावे विष्णूसी । पूजीं दंडपाणीसी । धुंडिराज अर्चावा ॥४४॥

आनंदभैरव पूजोनि । आदित्येशा नमोनि । पूजा करीं गा भक्तींसी । मोदादि पंचविनायका ॥४५॥

पूजा करीं गा विश्वेश्वरासी । मोक्षलक्ष्मीविलासासी । नमोनि देवा संमुखेसी । मंत्र म्हणावा येणेंपरी ॥४६॥

**श्लोक ॥ जय विश्वेश विश्वात्मन् काशीनाथ जगत्पते । त्वत्प्रसादान्महादेव कृता क्षेत्रप्रदक्षिणा ॥४७॥**

अनेकजन्मपापानि कृतानि मम शंकर । गतानि पंचक्रोशात्मा कृता लिंगप्रदक्षिणा ॥४८॥

ऐसा मंत्र जपोन । पुढें करावें शिवध्यान । मुक्तिमंडपा येवोन । आठां ठायीं वंदावें ॥४९॥

प्रथम मुक्तिमंडपासी । नमन करावें परियेसीं । वंदोनि स्वर्गमंडपासी । जावें ऐश्वर्यमंडपा ॥५०॥

ज्ञानमंडपा नमोनि । मोक्षलक्ष्मीविलासस्थानीं । मुक्तिमंडपा वंदोनि । आनंदमंडपा जावें तुवा ॥५१॥

पुढें वैराग्यमंडपासी । तुवां जावें भक्तींसी । येणेंपरी यात्रेसी । करीं गा बाळा ब्रह्मचारी ॥५२॥

आणिक एक प्रकार । सांगेन ऐक विचार । नित्ययात्रा मनोहर । ऐक बाळका गुरुदासा ॥५३॥

सचैल शुचि होवोनि । चक्रपुष्करणीं स्नान करोनि । देवपितर तर्पोनि । ब्राह्मणपूजा करावी ॥५४॥मग निघावें तेथोनि । पदादित्येश्वर पूजोनि । दंपत्येश्वर नमोनि । श्रीविष्णूतें पूजावें ॥५५॥

मग नमावा दंडपाणि । महेश्वरातें पूजोनि । मग निघावें तेथोनि । धुंडिराज अर्चिजे ॥५६॥

ज्ञानवापीं करी स्नान । नंदिकेश्वर अर्चोन । तारकेश्वर पूजोन । पुढें जावें मग तुवां ॥५७॥

महाकाळेश्वर देखा । पूजा करीं भावें एका । दंडपाणि विनायका । पूजा करीं मनोहर ॥५८॥

मग यात्रा विश्वेश्वर । करीं गा बाळका मनोहर । लिंग असे ओंकारेश्वर । प्रतिपदेसी पूजावा ॥५९॥

मत्स्योदरी तीर्थासी । स्नान करावें प्रतिपदेसी । त्रिलोचन महादेवासी । दोन्ही लिंगे असतीं जाण ॥६०॥

तेथें बीजतिजेसी । जावें तुवां यात्रेसी । यात्रा जाण चतुर्थीसी । कांचीवास लिंग जाणा ॥६१॥

रत्नेश्वर पंचमीसी । चंद्रेश्वरपूजेसी । षष्ठीसी जावें परियेसीं । ऐक शिष्या एकचित्तें ॥६२॥

सप्तमीसी केदारेश्वर । अष्टमीसी लिंग धूमेश्वर । विश्वेश्वर लिंग थोर । नवमी यात्रा महापुण्य ॥६३॥

कामेश्वर दशमीसी । एकादशीसी विश्वेश्वरासी । द्वादशीसी मणिकर्णिकेसी । मणिकेश्वर पूजावा ॥६४॥

त्रयोदशी प्रदोषेसी । पूजा अविमुक्तेश्वरासी । चतुर्दशीसी विशेषीं । विश्वेश्वर पूजावा ॥६५॥

जे कोणी काशीवासी । असती नर परियेसीं । त्यांणीं करावी यात्रा ऐसी । नाहीं तरी विघ्न घडे ॥६६॥

शुक्लपक्षीं येणेंपरी । यात्रा करीं मनोहरी । कृष्णपक्ष आलियावरी । यात्रा करा सांगेन ॥६७॥

चतुर्दशी धरोनि । यात्रा करा प्रतिदिनीं । सांगेन ऐका विधानीं । एकचित्तें परियेसा ॥६८॥

वरुणानदीं करा स्नान । करा शैल्येश्वरदर्शन । संगमेश्वर पूजोन । संगमीं स्नान तये दिनीं ॥६९॥

स्वर्गतीर्थस्नानेंसी । स्वर्गेश्वर पूजा हर्षी । मंदाकिनी येरे दिवसीं । मध्यमेश्वर पूजावा ॥७०॥

मणिकर्णिका स्नानेंसी । पूजा ईशानेश्वरासी । हिरण्यगर्भ परियेसीं । दोनी लिंगें पूजिजे ॥७१॥

स्नान धर्मकूपेसी । करीं पूजा गोपद्मेश्वरासी । पूजा करा तया दिवसीं । एकचित्तें परियेसा ॥७२॥

कपिलधारा तीर्थासी । स्नान करा भक्तींसी । वृषभध्वज लिंगासी । सप्तमीचे दिवसीं पूजीं पै ॥७३॥

उपाशांतिकूपेसी । स्नान करा भक्तींसी । उपशांतेश्वरासी । पूजा करीं तया दिनीं ॥७४॥

पंचचूडडोहांत । स्नान करा शिव ध्यात । ज्येष्ठेश्वरा त्वरित । पूजावें तया दिनीं ॥७५॥

चतुःसमुद्रकूपासी । स्नान करीं भावेंसी । समुद्रेश्वर हर्षी । पूजा करीं तया दिनीं ॥७६॥

देवापुढें कूप असे । स्नान करावें संतोषें । शुक्रेश्वर पूजा हर्षें । पूजा करीं तया दिनीं ॥७७॥

दंडखात तीर्थेंसी । स्नान करोनि देवासी । व्याघ्रेश्वरपूजेसी । तुंवा जावें तया दिनीं ॥७८॥

शौनकेश्वरतीर्थेसी । स्नान तुम्ही करा हर्षीं । तीर्थनामें लिंगासी । पूजा करा मनोहर ॥७९॥

जंबुतीर्थ मनोहर । स्नान करा शुभाचार । पूजावा भावें जंबुकेश्वर । चतुर्दश लिंगें येणेंपरी ॥८०॥

शुक्लपक्षकृष्णेसी । अष्टमी तिथि विशेषीं । पूजावें तुम्हीं लिंगासी । सांगेन ऐका महापुण्य ॥८१॥

मोक्षेश्वर पर्वतेश्वर । तिसरा पशुपतेश्वर । गंगेश्वर नर्मदेश्वर । पूजा करीं मनोभावें ॥८२॥

आणिक भक्तेश्वर गभस्तीश्वर । मध्यमेश्वर असे थोर । तारकेश्वरनामें निर्धार । नव लिंगें पूजावीं ॥८३॥

आणिक लिंगें एकादश । नित्ययात्रा विशेष । लिंग असे अग्निध्रुवेश । यात्रा तुम्हीं करावी ॥८४॥

दुसरा असे उर्वशीश्वर । नकुलेश्वर मनोहर । चौथा असे आषाढेश्वर । भारभूतेश्वर पंचम ॥८५॥

लांगूलेश्वरीं करा पूजा । करा त्रिपुरांतका ओजा । मनःप्रकामेश्वरकाजा । तुम्हीं जावें परियेसा ॥८६॥

प्रीतेश्वर असे देखा । मंदालिकेश्वर ऐका । तिलपर्णेश्वर निका । पूजा करीं भावेंसी ॥८७॥

आतां शक्तियात्रेसी । सांगेन ऐका विधीसी । शुक्लपक्षतृतीयेसी । आठ यात्रा कराव्या ॥८८॥

गोप्रेक्षतीर्थ देखा । स्नान करोनि ऐका । पूजा मुख्य भाळनेत्रिका । भक्तिभावेंकरोनिया ॥८९॥

ज्येष्ठवापीं स्नानेंसी । ज्येष्ठागौरी पूजा हर्षीं । स्नान पान करा वापीसी । शृंगार सौभाग्य गौरीपूजा ॥९०॥

विशाळगंगास्नानासी । पूजा विशाळगौरीसी । ललितातीर्थस्नानेसी । ललिता देवी पूजावी ॥९१॥

स्नान भवानीतीर्थेसी । पूजा करा भवानीसी । बिंदुतीर्थ स्नानासी । मंगळागौरी पूजावी ॥९२॥

पूजा इतुके शक्तींसी । मग पूजिजे लक्ष्मीसी । येणें विधी भक्तींसी । यात्रा करीं मनोहर ॥९३॥

यात्रातीर्थ चतुर्थीसी । पूजा सर्व गणेशासी । मोदक द्यावे गौरीपुत्रासी । विघ्न न करीं तीर्थवासियांतें ॥९४॥

मंगळ अथवा रविवारेंसी । यात्रा करीं भैरवासी । षष्ठी तिथि परियेसीं । जावें तुम्हीं मनोहर ॥९५॥
रविवारीं सप्तमीसी । यात्रा रविदेवासी । नवमी अष्टमी चंडीसी । यात्रा तुम्हीं करावी ॥९६॥
अंतर्गृहयात्रेसी । करावी तुम्हीं प्रतिदिवसीं । विस्तारकाशीखंडासी । ऐक शिष्या ब्रह्मचारी ॥९७॥
ऐशी काशीविश्वेश्वर । यात्रा करावी तुम्हीं परिकर । आपुल्या नामीं सोमेश्वर । लिंगप्रतिष्ठा करावी ॥९८॥
इतुकें ब्रह्मचारियासी । यात्रा सांगितली परियेसीं । आचरण करीं येणें विधींसी । तुझी वासना पुरेल ॥९९॥
तुझे चित्तीं असे गुरु । प्रसन्न होईल शंकरु । मनीं धरीं गा निर्धारु । गुरुस्मरण करीं निरंतर ॥१००॥
इतकें सांगोनि तापसी । अदृश्य झाला परियेसीं । ब्रह्मचारी म्हणे हर्षी । हाचि माझा गुरु सत्य ॥१॥
अथवा होईल ईश्वर । मज कृपाळू झाला सत्वर । कार्य लाधेल निर्धार । म्हणोनि मनीं धरियेलें ॥२॥
न आराधितां आपोआप । भेटला मातें मायबाप । गुरुभक्तीनें अमूप । सकाळाभीष्टें पाविजे ॥३॥
समस्त देवा ऐशी गति । दिल्यावांचोन न देती । ईश्वर भोळा चक्रवर्ती । गुरुप्रसादें भेटला ॥४॥
यज्ञ दान तप सायास । कांहीं न करितां सायास । भेटला मज विशेष । गुरुकृपेंकरोनिया ॥५॥
ऐसें गुरुस्मरण करीत । ब्रह्मचारी जाय त्वरित । विधिपूर्वक आचरत । यात्रा केली भक्तीनें ॥६॥
यात्रा करितां भक्तींसी । प्रसन्न झाला व्योमकेशी । निजस्वरुपें संमुखेसी । उभा राहिला शंकर ॥७॥
प्रसन्न होवोनि शंकर । म्हणे दिधला माग वर । संतोषोनि त्वष्ट्रकुमार । निवेदिता झाला वृत्तान्त ॥८॥
जें जें मागितलें गुरुवर्यें । आणिक त्याचे कन्याकुमारें । सांगता झाला विस्तारें । शंकराजवळी देखा ॥९॥
संतोषोनि ईश्वर । देता झाला अखिल वर । म्हणे बाळा माझा कुमार । सकळ विद्याकुशल होसी ॥११०॥
तुवां केली गुरुभक्ति । तेणें झाली आपणा तृप्ति । अखिल विद्या तुज होती । विश्वकर्मा तूंचि होसी ॥११॥
चतुर्विध पुरुषार्थ । लाधला तुज परमार्थ । सृष्टि रचावया समर्थ । होसी जाण त्वष्ट्रपुत्रा ॥१२॥
ऐसा वर लाधोन । त्वष्टा ब्रह्मानंदन । केलें लिंग स्थापन । आपुले नामीं परियेसा ॥१३॥
मग निघाला तेथोनि । केली आयती तत्क्षणीं । प्रसन्न होतां शूलपाणि । काय नोहे तयासी ॥१४॥
जें जें मागितलें श्रीगुरुवरें । सकळ वस्तु केल्या चतुरें । घेऊनिया सत्वरें । आला श्रीगुरुसंमुख ॥१५॥
सकळ वस्तु देऊनि । लागतसे श्रीगुरुचरणीं । अनुक्रमें गुरुरमणि । पुत्र-कन्येंसी वंदिलें ॥१६॥
उल्हास झाला श्रीगुरुसी । आलिंगितसे महाहर्षी । शिष्य ताता ज्ञानराशि । तुष्टलों तुझे भक्तीनें ॥१७॥
सकल विद्याकुशल होसी । अष्टैश्वर्ये नांदसी । त्रैमूर्ति तुझिया वंशीं । होतील ऐक शिष्योत्तमा ॥१८॥
घर केलें तुवां आम्हांसी । आणिक वस्तु विचित्रेंसी । चिरंजीव तूंचि होसी । आचंद्रार्क तुझें नाम ॥१९॥
स्वर्गमृत्युपाताळासी । पसरवीं तुझे चातुर्यासी । रचिसी तूंचि सृष्टीसी । विद्या चौसष्टी तूंचि ज्ञाता ॥१२०॥
तुज वश्य अष्ट सिद्धि । होतील जाण नव निधि । चिंता कष्ट न होती कधीं । म्हणोनि वर देतसे ॥२१॥
ऐसा वर लाधोनि । गेला शिष्य महाज्ञानी । येणेंपरी विस्तारोनि । सांगे ईश्वर पार्वतीसी ॥२२॥
ईश्वर म्हणे गिरिजेसी । गुरुभक्ति आहे ऐसी । एकभाव असे ज्यासी । सकळाभीष्टें पावती ॥२३॥
भव म्हणिजे सागर । उतरावया पैल पार । समर्थ असे एक गुरुवर । त्रैमूर्तीचा अवतार ॥२४॥
या कारणें त्रैमूर्ति । गुरुचरणीं भजती । वेदशास्त्रें बोलती । गुरुविणें सिद्धि नाहीं ॥२५॥
**श्लोक ॥ यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ । तस्यैते कथिता ह्यर्था : प्रकाशन्ते महात्मनः ॥२६॥**

ऐसें ईश्वर पार्वतीसी । सांगता झाला विस्तारेंसी । म्हणोनि श्रीगुरु प्रीतीसी । निरोपिलें द्विजातें ॥२७॥

इतुकें होतां रजनीसी । उदय झाला दिनकरासी । चिंता अंधकारासी । गुरुकृपा ज्योती जाणा ॥२८॥

संतोषोनि द्विजवर । करिता झाला नमस्कार । ऐसी बुद्धि देणार । तूंचि स्वामी कृपानिधि ॥२९॥

नमन करुनि श्रीगुरुसी । विनवीतसे भावेंसी । स्वामी कथा निरोपिलीसी । अपूर्व मातें वाटलें ॥१३०॥

काशीयात्राविधान । निरोपिलें मज विस्तारोन । तया वेळीं होतों आपण । तुम्हांसहित तेथेंचि ॥३१॥

पाहिलें आपण दृष्टान्तीं । स्वामी काशीपुरीं असती । जागृतीं कीं सुषुप्तीं । नकळे मातें स्वामिया ॥३२॥

म्हणोनि विप्र तये वेळीं । वंदी श्रीगुरुचरणकमळीं । विनवीतसे करुणा बहाळी । भक्तिभावेंकरोनिया ॥३३॥

जय जया परमपुरुषा । परात्परा परमहंसा । भक्तजनमानसहंसा । श्रीनृसिंहसरस्वती ॥३४॥

ऐसें तया अवसरीं । पूर्वज तुझा स्तोत्र करी । सांगेन तुज अवधारीं । एकचित्तें करुनिया ॥३५॥

**श्लोक ॥ आदौ ब्रह्मत्वमेव सर्वजगतां वेदात्ममूर्तिं विभुं । पश्चात् क्षोणिजडा विनाश-दितिजां कृत्वाऽवतारं प्रभो । हत्वा दैत्यमनेकधर्मचरितं, भूत्वाऽत्मजोऽत्रेर्गृहे । वंदेऽहं नरकेसरीसरस्वती श्रीपादयुग्मांबुजम् ॥३६॥**

**भूदेवाखिलमानुषं विदुजना बाधायमानं कलिं । वेदादुश्यमनेकवर्णमनुजा, भेदादि-भूतोन्नतम् । छेदः कर्मतमांधकारहरणं श्रीपादसूर्योदयं । वंदेऽहं नरकेसरीसरस्वती श्रीपादयुग्मांबुजम् ॥३७॥**

**धातस्त्वं हरिशंकरप्रतिगुरो, जाताग्रजन्मं विभो । हेतुः सर्वविदोजनाय तरणं, ज्योतिःस्वरुपं जगत् । चातुर्थाश्रमस्थापितं क्षितितले, पातुः सदा सेव्ययं । वंदेऽहं नरकेसरीसरस्वतीश्रीपादयुग्मांबुजम् ॥३८॥**

**चरितं चित्रमनेककीर्तिमतुलं, परिभूतभूमंडले । मूकं वाक्यदिवांधकस्य नयनं, वंध्यां च पुत्रं ददौ । सौभाग्यं विधवां च दायकश्रियं, दत्त्वा च भक्तं जनं । वंदेऽहं नरकेसरीसरस्वतीश्रीपादयुग्मांबुजम् ॥३९॥**

**दुरितं, घोरदरिद्रदावतिमिरं, हरणं जगज्जोतिष । स्वर्धेनुं सुरपादपूजितजना, करुणाब्धिभक्तार्तितः । नरसिंहेंद्रसरस्वतीश्वर विभो, शरणागतं रक्षकं । वंदेऽहं नरकेसरीसरस्वती श्रीपादयुग्मांबुजम् ॥१४०॥**

**गुरुमूर्तिश्चरणारविंदयुगलं, स्मरणं कृतं नित्यसौ । चरितं क्षेत्रमनेकतीर्थसफलं सरितादि-भागीरथी । तुरगामेधसहस्रगोविदुजनाः स्मयक् ददंस्तत्फलं । वंदेऽहं नरकेसरीसरस्वतीश्रीपादयुग्मांबुजम् ॥४१॥**

**नो शक्यं तव नाममंगल-स्तुवं, वेदागमागोचरं । पादद्वं हृदयाब्जमंतरजलं निर्धारमीमांसतं । भूयो भूयः स्मरन्नमामि मनसा, श्रीमद्गुरुं पाहि मां । वंदेऽहं नरकेसरीसरस्वती श्रीपादयुग्मांबुजम् ॥४२॥**

**भक्तानां तरणार्थ सर्वजगतां, दीक्षां ददन्योगिनां । सुक्षेत्रं पुरगाणगस्थित प्रभो, दत्त्वा चतुष्कामदं । स्तुत्वा भक्तसरस्वतीगुरुपदं, जित्वाऽद्यदोषादिकं । वंदेऽहं नरकेसरीसरस्वती श्रीपादयुग्मांबुजम् ॥४३॥**

**एवं श्रीगुरुनाथमष्टकमिदं स्तोत्रं पठेन्नित्यसौ । तेजोवर्चबलोन्नतं श्रियकरं आनंदवर्धं वपुः । पुत्रापत्यमनेकसंपदशुभा दीर्घायुरारोग्यतां । वंदेऽहं नरकेसरीसरस्वती श्रीपादयुग्मांबुजम् ॥४४॥**

येणेंपरी स्तोत्र करीत । मागुती करी दंडवत । सद्गदित कंठ होत । रोमांच अंगीं उठियेले ॥४५॥

म्हणे त्रैमूर्ति अवतारु । तूंचि देवा जगद्गुरु । आम्हां दिसतोसी नरु । कृपानिधि स्वामिया ॥४६॥

मज दाविला परमार्थ । लाधलों चारी पुरुषार्थ । तूंचि सत्य विश्वनाथ । काशीपुर तुजपाशीं ॥४७॥

ऐसेंपरी श्रीगुरुसी । विनवीतसे परियेसीं । संतोषोनि महाहर्षीं । निरोप देती तये वेळीं ॥४८॥

श्रीगुरु म्हणती द्विजासी । दाखविली तुज काशी । पुढें तुझ्या वंशीं एकविसांसी । यात्राफळ तयां असे ॥४९॥

तूंचि आमुचा निजभक्त । दाखविला तुज दृष्टान्त । आम्हांपासीं सेवा करीत । राहें भक्ता म्हणती तया ॥१५०॥

जरी राहसी आम्हांपासी । तरी त्वां न वंदिजे म्लेंच्छासी । आणोनिया स्त्रीपुत्रांसी । भेटी करीं आम्हांतें ॥५१॥

निरोप देऊनि द्विजासी । गेले गुरु मठासी । आनंद झाला मनासी । श्रीगुरुदर्शनीं भक्तजना ॥५२॥

नामधारक शिष्यराणा । लागे सिद्धाचिया चरणां । विनवीतसे कर जोडोनि जाणा । भक्तिभावेंकरोनिया ॥५३॥

मागें कथानक निरोपिलें । सायंदेव शिष्य श्रीगुरुंनीं त्यातें निरोपिलें । कलत्रपुत्र आणीं म्हणत ॥५४॥

पुढें तया काय झालें । विस्तारोनि सांगा वहिलें । पाहिजे आतां अनुग्रहिलें । म्हणोनि चरणीं लागला ॥५५॥

संतोषोनि सिद्ध मुनि । सांगतसे विस्तारोनि । सायंदेव महाज्ञानी । गेला श्रीगुरुनिरोपें ॥५६॥

जाऊनि आपुले स्त्रियेसी । सांगता झाला पुत्रासी । आमुचा गुरु परियेसीं । असे गाणगापुरांत ॥५७॥

आम्हीं जावें भेटीसी । समस्त कन्यापुत्रांसी । म्हणोनि निघाला वेगेंसी । महानंदेंकरोनिया ॥५८॥

पावला गाणगापुरासी । भेटी जहाली श्रीगुरुसी । नमन करी भक्तींसी । साष्टांगीं तये वेळीं ॥५९॥

कर जोडुनी तये वेळीं । स्तोत्र करी वेळोवेळीं । ओंनमोजी चंद्रमौळि । त्रैमूर्ति तूंचि होसी ॥१६०॥

तूं त्रैमूर्तिचा अवतार । अज्ञानदृष्टीं दिससी नर । वर्णावया न दिसे पार । तुझा महिमा स्वामिया ॥६१॥

तुझा महिमा वर्णावयासी । शक्ति कैची आम्हांसी । आदिपुरुष भेटलासी । कृपानिधि स्वामिया ॥६२॥

जैसा चंद्र चकोरासी । उदय होतां संतोष त्यासी । तैसा आनंद आम्हांसी । तुझे चरण लक्षितां ॥६३॥

पूर्वजन्मीं पापराशि । केल्या होत्या बहुवशी । श्रीगुरुचे दर्शनेसी । पुनीत झालों म्हणतसे ॥६४॥

जैसा चिंतामणि स्पर्शीं । हेमत्व होय लोहासी । मृत्तिका पडतां जंबूनदीसी । उत्तम सुवर्ण होतसे ॥६५॥

जातां मानससरोवरासी । हंसत्व येई वायसासी । तैसें तुझे दर्शनेंसी । पुनीत झालों स्वामिया ॥६६॥

**श्लोक ॥ गंगा पापं शशी तापं दैन्यं कल्पतरुस्तस्था । पापं तापं च हरति दैन्यं च गुरुदर्शनम् ॥१॥**

टीका ॥ गंगा स्नानानें पापें नाशी । ताप निवारी देखा शशी । कल्पवृक्षछायेसी । कल्पिलें फळ पाविजे ॥६७॥

एकेकाचे एकेक गुणें । असतीं ऐसीं हीं लक्षणें । दर्शन होतां श्रीगुरुचरणें । तिन्ही फळें पाविजे ॥६८॥

पापें हरती तात्काळीं । तापचिंता जातीं सकळी । दैन्यकानन समूळ जाळी । श्रीगुरुचरणदर्शनें ॥६९॥

चतुर्विध पुरुषार्थ । देता होय गुरुनाथ । ऐसा बोले वेदसिद्धान्त । तोचि आम्हीं देखिला ॥१७०॥

म्हणोनिया आनंदेंसी । गायन करी संतोषीं । अनेक रागें परियेसीं । कर्नाटक भाषें करोनि ॥७१॥

**राग श्रीराग । कंडेनिंदु भक्तजनराभाग्यनिधियभूमंडलदोळगेनारसिंहसरस्वतीया ॥७२॥**

**कंडेनिंदुउंडेनिंदुवारिजादोळपादवाराजाकमळांदोळदंतध्यानिसी ॥७३॥**

**सुखसुवाजनारुगळा । भोरगेलान्नेकामिफळफळा । नित्यसकळाहूवा । धीनारसिंहसरस्वतीवराननाा ॥७४॥**

**वाक्यकरुणानेनसुवा । जगदोळगदंडकमंडलुधराशी । सगुणानेनीशीसुजनरिगे । वगादुनीवासश्रीगुरुयतिवरान्न ॥७५॥**

**धारगेगाणगापुरडोलकेलाशीहरी । दासिसोनुनादयाकरुणादली । वरावीतुंगमुनाहोरावनुअनुबिना ।**

**नारसिंहसरस्वतीगुरुचरणवन्न ॥७६॥**

**राजगखंडीकंडीनेननमा । इंदुकडेनेनमा । मंडलादोळगेयती कुलराये । चंद्रमन्ना ॥७७॥**

**तत्त्वबोधायाउपनिषदतत्त्वचरित नाव्यक्तवादपरब्रह्ममूर्तियनायना । शेषशयनापरवेशकायना । लेशकृपयनीवनेवभवासौपालकाना ॥७८॥**

**गंधपरिमळादिशोभितानंदासरसाछंदालयोगेंद्रेगोपीवृंदवल्लभना ॥७९॥**

**करीयनीयानांपापगुरु । नवरसगुसायन्नीं । नरसिंहसरस्वत्यन्ना । नादपुरुषवादना ॥१८०॥**

यापरी स्तोत्रें श्रीगुरुसी । स्तुति केली बहुवसीं । संतोषोनि महाहर्षी । आश्वासिताती तये वेळीं ॥८१॥

प्रेमभावें समस्तांसी । बैसा म्हणती समीपेसी । जैसा लोभ मायेसी । या बाळकावरी परियेसा ॥८२॥

आज्ञा घेउनी सहज । गेला तुमचा पूर्वज । सकळ पुत्रांसहित द्विज । आला श्रीगुरुदर्शना ॥८३॥

भाद्रपद चतुर्दशीसी । शुक्लपक्ष परियेसीं । आला शिष्य भेटीसी । एकाभावेंकरोनिया ॥८४॥

येती शिष्य लोटांगणीं । एकाभावें तनुमनीं । येऊनि लागती चरणीं । सद्गदित कंठ झाला ॥८५॥

स्तोत्र करिती तिहीं काळीं । कर जोडोनि तये वेळीं । ओं नमोजी चंद्रमौळि । त्रैमूर्ति तूंचि होसी ॥८६॥

त्रैमूर्तींचा अवतारु । झालासी तूं जगद्‌गुरु । येरां दिसतोसी नरु । न कळे पार तुझा स्वामिया ॥८७॥

सिद्ध म्हणे नामकरणी । काय सांगू तये दिनीं । कैशी कृपा अंतःकरणीं । तया श्रीगुरु यतीचे ॥८८॥

आपुले पुत्रकलत्रेंसी । जैसा लोभ परियेसीं । तैसा तुमचे पूर्वजासी । प्रेमभावें पुसताती ॥८९॥

गृहवार्ता सुरसी । क्षेम पुत्रकलत्रेंसी । द्विज सांगे मनोहर्षी । सविस्तारीं परियेसा ॥१९०॥

पुत्रकलत्रेंसंहित नमोन । सांगे क्षेम समाधान । होते पुत्र चौघेजण । चरणावरी घातले ॥९१॥

ज्येष्ठसुत नागनाथ । तयावरी कृपा बहुत । कृपानिधि गुरुनाथ । माथां हस्त ठेविती ॥९२॥

श्रीगुरु म्हणती द्विजासी । तुझ्या ज्येष्ठसुतासी । आयुष्य पूर्ण असे त्यासी । संतति बहु याची वाढेल ॥९३॥

हाच भक्त आम्हांसी । असेल श्रियायुक्तेसी । तुवां आतां म्लेंच्छासी । सेवा न करावी म्हणितलें ॥९४॥

आणिक तूंतें असे नारी । पुत्र होती तीस चारी । नांदतील श्रेयस्करी । तुवां सुखें असावें ॥९५॥

जया दिवसीं म्लेंच्छासी । तुवां जावोनि वंदिसी । हानि असे जीवासी । म्हणोनि सांगती तये वेळीं ॥९६॥

तुझा असे वडिल सुत । तोचि आमुचा निज भक्त । त्याची कीर्ति वाढेल बहुत । म्हणती श्रीगुरु तये वेळीं ॥९७॥

मग म्हणती द्विजासी । जावें त्वरित संगमासी । स्नान करोनि त्वरितेंसी । यावें म्हणती तये वेळीं ॥९८॥

ग्रामलोक तया दिवसीं । पूजा करितां अनंतासी । येऊनिया श्रीगुरुसी । पूजा करितो परियेसा ॥९९॥

पुत्रमित्रकलत्रेंसी । गेले स्नाना संगमासी । विधिपूर्वक अश्वत्थासी । पूजूनि आले मठातें ॥२००॥

श्रीगुरु म्हणती द्विजासी । आजि व्रतचतुर्दशी । पूजा करीं अनंतासी । समस्त द्विज मिळोनि ॥१॥

ऐसें म्हणतां द्विजवरु । करितां होय नमस्कारु । आमुचा अनंत तूंचि गुरु । व्रतसेवा तुमचे चरण ॥२॥

तये वेळीं श्रीगुरु । सांगतां झाला विस्तारु । कौंडिण्यमहाऋषीश्वरु । केलें व्रत प्रख्यात ॥३॥

ऐसें म्हणतां द्विजवरु । करितां होय नमस्कारु । कैसें व्रत आचरावें साचारु । पूर्वी कोणी केलें असे ॥४॥

ऐसें व्रत प्रख्यात । व्रत दैवत अनंत । जेणें होय माझें हित । कथामृत निरोपिजे ॥५॥

येणें पुण्य काय घडे । काय लाभतसे रोकडें । ऐसें मनींचें साकडें । फेडावें माझें स्वामिया ॥६॥

ऐसें विनवीतसे द्विजवरु । संतोषोनि गुरु दातारु । सांगते झाले व्रताचारु । सिद्ध म्हणे नामधारका ॥७॥

म्हणोनि सरस्वतीगंगाधरु । सांगे गुरुचरित्रविस्तारु । ऐकतां भवसागरु । पैल पार पाववी श्रीगुरु ॥८॥

इति श्रीगुरुचरित्रामृत। काशीयात्रा समस्त करीत। श्रोते ऐकती आनंदित। तेणें सफल जन्म होय ॥९॥

इति श्रीगुरुचरित्रामृत। सांगतसे नामधारक विख्यात। जेणें होय मोक्ष प्राप्त। द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥२१०॥

इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे काशीक्षेत्रमहिमावर्णनं नाम द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥४२॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओसंख्या ॥२१०॥

**॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥**

## अध्याय त्रेचाळीसावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

नामधारक म्हणे सिद्धासी । पुढें चरित्र जाहलें कैसी । विस्तारावें आम्हांसी । कृपा करीं गा दातारा ॥१॥

सिद्ध म्हणे ऐक वत्सा । समस्त भक्त सेवा करितां । त्यांत एक विणकर तंतिक अत्यंता । करीतसे भक्ति श्रीगुरुची ॥२॥

तीन प्रहर संसारयात्रा । करुनि येतसे पवित्रा । राजांगण झाडी विचित्रा । नमस्कार करी दुरोनि ॥३॥

ऐसे किती दिवस क्रमिले । व्रत शिवरात्री आलें । समस्त यात्रेसी निघाले । मातापिता तंतिकाचे ॥४॥

त्यासी बोलाविती यात्रेसी । तो म्हणतसे नयें तयांसी । तुम्ही मूर्ख असा पिसीं । माझा श्रीपर्वत येथेंचि असे ॥५॥

श्रीगुरु माझा मल्लिकार्जुन । पर्वत म्हणिजे श्रीगुरुभुवन । आपण न यें येथून । चरण सोडोनि श्रीगुरुचे ॥६॥

समस्त लोक त्यासी हांसती । पिसें लागलें यासी म्हणती । चला जाऊं म्हणोनि निघती । भ्राता माता पिता त्याचे ॥७॥

नगरलोक समस्त गेला । आपण एकला राहिला । श्रीगुरुमठासी आला । गुरु पुसती तयासी ॥८॥

श्रीगुरु म्हणती तयासी । कां गा यात्रेसी तूं न वचसी । तंतिक म्हणे स्वामीसी । माझी यात्रा तुमचे चरण ॥९॥

नाना तीर्थयात्रादि देखा । तुमचे चरणीं असे निका । वायां जाती मूर्ख लोक । पाषाणदर्शन करावया ॥१०॥

ऐसें म्हणोनि तंतिक । नमस्कार करी नित्य देख । तंव पातली शिवरात्रि ऐक । माघवद्य चतुर्दशी ॥११॥

श्रीगुरु होते संगमासी । दोन प्रहर होतां भक्त परियेसीं । आपण गेला स्नानासी । उपवास असे शिवरात्रीचा ॥१२॥

संगमीं स्नान करोनि । श्रीगुरुतें नमस्कारोनि । उभा ठेला कर जोडोनि । भक्तिपूर्वक एकोभावें ॥१३॥

श्रीगुरु म्हणती तयासी । तुझीं समस्त गेलीं यात्रेसी । तूं एकलाचि राहिलासी । पहातासी विनोद श्रीपर्वताचा ॥१४॥

पुसती कधीं देखिलासी ? । म्हणे स्वामी नेणें कधींसी । तुमचे चरणीं आम्हांसी । सर्व यात्रा सदा असती ॥१५॥

त्याचा भाव पाहोनी । जवळी बोलाविती श्रीगुरुमुनि । बैस म्हणती कृपा करुनि । दाखवूं म्हणती श्रीपर्वत ॥१६॥

नयन झांकूनि पादुकेसी । दृढ धरीं गा वेगेंसीं । ऐसें म्हणोनि तयासी । मनोवेगें घेऊनि गेले ॥१७॥

क्षण न लागतां श्रीगिरीसी । घेऊनि गेले भक्तासी । तीरीं बैसले पाताळगंगेसी । नयन उघडीं म्हणती त्यातें ॥१८॥

क्षणैक मात्र निद्रावस्था । म्हणतां झाला जागृता । अवलोकितां पर्वत दिसत । म्हणे स्वप्न किंवा सत्य ॥१९॥

श्रीगुरु म्हणती तयासी । कां गा भ्रांतपणें पाहसी । वेगें जावें दर्शनासी । क्षौर स्नान करुनियां ॥२०॥

श्रीगुरु ऐसे निरोप देतां । शीघ्र गेला स्नानाकरितां । तेथें देखिलीं मातापिता । भ्राता ग्रामलोक सकळिक ॥२१॥

ते पुसती तयासी । कवणें मार्गें आलासी । आमुची भेटी कां न घेसी । लपून येणें कोण धर्म ॥२२॥

विनवीतसे मातापित्यांसी । आम्ही निघालों आजि दोन प्रहरेंसी । एक घटिका लागली वाटेसी । आतां आलों गुरुसमागमें ॥२३॥

एक हांसती मिथ्या म्हणती । आम्हांसवेंचि आला लपत । ऐसें बडिवारें बोलत । अबद्ध म्हणती सकळ जन ॥२४॥

तो कोणासवें न बोले । शीघ्र स्नान क्षौर केलें । पुष्पें अक्षता बेलें । घेऊनि गेला पूजेसी ॥२५॥

पूजा करितां लिंगस्थानीं । देखता झाला श्रीगुरुमुनि । अति विस्मय करोनि । पूजा केली मनोभावें ॥२६॥

समस्त लोक पूजा करिती । श्रीगुरु सर्व पूजा घेती । तंतिक म्हणतसे चित्तीं । श्रीगुरुराज आपणचि शंकर ॥२७॥

ऐसा निर्धार करुनि । पाहिजे प्रसाद-फल खुणी । घेऊनि आला गुरुसंनिधानीं । एकचित्तें परियेसा ॥२८॥

श्रीगुरु पुसती तयासी । एधवां राहसी किंवा जासी । तंतिक विनवी स्वामियासी । एक देखिलें नवल आतां ॥२९॥

समस्त लोक जाऊनि । देवालयाभीतरीं बैसोनि । पूजा करिती तुमचे चरणीं । लिंग न देखों तुम्हीच तेथें ॥३०॥

श्रीगुरु तूं जवळीच असतां । इतुके दुरी कां कष्टती वृथा । लोक येताति बहुता । काय कारण या स्थाना ॥३१॥

तूं तरी केवळ परमेश्वर । दिसतोसि आम्हां नर । न कळे तुझा महिमा अपार । गौप्यरुपें गुरुनाथा ॥३२॥

सर्व जन मूढ होऊन । नेणती तुझें महिमान । कां हो येताति या स्थानीं । विस्तारोनि सांग मज ॥३३॥

श्रीगुरु म्हणती ऐक भक्ता । सर्वत्र ईश्वरपूर्णता । स्थानमहिमा असे ख्याता । जे अगम्य त्रिभुवनीं ॥३४॥

तंतिक म्हणे स्वामियासी । तूं तरी पूर्ण ब्रह्म होसी । स्थानमहिमा वानिसी । विस्तारुनि सांग आम्हां ॥३५॥

श्रीगुरु निरोपिती भक्तासी । येथील महिमा पुससी । सांगेन ऐक विस्तारेंसीं । स्कंदपुराणीं असे कथा ॥३६॥

माघवद्य चतुर्दशी । अपार महिमा श्रीपर्वतासी । सांगेन ऐक तत्परेसीं । श्रीगुरु म्हणती तंतिकातें ॥३७॥

पूर्वी ख्यात किरातदेशीं । 'विमर्षण' राजा परियेसीं । शूर असे पराक्रमेंसीं । समस्त शत्रु जिंकिले तेणें ॥३८॥

आणिक एक कुबुद्धि असे । पारधी करी बहुवसें । बलाढय स्थूळ बहु असे । चंचळ सकळ-स्त्रियारत ॥३९॥

सर्वमांस भक्षण करी । ग्राह्य अग्राह्य न विचारी । ऐसा वर्ते दुराचारी । ईश्वर पूजी भक्तिभावें ॥४०॥

नित्य पूजा करी अपार । शिवरात्रि आलिया हर्षनिर्भर । गीत नृत्य वाद्य परिकर । भक्तिपूर्वक करी पूजा ॥४१॥

आचार तरी बरवा नसे । शिवपूजा करी बहुवसें । पत्नी त्यासी एक असे । सुलक्षण नाम 'कुमुद्वती' ॥४२॥

सुशील सुगुण पतिव्रता । मनीं करी बहुत चिंता । पुरुष आपुला परद्वाररता । ईश्वरभक्ति करीतसे ॥४३॥

ऐसें क्रमितां एके दिवसीं । पुसों लागली आपुले पुरुषासी । म्हणे प्राणेश्वरा परियेसीं । विनंति एक असे माझी ॥४४॥

क्षमा करावी माझिया बोला । विस्तारोनि सांगावें सकळा । तुम्ही दुराचारी भक्षितां सकळां । परद्वार निरंतर ॥४५॥

तुम्हांला ईश्वरावरी । भक्ति उपजली कवणेपरी । सांगावें स्वामी सविस्तारीं । कोप न करावा प्राणनाथा ॥४६॥

राजा म्हणे स्त्रियेसी । बरवें पुसिलें आम्हांसी । ज्ञान झालें आतां मानसीं । पूर्व जन्म सांगेन माझा ॥४७॥

पूर्वीं पंपानगरीं आपण । श्वानयोनीं जन्मोन जाण । होतों तेथें काळ क्रमोन । शिवरात्रि आली एके दिवसीं ॥४८॥

त्या नगरीं होतें एक शिवालय । समस्त लोक आले पूजावया । आपणही गेलों हिंडावया । भक्षावया कांहीं मिळेल म्हणोनि ॥४९॥

उत्साहें लोक पूजा करिती । नाना वाजंतरें वाजतीं । गर्भगृहीं प्रदक्षिणा करिती । धरुनि आरति सकळिक ॥५०॥

आपण गेलों द्वारांत । विनोदें पाहूं म्हणत । मज देखोनि आले धांवत । काष्ठ पाषाण घेवोनियां ॥५१॥

आपण पौळीमध्यें होतों पळत । द्वार घातलें मारूं म्हणत । धरा धरा मारा म्हणोनि बोलत । मारुं लागले पाषाणीं ॥५२॥

वाट नाहीं बाहेर जावयासी । अभिलाष असे जीवासी । पळतसें देवालयभीतरेसी । मार्ग नाहीं कोठें देखा ॥५३॥

बाहेर जाईन म्हणत । द्वाराकडे मागुती येत । सवेंचि लोक पाठीं लागत । सव्य प्रदक्षिणा पळतसें ॥५४॥

लपावया ठाव नाहीं देखा । वेष्टिलों पौळीं दुर्गासरिखा । पाठी लागले सकळिका । पुन्हा पौळींत पळे तैसाचि ॥५५॥

उच्छिष्ट कांहीं मिळेल म्हणोनि । देउळांत गेलों भामिनी । काकुळती बहु मनीं । प्राण वांचेल म्हणोनियां ॥५६॥

ऐसा तीन वेळां पळालों । मारतील म्हणोनि बहु भ्यालों । मग अंतरगृहीं निघालों । पूजा देखिली तेथ शिवाची ॥५७॥

द्वार धरोनि समस्त लोक । शस्त्रें मारिलें मज ऐक । ओढोनि टाकिती सकळिक । शिवालयाबाहेरी ॥५८॥

मज पुण्य घडलें प्रदक्षिणीं । पूजा देखिली नयनीं । तेणें पुण्यें राजा होउनि । उपजलों ऐक प्राणेश्वरी ॥५९॥

शिवरात्रि होती ते दिवसीं । न मिळे उच्छिष्ट भुक्तीसी । प्राण त्यजिला उपवासी । तेंही पुण्य मज घडलें ॥६०॥

आणिक एक पुण्य घडलें । दीपमाळीस दीपक उजळले । ते म्यां डोळां देखिले । प्राण त्यजिला शिवद्वारीं ॥६१॥

तेणें पुण्यें झालें ज्ञान । ऐक शिवरात्रीचें महिमान ।; म्हणसी तूं दुराचारी म्हणोनि । त्याचा संदेह सांगेन ॥६२॥

पूर्वजन्म माझा श्वान । त्याचा स्वभाव सर्वभक्षण । सर्वां ठायीं त्याची वासना । तेचि स्वभाव मज असती ॥६३॥

ऐसें स्त्रियेसी सांगितलें । पुन्हा प्रश्न तिणें केले । म्हणे स्वामी जें सांगितलें । आपुला जन्म पुरातन ॥६४॥

तुम्ही असा सर्वज्ञानी । माझा जन्म सांगा विस्तारुनि । म्हणोनि लागतसे चरणीं । कृपा करीं गा प्राणेश्वरा ॥६५॥

ऐक वपुषे ज्ञान सती । तुझा पूर्व जन्म कपोती । करीत होतीस उदरपूर्ती । एके दिवसीं अवधारीं ॥६६॥

पडिला होता मांसगोळा । तो तुवां चोंचीनें धरिला कवळा । उडत होतीस आकाशमंडळा । तें दुरुनि देखिलें घारीनें ॥६७॥

कवळ घेईन म्हणोनि । घार आली धांवोनि । तूं गेलीस वो पळोनि । महारण्य क्रमीत ऐका ॥६८॥

पाठीं लागली ते घारी । मागें पुढें न विचारी । तूं पळालीस ते अवसरीं । श्रीपर्वत-गिरीवरी ॥६९॥

सवेंचि आली ते घारी । तूं गेलीस शिवालय-शिखरीं । भोंवों लागलीस प्रदक्षिणापरी । श्रम जाहले तुज बहुत ॥७०॥

दुरोनि आलीस धांवत । प्राण होता कंठगत । श्रमोनि शिखरीं तूं बैसत । घारीं येऊनि मारिलें चोंचीं ॥७१॥

घेऊनि गेली मांस-कवळें । तुझें देह पंचत्व पावलें । प्रदक्षिणा-पुण्य फळलें । झालीस तुवां राजपत्नी ॥७२॥

इतुकिया अवसरीं । पुनः पतीस प्रश्न करी । आतां तुमच्या निरोपावरी । ईश्वरपूजा करीन ॥७३॥

पुढें मज काय होईल । तुम्हीं कवण स्थानीं असाल । तें विस्तारावें प्राणेश्वरा निर्मळ । आत्मपति राजेंद्रा ॥७४॥

राजा सांगे सतीसी । पुढील जन्म कन पुससी । आपण राजा सिंधुदेशीं । जन्म पावेन अवधारीं ॥७५॥

माझी भार्या तूंचि होसी । जन्म पावसी सृंजयदेशीं । तेथील राजा पवित्रवंशी । त्याची कन्या होसील ॥७६॥

तिसरा जन्म आपणासी । राजा होईन सौराष्ट्रदेशीं । तूं उपजसी कलिंगराजवंशीं । माझी पत्नी होसील ॥७७॥

चवथा जन्म आपणासी । राजा होईन गांधारदेशीं । तूं उपजसी मागध कुळेसी । तैंही माझी प्राणेश्वरी ॥७८॥

पांचवा जन्म आपणासी । राजा होईल अवंतदेशीं । तूं दाशार्हराजकुळीं जन्मसी । माझी भार्या होसील तूं ॥७९॥

सहावा जन्म आपणासी । आनर्त नाम राजा परियेसीं । यायातिकन्या तूं होसी । तैंही माझी प्राणेश्वरी ॥८०॥

सातवा जन्म आपणासी । राजा होईन पांडयदेशीं । रुप लावण्य मजसरसीं । नोहे कवण संसारीं ॥८१॥

ज्ञानी सर्वगुणी होईन । सूर्यकांति ऐसें वदन । जैसा रुपें असे मदन । नाम माझें 'पद्मवर्ण' ॥८२॥

तूं जन्मसी वैदर्भकुळीं । रुपसौंदर्यें आगळी । जैसी सुवर्णाची पुतळी । चंद्रासारिखें मुखकमळ ॥८३॥

'वसुमती' असें नांव पावसी । तुज वरीन स्वयंवरेंसीं । दमयंती नळा जैसी । स्वयंवर होईल तुज मज ॥८४॥

राज्य करीन बहुत दिवस । यज्ञ करीन असमसाहस । जिंकीन समस्त देशांस । मंत्रशास्त्र शिकेन बहु ॥८५॥

देवद्विजार्चन करीन । नाना अग्रहार दान देईन । ऐशापरी वृद्धाप्य होऊन । राज्यीं स्थापीन पुत्रासी ॥८६॥

आपण चवथा आश्रम घेईन । अगस्त्यऋषीपाशीं जाईन । ब्रह्मज्ञानोपदेश शिकेन । अंतकाळ होय तंव ॥८७॥देहावसान होतां । तुज घेईन सांगाता । दिव्य विमानीं बैसोनि तत्त्वता । स्वर्गाप्रती जाऊं बळें ॥८८॥

ईश्वरपूजेची महिमा । शिवरात्रिव्रत श्रीशैल्य अनुपम्या । म्हणोनि राजा स्त्री घेऊनि संगमा । यात्रा करी शिवरात्री ॥८९॥

श्रीगुरु म्हणती तंतिकासी । शिवरात्री-श्रीपर्वत-महिमा ऐसी । ऐक तो श्वान परियेसीं । सप्तजन्मीं राजा झाला ॥९०॥

अंतीं पावला स्वर्गलोक । पर्वतमहिमा ऐसा ऐक । तुज जाहलें गुरुमुख । ईश्वरपूजा करीं बरवी ॥९१॥

ग्रामीं असे कल्लेश्वर । गाणगाग्रामीं भीमातीर । पूजा करीं गा निरंतर । मल्लिकार्जुनसमान ॥९२॥

संगमेश्वर संगमासी । पूजा करीं अहर्निशीं । मल्लिकार्जुन तोचि परियेसीं । न धरीं संदेह मनांत ॥९३॥

तंतिक म्हणे स्वामियासी । स्वामी तूं मज चाळविसी । पूजेसि गेलों मल्लिकार्जुनासी । लिंगस्थानीं तुज देखिलें ॥९४॥

सर्वां ठायीं तूंचि एक । झाला अससी व्यापक । कल्लेश्वर संगमनायक । एकेक सांगसी आम्हांपुढें ॥९५॥

ऐकोनि श्रीगुरु हांसती । ये रे पादुका धरीं म्हणती । नयन त्याचे झांकिती । संगमा आले तात्काळीं ॥९६॥

इतुकिया अवसरीं । मागें गाणगापुरीं । श्रीगुरुसी पाहती गंगातीरीं । कोठें गेले म्हणोनियां ॥९७॥

एक म्हणती संगमीं होता । एक म्हणती आम्हीं आलों आतां । कोठें गेले पहा म्हणतां । चुकर होती भक्तजन ॥९८॥

श्रीगुरु आले संगमासी । तंतिकास पाठविती मठासी । बोलावावया शिष्यांसी । आपण राहिले संगमांत ॥९९॥

तंतिक आला गांवांत । लोक समस्त हांसत । क्षौर कां रे केलें म्हणत । तंतिक म्हणे श्रीपर्वता गेलों होतों ॥१००॥

दवणा प्रसाद विभूति । नानापरींचे हार दाखविती । लोक ऐसा विस्मय करिती । म्हणती दोनप्रहरीं घरीं होता ॥१॥

एक म्हणती सत्य मिथ्या । त्यासी म्हणती सांग रे सत्या । तंतिक म्हणे सवें गुरुनाथा । गेलों होतों वायुवेगें ॥२॥

श्रीगुरु आले संगमासी । मज पाठविलें मठासी । बोलाविलें शिष्यांसी । राहूं पाहती आजि संगमीं ॥३॥

एक म्हणती होईल सत्य । मूर्ख म्हणती नव्हे, मिथ्य ।; तंतिक गेला त्वरित । शिष्यवर्गांसी जाणविलें ॥४॥

सांगितला सकळ वृत्तांत । समस्त गेले संगमा त्वरित । पूजा जाहली संगमीं बहुत । सिद्ध म्हणे नामधारकासी ॥५॥

मिथ्या म्हणती जे लोक । त्यांसी होईल कुंभीपाक । पंधरा दिवसीं ऐक । यात्रालोक गांवा आले ॥६॥

मग पुसती तयांसी । तेहीं सांगितलें भरंवसीं । आनंद झाला भक्तांसी । म्हणे सरस्वती-गंगाधर ॥७॥

सिद्धें सांगितलें नामधारकासी । तें मी सांगतसें परियेसीं । श्रीगुरुमहिमा अपारेंसी । अमृत सेवितों निरंतर ॥१०८॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे श्रीशैलशिवरात्रिमहिमावर्णनं नाम त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥४३॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेवदत्त ॥ ( ओंवीसंख्या १०८ )

## अध्याय चव्वेचाळीसावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

नामधारक म्हणे सिद्धमुनि । श्रीगुरुचरित्र तुम्ही देखिलें नयनीं । तुमचें भाग्य काय वानूं वदनीं । परब्रह्म देखिलें असे ॥१॥

तुमचेनि प्रसादेंसीं । अमृतपान झालें आम्हांसी । आतां कष्ट आम्हां कायसी । सकळाभीष्ट लाधलों ॥२॥

तुम्ही भेटलेति मज तारका । दैन्य गेलें सकळ दुःख । सर्वाभीष्ट लाधलों सुख । गुरुचरित्र ऐकतां ॥३॥

मागें कथानक सांगितलें । श्रीगुरु संगमीं राहिले । पुढें काय अपूर्व वर्तलें । निरोपावें दातारा ॥४॥

सिद्ध सांगे नामधारकासी । ऐक वत्सा विस्तारेंसीं । विचित्र झालें येरे दिवसीं । एकचित्तें परियेसा ॥५॥

'नंदी' नाम एक ब्राह्मण । सर्वांगीं कुष्ट श्वेतवर्ण । तुळजापुरा जाऊन । वर्षें तीन आराधिलें ॥६॥

तीन संवत्सर उपवास । द्विज कष्टला बहुवस । निरोप झाला सायासें । चंदलापरमेश्वरीजवळी जाणें ॥७॥

जगदंबेचा निरोप घेऊनि । आला चंदलापरमेश्वरीस्थानीं । मास सात पुरश्चरणीं । पुनरपि केले उपवास ॥८॥

नानापरी कष्टतां । स्वप्न जाहलें अवचिता । तुवां जावें त्वरिता । गाणगग्रामस्थानासी ॥९॥

तेथें असती श्रीगुरु । त्रयमूर्तीचा अवतारु । वेष धरिला असे नरु । तेथें होसील उत्तमांगी ॥१०॥

ऐसे निरोप त्यासी जाहले । विप्र म्हणे भलें केलें । मास सात कां चुकर केलें । जरी तुझे हातीं नोहेचि ॥११॥

जगन्माता तुळजा भवानी । तिचा निरोप घेऊनि । आलों तुजपाशीं ठाकोनि । तूं दैवत म्हणोनियां ॥१२॥

दैवतपण ठाउकें जाहलें । आम्हांसी निरोप दिधलें । मनुष्यापाशीं जा म्हणितलें । तुझे हातीं नोहेचि कांहीं ॥१३॥

तूं जगद्दैवत जगदंबा म्हणविसी । आम्हां मनुष्यापाशीं पाठविसी । नांव जाहलें दैवतपणासी । भाग्य माझें म्हणतसे ॥१४॥

मनुष्यापाशीं जा म्हणावयासी । लाज नये कैसी तुम्हांसी । ओळख जाहली दैवतपणासी । उपवासी सात महिने ॥१५॥

पहिलेंचि जरी निरोप देत । इतुके कष्ट आम्हां न होत । दुराशा केली मी परदैवत । म्हणोनि, दुःख करी नानापरी ॥१६॥

ऐसें अनेकपरीनें । दुःख करीतसे तो ब्राह्मण । पुन्हा मागुती पुरश्चरण । करीन म्हणे तो द्विजवर ॥१७॥

म्हणे मज बरवें होणें । अथवा आपुला प्राण देणें । ऐसें बोलोनि निर्वाणें । विप्र धरणें बैसला ॥१८॥

पुनरपि स्वप्न तयासी । तैसेंचि होय परियेसीं । आणिक समस्त भोपियांसी । तेणेंचिपरी स्वप्न होय ॥१९॥

सकळ भोपे म्हणती तयासी । आजि स्वप्न झालें आम्हांसी । छळण न करीं गा देवीसी । निरोपासरसा जाईं वेगीं ॥२०॥

तूं तरी आतां नव जासी । आम्हां निरोप झाला ऐसी । बाहेर घालूं तुम्हांसी । देवळांत येऊं नेदूं ॥२१॥

इतुकें जाहलियावरी । पारणें केलें द्विजवरीं । पूजा करी नानापरी । निरोप घेऊनि निघाला ॥२२॥

गाणगाग्रामासी आला । मठीं जाऊनि पुसों लागला । भक्तजन सांगती त्याला । संगमीं आहेत गुरुमूर्ति ॥२३॥

भक्त म्हणती तयासी । श्रीगुरु येतील पारणेसी । काल शिवरात्री-उपवासी । आतां येतील परियेसीं ॥२४॥

इतुकिया अवसरीं । श्रीगुरु आले साक्षात्कारी । ग्रामलोक द्विजातें वारी । राहें दूरी नको सन्मुख ॥२५॥

श्रीगुरु आले मठांत । द्विज उभा होता चिंतीत । भक्तजन सांगती मात । विप्र एक आला असे ॥२६॥

सर्वांगीं असे श्वेत । स्वामिदर्शना आलों म्हणत । श्रीगुरु म्हणती आपण जाणत । संदेहरुपें आला असे ॥२७॥

म्हणती बोलावा मठांत । भक्त गेले धांवत । तया द्विजातें पाचारीत । आला विप्र आंगणा ॥२८॥

दुरोनि देखिलें श्रीगुरुसी । नमन करीत लोळे भूमीसी । श्रीगुरु म्हणती तयासी । संदेहरुपें आलासि कां ॥२९॥

देवीपासूनि मनुष्यापाशीं । येणें झालें काय कार्येंसी । संदेह करोनि मानसीं । कैसा आलासि द्विजवरा ॥ ३०॥

ऐसें वचन ऐकोनि । आपुले मनींचें जाणिलें म्हणोनि । क्षमा करीं गा स्वामी म्हणोनि । लोटांगणीं येतसे ॥ ३१॥

म्हणे स्वामी आपण तमांध । तुझे दर्शनें झालों सुबुद्ध । अज्ञानें वेष्टिलों होतों मंद । नेणें सोय परब्रह्मा ॥ ३२॥

तूं साक्षात् वस्तु म्हणोनि । नेणों आपण तमोगुणी । आजि माझा सुदिन । दर्शनें झालों पुनीत ॥ ३३॥

पापकर्मी पापी आपण । पापात्मा नेणें निज खूण । पापें संभवलों पूर्ण । आलों शरण तुजपाशीं ॥ ३४॥

तूं भक्तजनां आधार । शरणागता वज्रपंजर । ब्रीद वानिती सचराचर । श्रीगुरु नृसिंहसरस्वतीचें ॥ ३५॥

आजि माझें कुकर्म गेलें । परब्रह्मचरण देखिलें । मनोरथ माझे पुरले । कृपासागरा यतिराया ॥ ३६॥

तूं भक्तजनाची कामधेनु । मनुष्यवेषीं आलासि अवतरोनु । तुझा पार जाणे कवणु । त्रैमूर्ति तूंचि होसी ॥ ३७॥

जैसी सगरांवरी गंगा । पावन करावया आली जगा । तैसा तूं भक्तसेवकवर्गा । तारावया अवतरलासी ॥ ३८॥

का अहिल्या झाली पाषाण । दिव्यदेही झाली लागतां चरण । तैसें मज आजि निर्गुण । झालें स्वामी गुरुनाथा ॥ ३९॥

व्रतबंध विवाह झालियावरी । व्याधि उद्भवली आपुले शरीरीं । स्त्री राहिली माहेरीं । स्पर्शों नये शरीर म्हणे ॥ ४०॥

आपुले असती मातापिता । सकळ म्हणती जाईं परता । दुःख जाहलें अपरिमिता । संसार त्यजूनि निघालों ॥ ४१॥

गेलों होतों तुळजापुरा । उपवास केले अपारा । मज म्हणती तूं पापभारा । नव्हे तुज बरवें आतां ॥ ४२॥

निरोप दे जा सन्नतीं । जेथें चंदलापरमेश्वरी वसती । तेथें होईल निवृत्ति । पाप जाईल म्हणोनि ॥ ४३॥

तेथेंही कष्ट केले बहुत । नव्हेचि कांहीं, देवी उबगत । निरोप झाला जा म्हणत । कृपामूर्ति तुजपाशीं ॥ ४४॥

ऐसें माझें दैव हीन । उबगताति देव आपण । मज देखोनि निर्वाण । बाहेर घाला म्हणताति ॥ ४५॥

देवता आपण उबगताति । मनुष्य कैसे मज देखती । निर्वाणीं आलों तुम्हांप्रती । निर्धार केला मरणाचा ॥ ४६॥

ऐसा पापी असोनि आपण । काय करावें अंग हीन । तोंड न पाहती कुष्ठी म्हणोन । मरण बरवें यापरतें ॥ ४७॥

आतां असे एक विनंति । होय अथवा नव्हे निश्चितीं । शीघ्र निरोपावें यति । दैवतें चाळवितीं आशाबद्धें ॥ ४८॥

मज चाड नाहीं शरीराची । प्राण देईन सुखेंचि । तूं रक्षक माउली शरणागताची । निरोपावें दातारा ॥ ४९॥

ऐसें करुणावचन ऐकोन । श्रीगुरु बोलती हांसोन । सोमनाथ ब्राह्मण बोलावून । निरोप देती न्याया संगमासी ॥ ५०॥

बरवा संकल्प सांगोनि । स्नान करवा षट्कूळभुवनीं । अश्वत्थप्रदक्षिणा करवूनि । वस्त्रें टाका दूर त्याचीं ॥ ५१॥

नवीं वस्त्रें द्या यासी । शीघ्र आणा पारणेसी । ऐसा निरोप देती त्यांसी । दोघे गेले झडकरी ॥ ५२॥

स्नान करुनि बाहेर आला । शरीरवर्ण पालटला । अश्वत्थप्रदक्षिणा करूं लागला । सु-वर्ण जाहलें सर्वांग ॥ ५३॥

वस्त्रें देती ब्राह्मणासी । जीर्ण वस्त्रें टाकिती दूरेंसी । जेथें टाकिती ते भूमीसी । क्षार भूमि होय त्वरित ॥ ५४॥

सांगातें घेऊनि द्विजासी । सोमनाथ आला मठासी । चरणीं घातलें तयासी । लोक सर्व विस्मित ॥ ५५॥

नंदीनामें केला नमस्कार । संतोषें स्तोत्र करी अपार । हर्षें जाहला निर्भर । लोळतसे पादुकावरी ॥ ५६॥

श्रीगुरु म्हणती तयासी । तुझी कामना झाली परियेसीं । सर्वांग आहे कैसी । अवलोकोनि पाहें म्हणती ॥ ५७॥

पाहतां सर्वांग बरवें जाहलें । तावन्मात्र जंघेसी राहिलें । पाहतां मन त्याचें भ्यालें । म्हणे स्वामी असे थोडें ॥ ५८॥

तुझी कृपादृष्टि झाली असतां । थोडें राहिलें म्हणे केवीं आतां । करीतसे दंडवता । कृपा करीं गा परमात्मा ॥ ५९॥

श्रीगुरुमूर्ति निरोपिती तयासी । तूं संशय करोनि आलासी । मनुष्य काय करील म्हणोनि मानसीं । तेणें गुणें राहिलेंथोडें॥ ६०॥

त्यासी असे एक प्रतीकार । तुवां कवित्व सांगावें अपार । आमुची स्तुति करावी निरंतर । बरवें होईल तुज मग ॥ ६१॥

नंदीनामा म्हणे स्वामीसी । लिखित नेणें वाचायासी । कैसें करुं मी कवित्वासी । मंदमति असे आपण ॥६२॥

काय जाणें कवित्वस्थिति । मज नाहीं काव्यव्युत्पत्ति । स्वामी ऐसा निरोप देती । म्हणोनि चरणीं लागला ॥६३॥

श्रीगुरु म्हणती द्विजासी । मुख उघडीं काढीं जिव्हेसी । विभूति शिंपिती तयासी । ज्ञान उपजलें ब्राह्मणा ॥६४॥

चरणांवरी ठेविला माथा । उभा ठेला स्तोत्र करितां । म्हणे स्वामी मी नेणता । सेवेसी नव्हे अराणुक ॥६५॥

मायापाशीं वेष्टोनि । बुडत होतों संसारगहनीं । आठवण न करीं कधीं मनीं । तुझे चरणा विसरलों ॥६६॥

संसार-सागर मायाजाळ । योनीं जन्मोनि चौऱ्यांशीं लक्षकुळ । आठवण नव्हे तुझें नाम केवळ । मंदमति जाहली मज ॥६७॥

स्वेदज अंडज उद्भिज्जेंसी । जन्मा आलों पशुयोनीसी । तव ज्ञान कैंचें आम्हांसी । स्थावर जंगम जैं होतों ॥६८॥

नानायोनींत मनुष्य विशेष । शूद्रादि याती बहुवस । जधीं होतों त्या जन्मास । काय जाणें तुझी सोय ॥६९॥

समस्त जन्मांत एक । ब्राह्मनजन्म विशेख । काय करावें होऊनि मूर्ख । गुरुसोय नेणे नर ॥७०॥

मातेचें शोणित पित्याचें रेत । संपर्क जहाला जननीगर्भांत । जैसें सुवर्ण मुशीं असे कढत । दिवस पांच बुद्‌बुदाकार ॥७१॥

पंधरा दिवसा होय स्थिर । एक रस होऊनि निर्धार । तधीं मी काय जाणें गुरु । नाहीं पंचतत्त्वें मज ॥७२॥

मासें एक पिंड होय । द्वय मासीं शिर पाय । तिसरे मासीं सर्व अवयव । नवद्वारें झालीं मग ॥७३॥

पंचतत्त्वे होतीं एक । वायु-आप-पृथ्वी-तेज-ख । प्राण आला तात्काळिक । तधीं स्मरण कैंचें मज ॥७४॥

पांचवे मासीं त्वचा रोम । सहावे मासीं उच्छ्वास आम्हां । सातवे मासीं श्रोत्र जिव्हा । मेद मज्जा दृढ जाहली ॥७५॥

ऐसे नव मास कष्टत । होतों जननियें-गर्भांत । रुधिर-विष्ठा-मूत्रांत । कष्टलों भारी स्वामिया ॥७६॥

माता भक्षी उष्ण क्षार । तेणें तीक्ष्णें कष्टलों अपार । पडे लोळे अनेक प्रकार । दुःख तेव्हां सांगूं कोणा ॥७७॥

मना आलें भक्षण करीं । दुःख होय मज अपारी । ऐसें नवमासवरी । मातागर्भीं कष्टलों ॥७८॥

तधीं कैचें तुझें स्मरण । वेष्टिलों होतों मायावरणें । स्मरलों नाहीं तुझे चरण । मग योनिमुखीं जन्मलों ॥७९॥

उपजतांचि आपणासी । आयुष्य लिहिलें लल्लाटेसी । अर्ध गेलें वृथा निशीं । रात्रीं निद्रा मानवा ॥८०॥

उरले आयुष्यांत देखा । तीन भाग केले विशेखा । बाल यौवन वृद्धाप्य ऐका । निर्माण झाले तये वेळीं ॥८१॥

बाळपणीं आपणासी । कष्ट झाले असमसाहसी । मज घालिती पाळणेसी । मूळमूत्रांत लोळतसें ॥८२॥

बाळपणींचें दुःख आठवितां । शोक होय मज अपरिमिता । काय सांगूं गुरुनाथा । नाना आपदा भोगिल्या ॥८३॥

शयनस्थानीं मलमूत्रांत । निरंतर असें लोळत । आपली विष्ठा आपण खात । अज्ञानतिमिरें वेष्टिलों ॥८४॥

एकादे समयीं आपणासी । पोटशूळ उठे बहुवसीं । रोदन करितां परियेसीं । स्तनपान मला करविती ॥८५॥

क्षुधाक्रांत होय बहुत । मज म्हणती पोट दुखत । अंगुली घालूनि मुखांत । वोखद मज पाजविती ॥८६॥

ऐसें क्षुधेनें पीडितां बहुत । मज घालिती पाळण्यांत । हालविती पर्यंदें गात । क्षुधाक्रांत रुदन करीं ॥८७॥

म्हणती रुदन करितो बाळ । मुखीं शिंपिती कांजीतेल । रक्षा बांधिती मंत्रें केवळ । नेणे माता भूक माझी ॥८८॥

पाळण्यांत घालिती कौतुकें । प्रावरणांत असतां वृश्चिकें । मारीतसे पाठीं डंक । प्रलाप मी करीतसें ॥८९॥

आणिक पाळणा हालविती । राहें राहें उगा म्हणती । स्तनपान मागुती करविती । वृश्चिकविष नेणतां ॥९०॥

तेणें दुःखें स्तनपान न करीं । मागुती घालिती पाळण्याभीतरीं । वृश्चिक मज डंक मारी । प्राणांतिक मज होय ॥९१॥

माता खाय अंबट तिखट । स्तनपानें मज अपार वोखट । अति मधुर क्षीर अंबट । तेणें खोकतसें सर्वकाळीं ॥९२॥

नाना औषधें मज देती । तेणें माझे डोळे दुखती । कुंकुम लवणक्षार भरिती । डोळे आले म्हणोनियां ॥९३॥

ऐसे कष्ट धुरंधर । बाळपणीं जाहले अपार । वाढलों कष्ट भोगीत फार । वर्षें बारा लोटलीं ॥९४॥

तधीं तुझे चरणस्मरणा । मज कैंचें गा देवराणा । कष्टलों मी याचिगुणा । पूर्वजन्म नाठवेचि ॥९५॥

दोन भाग उरले आपणासी । मदनें व्यापिलें शरीरासी । जैसा पतंग दीपासी । भ्रमिजेत उन्मत्त ॥९६॥

नेणें मी गुरु माता पिता । समस्तांतें करी निंदा वार्ता । परस्त्रीवरी करीं चिंता । कुळाकुळ न विचारीं ॥९७॥

ब्राह्मणातें निंदा करी । वृद्धाच्या चेष्टा करी अपारी । मदें व्यापिलें असे भारी । नाठवती तुझे चरण मज ॥९८॥

मांसाचे कवळाकारणें । मत्स्य जाय जेवीं प्राणें । तैसा आपण मदनबाणें । वश्य जाहलों इंद्रियांसी ॥९९॥

नानावर्ण स्त्रियां भोगिलें । परद्रव्य अपहारिलें । सिद्धमहंतांतें निंदिलें । दृष्टीं न दिसे माझे कांहीं ॥१००॥

ऐसा मदनें व्यापूनि । मागें पुढें न पाहें नयनीं । पतंग जाय धांवोनि । दीपावरी पडे जैसा ॥१॥

ऐसा वेष्टोनि मदनबाणीं । न ऐके सुबुद्धि कधीं श्रवणीं । सोय न धरीं तुझे चरणीं । यौवनपण गेलें ऐसें ॥२॥

मग वृद्धाप्य आले शरीरासी । उबग होय स्त्रीपुत्रांसी । श्वासोच्छवास कफेसीं । सदा खोकला होय मज ॥३॥

अवयव सर्वही गलित होती । केश पांढरे होती त्वरिती । दंतहीन, श्रवणें न ऐकिजेति । दृष्टीं न दिसे, नासिक गळतें ॥४॥

ऐसा नाना रोगें कष्टतां । तुमची सेवा कधीं घडणें आतां । स्वामी तारका श्रीगुरुनाथा । संसारसागरा कडे करीं ॥५॥

ऐसा मंदमति आपण । न ओळखेचि तुझे चरण । तूंचि केवळ नारायण । अवतार तूं श्रीगुरुमूर्ति ॥६॥

तूंचि विश्वाचा तारक । धरोनियां नरवेष । त्रयमूर्ति तूंचि एक । परब्रह्म श्रीगुरुनाथा ॥७॥

दिवांध नेणती तुज लोक । तूंचि विश्वाचा पाळक । मी किंकर तुझा सेवक । संसार-धुरंधरीं तारीं मज ॥८॥

ऐसें नानापरी स्तोत्र । करीतसे नंदीनामा पवित्र । जन पाहताति विचित्र । त्यांसी म्हणे नंदीनामा ॥९॥

ऐका हो जन समस्त । श्रीगुरू जाणा परब्रह्मवस्तु । आपण पाप केलें बहुत । दर्शनमात्रें सर्व गलें ॥११०॥

जैसें तृणाचे बणवीसी । अग्नि लागतां क्षणें कैसी । गुरुकृपा होय ज्यासी । पाप जळे तयापरी ॥११॥

'चरणं पवित्रं विततं पुराणं' । ऐसें बोले वेद आपण । सेवा सेवा हो गुरुचरण । गुरुवेगळा देव नाहीं ॥१२॥

ब्रह्मदेवें आपण देखा । दुष्टाक्षरें लिहिलीं कपाळिका । तैसेही होय निका । श्रीगुरुचरणीं लागतां ॥१३॥

जवळी असतां निधान । कां नोळखा हो तुम्ही जन । नृसिंहसरस्वती कामधेनु । भजा भजा हो सकळिक ॥१४॥

इहसौख्य ज्ञान ऐका । अंतीं पावे वैकुंठलोका । संदेह नाहीं होईल सुखा । सत्य जाणा हो बोल माझा ॥१५॥

नंदीनामा स्तोत्र करितां । श्रीगुरु संतोषी अत्यंता । भक्तांसी ऐसा निरोप देत । 'कवीश्वर' म्हणा यासी ॥१६॥

कवि 'बसवरस' नाम तयासी । निर्धार केला आम्हीं भरंवसीं । ऐसें कृपेनें बोलती त्यासी । ऐकोनि चरणीं लागला ॥१७॥

जें कां शेष होतें जंघेवरी । तें तात्काळ गेलें दूरी । नंदीनामा आनंद करी । राहिला सेवा करीत देखा ॥१८॥

सिद्ध म्हणे नामधारकासी । श्रीगुरुचरित्र ऐसें परियेसीं । कथा करीत कवि बसवरसी । श्रीगुरुसेवेसी राहिला ॥१९॥

नामधारक म्हणे सिद्धमुनि । दुसरा कवि 'नरहरि' म्हणोनि । तो केवीं झाला शिष्य सुगुणी । कवेश्वर भक्त जाहला ॥१२०॥

तें विस्तारोनि आम्हांसी । सांगा स्वामी कृपेंसी । वांछा असे मानसीं । गुरुचरित्र ऐकावें ॥२१॥

म्हणे सरस्वती-गंगाधर । पुढील कथेचा विस्तार । ऐकतां होय मनोहर । नामस्मरण कामधेनु ॥१२२॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे द्विजकुष्टपरिहारो नाम चतुश्चत्वारिंशोऽध्यायः ॥४४॥

## अध्याय पंचेचाळीसावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

नामधारक विनवी सिद्धासी । मागें कथा निरोपिलीसी । नंदीनामा कवि ऐसी । दुसरा आणिक आला म्हणोनि ॥ १॥

कवणेंपरी झाला शिष्य । तें सांगावें जी आम्हांस । विस्तार करुनि आदिअंतास । कृपा करुनि दातारा ॥ २॥

सिद्ध म्हणे नामधारका । सांगों तुतें कथा ऐका । आश्चर्य झालें कवतुका । श्रीगुरुचरित्र अति गोड ॥ ३॥

गाणगापुरीं असतां गुरु । ख्याती झाली अपरांपरु । लोक येती थोरथोरु । भक्त बहुत जाहले ॥ ४॥

नंदीनामा कवि होता । कवित्व केलें अपरिमिता । समस्त लोक शिकती अमृता । प्रकाश झाला चहूं राष्ट्रीं ॥ ५॥

ऐसें असतां एके दिवसीं देखा । श्रीगुरुसी नेलें भक्तें एका । आपुले घरीं शोभनदायका । म्हणोनि नेलें आपुले ग्रामा ॥ ६॥

हिपरगी म्हणिजे ग्रामासी । नेलें आमुचे श्रीगुरुसी । पूजा केली तेथें बहुवसी । समारंभ थोर जाहला ॥ ७॥

तया ग्रामीं शिवालय एक । नाम 'कल्लेश्वर' लिंग ऐक । जागृत स्थान प्रख्यात निक । तेथें एक द्विजवर सेवा करी ॥ ८॥

तया नाम 'नरहरी' । लिंगसेवा बहु करी । आपण असे कवीश्वरी । नित्य करी पांच कवित्वें ॥ ९॥

कल्लेश्वरावांचूनि । आणिक नाणी कदा वचनीं । एकचित्तें एकमनीं । शिवसेवा करीतसे ॥ १०॥

समस्त लोक त्यासी म्हणती । तुझे कवित्वाची असे ख्याति । श्रीगुरुसी कवित्वावरी प्रीति । गुरुस्मरण करीं तूं कांहीं ॥ ११॥

त्यांसी म्हणे तो नर । कल्लेश्वरासी विकिलें जिव्हार । अन्यत्र देव अपार । नरस्तुति मी न करीं ॥ १२॥

ऐसें बोलोनियां आपण । गेला देवपूजेकारण । पूजा करितां तत्क्षण । निद्रा आली तया द्विजा ॥ १३॥

नित्य पूजा करुनि आपण । कवित्व करी पार्वतीरमणा । ते दिवसीं अपरिमाण । निद्रा आली तया देखा ॥ १४॥

निद्रा केली देवळांत । देखता जाहला स्वप्नांत । लिंगावरी श्रीगुरु बैसत । आपण पूजा करीतसे ॥ १५॥

लिंग न दिसे श्रीगुरु असे । आपणासी पुसती हर्षे । नरावरी तुझी भक्ति नसे । कां गा आमुतें पूजितोसि ॥ १६॥

षोडशोपचारेंसीं आपण । पूजा करी स्थिर मनीं । ऐसें देखोनियां स्वप्न । जागृत झाला तो द्विज ॥ १७॥

विस्मय करी आपुले मनीं । म्हणे नरसिंहसरस्वती शिवमुनि । आला असे अवतरोनि । आपण निंदा त्याची केली ॥ १८॥

हाचि होय सद्गुरु । त्रयमूर्तींचा अवतारु । भेट घ्यावी आतां निर्धारु । म्हणूनि आला श्रीगुरुपाशीं ॥ १९॥

आला विप्र लोटांगणेंसीं । येऊनि लागला चरणासी । कृपा करीं गा अज्ञानासी । नेणों तुझें स्वरुप आपण ॥ २०॥

प्रपंचमाया वेष्टोनि । नोळखें आपण अज्ञानी । तूंचि साक्षात् शिवमुनि । निर्धार जाहला आजि मज ॥ २१॥

कल्लेश्वर कर्पूरगौरु । तूंचि होसी जगद्गुरु । माझें मन झालें स्थिरु । तुझे चरणीं विनटलों ॥ २२॥

तूंचि विश्वाचा आधारु । शरणागता वज्रपंजरु । चरणकमळ वास भ्रमर । ठाकोनि आलों अमृत घ्यावया ॥ २३॥

जवळी असतां निधानु । कां हिंडावें रानोरानु । घरा आलिया कामधेनु । दैन्य काय आम्हांसी ॥ २४॥

पूर्वीं समस्त ऋषि देखा । तप करिती सहस्त्र वर्षे निका । तूं न पवसी एकएका । अनेक कष्ट करिताति ॥ २५॥

न करितां तपानुष्ठान । आम्हां भेटलासि तूं निधान । झाली आमुची मनकामना । कल्लेश्वर लिंग प्रसन्न झालें ॥ २६॥

तूंचि संत्य कल्लेश्वरु । ऐसा माझे मनीं निर्धारु । कृपा करीं गा जगद्गुरु । म्हणोनि चरणीं लागला ॥ २७॥

श्रीगुरु म्हणती तयासी । नित्य आमुची निंदा करिसी । आजि कैसें तुझे मानसीं । आलासी भक्ति उपजोनि ॥ २८॥

विप्र म्हणे स्वामियासी । अज्ञान अंधकार आम्हांसी । कैसे भेटाल परियेसीं । ज्योतिर्मय न होतां ॥ २९॥

म्यां कल्लेश्वराची पूजा केली । तेणें पुण्यें आम्हां भेटी लाधली । आजि आम्ही पूजेसी गेलों ते काळीं । लिंगस्थानीं तुम्हांसि देखिलें ॥३०॥

स्वप्नावस्थेंत देखिलें आपण । प्रत्यक्ष भेटले तुझे चरण । स्थिर जाहलें अंतःकरण । मिळवावें शिष्यवर्गांत ॥३१॥

ऐसें विनवोनि द्विजवर । स्तोत्र करीतसे अपार । स्वप्नीं पूजा षोडशोपचार । तैसें कवित्व केलें देखा ॥३२॥

मानसपूजेचें विधान । पूजा व्यक्त केली त्याणें । श्रीगुरु म्हणती तत्क्षण । आम्ही स्वप्नरुप लोकांसी ॥३३॥

प्रत्यक्ष आम्ही असतां देखा । स्वप्नावस्थीं कवित्व ऐका । येणें भक्तें केलें निका । स्वप्नीं भेदूनि समस्त ॥३४॥

ऐसें म्हणोनि शिष्यांसी । वस्त्रें देती त्या कवीसी । लागला तो श्रीगुरुचरणासी । म्हणे आपण शिष्य होईन ॥३५॥

श्रीगुरु म्हणती तयासी । कल्लेश्वर श्रेष्ठ आम्हांसी । पूजा करीं गा नित्य त्यासी । आम्ही तेथें सदा वसों ॥३६॥

विप्र म्हणे स्वामियासी । प्रत्यक्ष सांडोनि चरणासी । काय पूजा कल्लेश्वरासी । तेथेंही तुम्हांसी म्यां देखिलें ॥३७॥

तूंचि स्वामी कल्लेश्वरु । त्रयमूर्तीचा अवतारु । हाचि माझा सत्य निर्धारु । न सोडीं आतां तुझे चरण ॥३८॥

ऐसें विनवोनि स्वामियासी । आला सवें गाणगापुरासी । कवित्वें केलीं बहुवसी । सेवा करीत राहिला ॥३९॥

सिद्ध म्हणे नामधारकासी । कवीश्वर दोघे श्रीगुरुपाशीं । आले येणें रीतीसीं । भक्ति करिती बहुवस ॥४०॥

म्हणे सरस्वती-गंगाधरु । ज्यासी प्रसन्न होय श्रीगुरु । त्याचे घरीं कल्पतरु । चिंतिलें फळ पाविजे ॥४१॥

कथा कवीश्वराची ऐसी । सिद्ध सांगे नामधारकासी । पुढील कथा विस्तारेंसीं । सांगेल सिद्ध नामधारका ॥४२॥

इति श्रीगुरुचरित्रामृते परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे नरहरिकवीश्वर-वरप्राप्ति नाम पंचचत्वारिंशोऽध्यायः ॥४५॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेवदत्त ॥ ( ओंवीसंख्या ४२ )

## अध्याय सेहेचाळीसावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

नामधारक म्हणे सिद्धासी । पुढें कथा वर्तली कैसी । तें विस्तारोनि सांगावें आम्हांसी । कृपा करीं गा दातारा ॥१॥

सिद्ध म्हणे श्रीमंता । ऐकेन म्हणसी गुरुचरित्रा । तुज होतील पुत्रपौत्रा । सदा श्रियायुक्त तूं होसी ॥२॥

सांगो आतां एक विचित्र । जेणें होतील पतित पवित्र । ऐसें असे श्रीगुरुचरित्र । तत्परेंसीं परियेसा ॥३॥

गाणगापुरीं असतां श्रीगुरु । सण आला दिपवाळी थोरु । शिष्य आले पाचारुं । आपुले घरीं भिक्षेसी ॥४॥

सप्त शिष्य बोलाविती । एकाहूनि एक प्रीतीं । सातै जण पायां पडती । यावें आपुले घरासी ॥५॥

एकएक ग्राम एकेकासी । श्रीगुरु म्हणती तयांसी । समस्तांच्या घरीं यावें कैसी । तुम्ही आपणचि विचारा ॥६॥

तुम्हीं वांटा आपणियांत । कवणाकडे निरोप होत । तेथें आम्हीं जाऊं म्हणत । शिष्याधीन आम्ही असों ॥७॥

आपणांत आपण पुसती । समस्त आपण नेऊं म्हणती । एकमेकांत झगडती । आपुला स्वामी म्हणोनियां ॥८॥

श्रीगुरु वारिती तयांसी । तुम्ही भांडतां कासयासी । आम्ही एक गुरु सातांसी । एका घरीं येऊं म्हणती ॥९॥

ऐसें वचन ऐकोनि । समस्त विनविती कर जोडूनि । स्वामी प्रपंच न पहावा नयनीं । समर्थ-दुर्बळ म्हणों नये ॥१०॥

समस्तांसी पहावें समान । न विचारावें न्यून पूर्ण । उपेक्षिसी दुर्बळ म्हणोन । गंगाप्रवेश करुं आम्ही ॥११॥

विदुराचिया घरासी । श्रीकृष्ण जाय भक्तींसीं । राजा-कौरवमंदिरासी । नवचे तो भक्तवत्सल ॥१२॥

आम्ही समस्त तुमचे दास । कोणासी न करावें उदास । जो निरोप द्याल आम्हांस । तोचि आपण करुं म्हणती ॥१३॥

ऐसें म्हणोनियां समस्त । करिती साष्टांग दंडवत । समस्त आम्हां पहावें म्हणत । विनविताति श्रीगुरुसी ॥१४॥

श्रीगुरु म्हणती समस्तांसी । येऊं तुमच्या घरासी । चिंता न धरावी मानसीं । भाक आमुची घ्या म्हणती ॥१५॥

ऐसें ऐकोनि श्रीगुरुवचन । विनविताति सातै जण । समस्तां आश्वासितां येऊं म्हणोन । कवणें करावा भरंवसा ॥१६॥

श्रीगुरु मनीं विचारिती । अज्ञानी लोक नेणती । तयां सांगावें एकांतीं । एकेकातें बोलावूनि ॥१७॥

जवळी बोलावूनि एकासी । कानीं सांगती तयासी । आम्ही येतों तुझे घरासी । कोणापुढें न सांगावें ॥१८॥

ऐसी भाक तयासी देती । उठोनि जाईं गांवा म्हणती । दुजा बोलावूनि एकांतीं सांगती । येऊं तुझ्या घरासी ॥१९॥

ऐसें सांगोनि तयासी । पाठविलें ग्रामासी । बोलावूनि तिसरेयासी । तेणेंचि रीतीं सांगती ॥२०॥

ऐसें सातै जण देखा । समजावोनि गुरुनायका । पाठविले तेणेंचिपरी ऐका । महदाश्चर्य वर्तलें ॥२१॥

एकमेकां न सांगत । गेले सातही भक्त । श्रीगुरु आले मठांत । अतिविनोद प्रवर्तला ॥२२॥

ग्रामांतील भक्तजन । हे व्यवस्था ऐकोन । विनविताति कर जोडोन । आम्हां सांडोनि जातां स्वामी ॥२३॥

त्यांसी म्हणती श्रीगुरुमूर्ति । आम्ही राहिलों जाणा चित्तीं । न करावी मनीं खंती । आम्ही असों येथेंचि ॥२४॥

ऐसें बोलतां संतोषीं । जवळीं होऊं आली निशी । दिवाळीची त्रयोदशी । रात्रीं मंगळस्नान करावें ॥२५॥

आठरुप झाले आपण । अपार महिमा नारायण । सात ठायींही गेले आपण । गाणगापुरीं होतेचि ॥२६॥

ऐसी दिपवाळी जाहली । समस्तां ठायीं पूजा घेतली । पुनः तैसेचि व्यक्त जाहले । गौप्यरुपें कोणी नेणें ॥२७॥

कार्तिकमासीं पौर्णिमेसी । करावया दीपाराधनेसी । समस्त भक्त आले दर्शनासी । गाणगाग्रामीं श्रीगुरुजवळी ॥२८॥

समस्त नमस्कार करिती । भेटीं दहावे दिवसीं म्हणती । एकमेकातें विचारिती । म्हणती आपले घरीं गुरु होते ॥२९॥

एक म्हणती सत्य मिथ्या । समस्त शिष्य खुणा दावित । आपण दिल्हें ऐसें वस्त्र । तें गा श्रीगुरुजवळी असे ॥३०॥

